*Prepared under the directions of the History and Geography Books Committee of the Government of Bombay.*

# विनिमय आणि पैसा.

लेखक

अनंत श्रीधर देशपांडे,

बी. ए. एलूएल्. बी.

माणेकजी लिमजी फ़ाइलमन,

मुंबई युनिव्हर्सिटी.

१९३२

# दोन शब्द.

साधारणतः आपल्याकडे बहुजन समाजाची दृष्टी शास्त्रीय विषयांच्या वाचनाकडे कमीच. त्यांतल्यात्यांत अर्थशास्त्र म्हणजे एक रुक्ष व क्लिष्ट शास्त्र असा समज झालेला. तेव्हां आर्थिक विषयांचा उहापोह करणारें वाङ्मय मराठी भाषेंत हातांच्या बोटांवर मोजण्याइतकेंही निर्माण होऊं नये यांत फारसें आश्चर्य नाहीं. ज्या भाषेंत इतिहास, तत्वज्ञान, अध्यात्म, पदार्थविज्ञान, इंद्रियविज्ञान वगैरे विषयांवर ग्रंथ निर्माण होऊं शकतात त्या भाषेंत अर्थशास्त्रावरही ग्रंथ लिहिले जाणें अशक्य नाहीं. पण अशा तऱ्हेचे ग्रंथ तयार न होण्याला मुख्यतः दोन गोष्टी कारणीभूत आहेत. एकतर वर लिहिल्याप्रमाणें अर्थशास्त्राबद्दल झालेली बहुजन समाजाची भ्रामक समजूत व दुसरी म्हणजे आपल्या शिक्षण क्रमांत अर्थशास्त्राबद्दल दाखविण्यांत आलेली अनास्था. मुंबई युनिव्हर्सिटीच्या बी. ए. च्या परीक्षेला ऐच्छिक विषय म्हणून अर्थशास्त्राचा आपल्या शिक्षणक्रमांत प्रथम शिरकाव झालेला आहे. तोंपर्यंत कोठेंही अर्थशास्त्राच्या शिक्षणाला जागा मिळालेली नाहीं. अशा परिस्थितींत या विषयाबद्दल बहुजन समाजांत अज्ञान व गैरसमज असावा ही कांहीं मोठी नवलाची गोष्ट नाहीं

वास्तविक पहातां अर्थशास्त्राचा विषय हा तत्वज्ञान, अध्यात्म वगैरेपेक्षांही प्रत्येकाच्या अधिक जिव्हाळ्याचा प्रश्न आहे. 'आधी पोटोबा मग विठोबा' या आपल्या म्हणीप्रमाणें प्रत्येकानें आपल्या पोटापाण्याचा प्रश्न प्रथम सोडविला पाहिजे; यावरूनच दररोज आपला चरितार्थ चालविण्यास लागणाऱ्या अनेक वस्तु मिळविण्याकरितां मनुष्य जे प्रयत्न करतो त्यांबद्दल विवेचन करणारें जें शास्त्र तेंच अर्थशास्त्र होय.

प्रस्तुत पुस्तकांतील विवेचनाचा विषय हा अर्थशास्त्रांतील एक महत्वाचा भाग आहे. तसेंच याचा प्रत्येक व्यक्तीच्या रोजच्या आयुष्य

क्रमाशीं अत्यंत निकट संबंध आहे. इतकेंच नव्हे, तर आपल्या सध्यांच्या सामाजिक जीवनक्रमांत पैशाला इतकें महत्वाचें स्थान प्राप्त झालें आहे कीं पैसा म्हणजे चालू युगांतील प्रति परमेश्वर बनून राहिला आहे. तेव्हां आपल्या ऐहिक जीवनांतील या अत्यंत महत्वाच्या विषयांबद्दल प्रत्येकाला थोडीबहुत तरी माहिती असली पाहिजे यांबद्दल दुमत होण्याचें कारण दिसत नाहीं.

इंग्रजीमध्यें अर्थशास्त्रविषयक निरानिराळ्या प्रश्नांवर सोप्या भाषेंत सर्वसाधारण मनुष्याला समजेल अशा तऱ्हेनें लिहिलेले अनेक ग्रंथ निर्माण झालेले आहेत व प्रत्यहीं नवीन नवीन होत आहेत. पण आपल्या-कडे लोकाश्रयाच्या अभावीं अशा तऱ्हेच्या ग्रंथ प्रकाशनाचें काम हा एक मोठा आंतबट्ट्याचा व्यवहार होतो व मुख्यतः यामुळेंच मराठी भाषेंत अर्थशास्त्र विषयक वाङ्मयाची वाण राहिलेली आहे.

इंग्रजींमधील पुस्तकांच्या पद्धतीवर आपल्या भाषेंतही सर्वसाधारण मनुष्यास समजतील अशा रीतीनें अर्थशास्त्र विषयक पुस्तकें लिहून ही वाण अंशतः तरी दूर करण्याचा प्रयत्न करावा अशी प्रस्तुत लेखकाची पुष्कळ दिवसांपासून उत्कट इच्छा होती. पण या कामास लागणाऱ्या द्रव्यबळाच्या अभावीं ही इच्छा नुसती मनांतल्या मनांतच ठेवावी, लागली. पण 'सत्य संकल्पाचा दाता भगवान' या न्यायानें मुंबई सरकारनें देशी भाषांत प्रौढ लोकांकरितां निरनिराळ्या शास्त्रीय विषयांवर नवीन व सोप्या भाषेंत वाङ्मय उत्पन्न करण्याच्या कामीं उत्तेजन देण्याकरितां एक योजना तयार केली व या योजनेनुसार 'विनिमय आणि पैसा' या विषयावर एक पुस्तक तयार करून प्रसिद्ध करण्याचें काम लेखकाकडे सोंपविलें. अशा अकल्पित रीतीनें सहाय्य मिळाल्यामुळेंच प्रस्तुत पुस्तकाचें प्रकाशन होणें शक्य झालें आहे. व याकरितां मुंबई सरकारचे जितके आभार मानावेत तितके थोडेच आहेत.

हें पुस्तक तयार करण्याचे कामीं ज्या अनेक इंग्रजी व मराठी ग्रंथकारांच्या ग्रंथांची बहुमोल मदत झाली आहे त्यांचाही ग्रंथकर्ता सदैव ऋणीच राहील.

पुस्तक छापण्याचें काम थोड्या घाईनेंच करून घ्यावें लागल्यामुळें छपाईत थोडेबहुत दोष राहून गेले आहेत. पण त्यापैकीं बहुतेक किर-कोळ स्वरूपाचे व वाचकांच्या सहज लक्षांत येतील असे असल्यामुळें त्या-साठीं निराळें शुद्धिपत्र दिलेलें नाहीं. तरी सहृदय वाचक क्षमा करतील अशी खात्री आहे.

महाराष्ट्र रसिकांस ही अल्पशी सेवा पसंत पडल्यास अशाच तऱ्हेच्या इतर विषयांवर ग्रंथ लिहून ते मराठी वाचकांस सादर करण्याची ग्रंथकर्त्याची आकांक्षा आहे.

शेवटीं प्रस्तुत ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें कामीं ज्या अनेक व्यक्तींचें सहाय्य झालेलें आहे त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानून महाराष्ट्र शार-देच्या चरणीं विनम्रभावानें अर्पण केलेल्या या पहिल्याच फुलाचा योग्य स्वीकार होईल या भरंवशावरच हें आरंभीचें हितगुज आटोपतें घेतों.

ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना



'अर्थशास्त्र' व त्यांतल्या त्यांत 'पैसा' या विषयावरील पुस्तकांची मराठी वाङ्मयामध्यें फारच मोठी वाण आहे. अशा स्थितींत माझ्या एका शिष्यानें या अत्यंत महत्वाच्या आर्थिक विषयावर हें पुस्तक लिहिल्याबद्दल मला फार आनंद होत आहे. प्रतिपाद्य विषयाच्या सोप्या, सरळ व मनोरंजक विवेचन पद्धतीमुळें हें पुस्तक फार उपयुक्त व चांगले झाले आहे. पैसा हा सर्वप्रकारें आर्थिक प्रगतीचा पाया होय. अर्थात् प्रत्येक राष्ट्रामधील चलनपद्धति व तेथें नित्य व्यवहारामधें केला जाणारा 'पती' चा उपयोग, या वरूनच त्याच्या अशा प्रगतीची परिक्षा होते. देशाच्या निरनिराळ्या परिस्थितीवर त्यांतील चलन, पतीचे व्यवहार, व बँका यांचा बराच परिणाम होतो. श्री. देशपांडे यांनीं या गुंतागुंतीच्या प्रश्नांचें बरेंच विवेचन, निरनिराळ्या स्वतंत्र प्रकरणांत केलेलें असल्यामुळें याचा सर्वसाधारण मराठी वाचकांस फार उपयोग होईल. जागजागीं भारतीय चलन पद्धतींतील उदाहरणें दिल्यामुळें पुस्तकांतील तात्विक विवेचनाचे भागही फार सुलभ झाले आहेत. आपल्या देशांत फिनॅन्स मेंबर टाकाच्या एका फटकाऱ्यानें देशांतील चलन कमी अगर जास्त करूं शकतो, आणि हुंडणावळीचा भाव व बँकेतलि व्याजाचे दर बदलूं शकतो. या त्यांच्या कृत्यामुळें देशाचें सांपत्तिक नुकसान कसें व किती मोठें होतें, या गोष्टीची सर्वसाधारण मनुष्याला कल्पनाही असत नाहीं. याकरितां बाजारांत वस्तूंच्या किंमती कां व कशा बदलतात व त्यामुळें तेजी अगर मंदी कशी होते याचें व तसेंच आज सर्व राष्ट्रें या तेजीमंदीच्या चक्रांत कशी

सांपडली आहेत इत्यादि गोष्टींचें, यथायोग्य ज्ञान प्रत्येक मनुष्याला अवश्य आहे. या दृष्टीनें प्रस्तुत पुस्तक बरेच उपयुक्त होईल.

या पुस्तकासंबंधीं आणखी महत्वाची गोष्ट म्हणजे, . इंग्रजींतील मूळ पारिभाषिक शब्दांबद्दल मराठींत योग्य शब्दांची निवड ही होय. तसेंच ग्रंथकर्त्यास आपल्या विषयाचें चांगलें आकलन झालें असून त्यास बारीकसारिक गोष्टींचेही सूक्ष्म ज्ञान आहे व त्यानें या सर्वांचें समर्पक विवेचन केलें आहे हे दिसून येते; अर्थातच अशा जिव्हाळयाच्या व कठिण विषयावरील या पुस्तकानें मराठी वाङ्मयांत निःसंशय मोठीच भर घातली आहे.

डॉ. बालकृष्ण.
एम्. ए. ; पी एच. डी. (लंडन) इ.
प्रिन्सिपॉल,
राजाराम कॉलेज,
कोल्हापूर

# अनुक्रमणिका.

# विनिमय आणि पैसा.



## प्रकरण १ लें.

## विनिमय अथवा देवघेव.

**मानवी गरजाः**—ऐहिक जीवन कलहामध्यें मनुष्य प्राण्याची जी अविरत धडपड सुरूं असते व स्वसुखार्थ त्याचे जे अखंड प्रयत्न चालू असतात त्यांचे मूळ कशांत आहे याबद्दल आपण थोडासा बारकाईनें विचार करूं लागलों, तर आपणांस असें आढळून येईल कीं या सर्व धडपडीच्या व परिश्रमांच्या मुळाशीं असलेली व त्यांना कारणीभूत होणारी शक्ति ह्मणजे प्रत्येक व्यक्तीच्या जन्माबरोबरच उदय पावणाऱ्या व जन्मापासून मरेपर्यंत तिच्या पाठीशीं लागून राहिलेल्या तिच्या वासना अगर गरजा हीच होय. जन्मतःच प्रत्येक प्राणिमात्राच्या पाठीमागें परमेश्वरानें या गरजा लावून दिलेल्या आहेत. त्यापासून कोणीही अलिप्त नाहीं. लहानपणीं आपल्या गरजा फारच थोड्या असतात. पण जसजसे आपण मोठे होऊं लागतो, जसजसें आपल्याला समजूं लागतें व जसजसें आपल्यास ज्ञान प्राप्त होत जातें, तसतशा आपल्या गरजाही वाढत जातात.

**गरजांचे तीन प्रकारः**– आपल्या या गरजांचे साधारणतः तीन प्रकार करतां येतात. १ आवश्यक, २ सुखसोईच्या व ३ चैनीच्या. ज्या गरजांचें निवारण केल्याशिवाय या जगांत मनुष्याचें चालवयाचेंच नाहीं अशा गरजांना आवश्यक गरजा असें ह्मणतां येईल. तहान भूक वगैरे गरजा ह्या कोणालाही कोणत्याही परिस्थितींत सुटलेल्या नाहींत अगर सुटणें शक्य नाहीं, ह्मणून यांना आवश्यक गरजा असें ह्मणता येईल. ज्यांचें निवारण न केल्यानें मनुष्याचें जीवन अगदीं अडून रहाते असे नाहीं, पण ज्यांचें निवारण झालें असतां त्याचा जीवनक्रम कमी त्रासाचा, सुलभ व सुखावह होतो अशा गरजांना दुसऱ्या वर्गांत घालतां येईल. व ज्यांचें निवारण न केल्यानें मनुष्याचें कांहींही नुकसान होत नाहीं, त्याला कांहीं त्रास होत नाहीं अगर त्याचें मुळींच अडत नाहीं व ज्या केवळ चैनीची चटक या सदराखालीं आपण मोडतो अशांना तिसऱ्या वर्गांत घालतां येईल. आतां अमुक एक गरज कोणत्या वर्गांत घालतां येईल हें ज्या त्या व्यक्तीच्या, समाजाच्या व परिस्थितीच्या अनुरोधानेंच ठरवितां येईल. आज जी गोष्ट आपल्याला आवश्यक अशी वाटते ती कदाचित् कांहीं काळापूर्वीं तशी नसेल; किंवा आज जी गोष्ट चैनीची वाटते ती पुढें एखादे वेळीं जरूरीची व आवश्यक आहे असें वाटूं लागेल. एखाद्या साधारण स्थितींतील मनुष्याला मोटार अगर गाडी ठेवणें ही गोष्ट चैनीची वाटण्यासारखी आहे; परंतु ज्याला अतिशय कामें आहेत, इकडून तिकडे सारखे

फिरावें लागतें व फार वेळ गमावणें परवडत नाहीं अशा एखाद्या व्यापार धंद्याच्या मनुष्याच्या दृष्टीनें मोटार अगर गाडी ठेवणें जरूरीचेंच ठरणार, हिंदुस्थानसारख्या देशांत बूट वापरणें अगर लोंकरीचें कपडे घालणें हें कदाचित् आवश्यक वाटणार नाहीं, पण स्वीडन, नॉर्वेसारख्या देशांत त्यांच्या शिवाय मनुष्याला कांहीं वेळां जीव धरून राहणेंही कठीण होतें. एकंदरीत पहातां आपल्या या निरनिराळ्या प्रकारच्या गरजा अपरिमित असून त्यांचें निवारण करण्यासाठींच प्रत्यहीं आपले प्रयत्न चाललेले असतात, व आपले हे प्रयत्न व आपल्या गरजांचें निवारण यालाच मनुष्याचें आर्थिक जीवन असें नांव देण्यांत येतें.

**गरजांचें निवारण**:—मनुष्य आपल्या गरजांचें निवारण कसें करतो तें आतां आपण पाहूंया. अगदीं साध्या व नेहमींच्या माहितींतलीं उदाहरणें घेतलीं असतां आपणांस असें दिसून येईल कीं एखाद्याला तहान लागली असतां तो पाणी पितो; भूक लागल्यास अन्न फळें वगैरे कांहीं तरी खातो; थंडी वाऱ्यापासून शरीर संरक्षण करण्यासाठीं कपडे वापरतो; एखादी बंदोबस्ताची जागा पाहून निवाऱ्याची सोय करतो; उन्हांतून अगर पावसांतून हिंडताना छत्री घेतो किंवा पायांचें संरक्षण करण्यासाठीं पायांत कांहीं तरी 'पादत्राण' घालतो. एकंदरीत जी जी गरज त्याला भासेल तिचें निवारण करण्याचें सामर्थ्य ज्या ज्या वस्तूमध्यें असेल अशी वस्तु मिळवून व तिचा उपयोग करून तो आपली गरज भागवितो. म्हणजे निर-

निराळया वस्तूंच्या अगर पदार्थांच्या योगानें मनुष्याच्या निरनिराळया गरजांचें निवारण होतें.

**इष्ट वस्तू मिळविण्याचे मार्गः**– या वस्तू मनुष्य कशा मिळवितो हा प्रश्न ओघानेंच प्राप्त होतो. एक तर आपल्याला लागणाऱ्या सर्व वस्तु त्याला स्वतः तयार अगर उत्पन्न तरी केल्या पाहिजेत अगर त्या जेथें व ज्यापाशीं असतील तेथून व त्याच्या पासून मिळविल्या तरी पाहिजेत. कसेंही झालें तरी त्याला श्रम अगर प्रयत्न केल्याशिवाय मात्र कांहींही मिळत नाहीं. नुसतें स्वस्थ बसून कांहीं त्याचें चालणार नाहीं. एखाद्या कल्पवृक्षाखालीं बसून, इच्छा करण्याचाच अवकाश कीं इच्छिलेली वस्तु पुढें हजर अशांतला प्रकार कदाचित देव लोकांत असला तर देवच जाणे, परंतु आपल्या या पृथ्वीवर तरी तसें खात नाहीं. येथें प्रत्येकास कांहीं ना कांहीं श्रम हे केलेच पाहिजेत. एका संस्कृत सुभाषितांत म्हटल्या प्रमाणें

उद्यमेन हि सिध्यन्ति कार्याणि न मनोरथैः ।
नहि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगाः ॥

हरिण हे जरी सिंहाचें भक्ष्य असले तरी ते कांहीं आपण होऊन त्याच्या तोंडांत जाऊन पडत नाहींत, तर त्यासाठीं सिंहानें प्रयत्न हा केलाच पाहिजे. त्याचप्रमाणें मनुष्यानेंही नुसती इच्छा करून उपयोग नाहीं. त्यानें इच्छित वस्तु प्राप्त करून घेण्यासाठीं श्रम हे केलेच पाहिजेत. परंतु श्रम करावयाचे झाले तरी त्यामध्येंहीं मनुष्याची नेहमीं एक प्रवृत्ति दिसून येते ती ही कीं शक्य तेवढे कमींत कमी

श्रम करून त्यांपासून जास्तींत जास्त फायदा करून घ्यावयाचा. मनुष्यानें जे निरनिराळे यांत्रिक शोध लाविले आहेत त्यांच्या मुळाशीं तरी हीच प्रवृत्ति आहे.

**सर्वच इष्ट वस्तु प्रत्येकास तयार अगर उत्पन्न करतां येणें शक्य नाहीं**:– पण श्रम व प्रयत्न करून तरी एखाद्या मनुष्याला आपल्याला लागणाऱ्या सर्व वस्तु निव्वळ स्वतःच्याच श्रमानें उत्पन्न करतां येणें शक्य आहे काय ? आपण आपल्या भोंवतालच्या परिस्थितीकडे थोडी नजर टाकली तर आपल्यास असें दिसून येईल कीं आपल्या गरजा हल्लीं इतक्या वाढल्या आहेत कीं आपल्या केवळ स्वतःच्याच मेहनतीनें आपल्याला लागणाऱ्या सर्व वस्तु तयार करतां यावयाच्या नाहींत. समाज अगदीं बाल्यावस्थेंत असतांना लोकांच्या गरजा कमी असतात. परंतु समाजाची जसजशी सुधारणा होत जाते तस तशा गरजाही वाढत जातात. ह्मणजे मानवी प्रगति बरोबर मनुष्याच्या गरजांचीही प्रगति होत असते. सारांश थोडी तरी प्रगति झालेली आहे अशा समाजांत कोणत्याही व्यक्तीला स्वतःला लागणाऱ्या सर्व वस्तु दुसऱ्या कोणाच्या मदती शिवाय केवळ स्वतःच्याच श्रमानें तयार करणें शक्य नसतें. समाजाच्या अगदीं बाल्यावस्थेंत, जेव्हां मनुष्याची राहणी अगदीं साधी असते व त्याच्या गरजाही थोड्या असतात अशा स्थितींत कदाचित् हें शक्य होईल. कारण त्या स्थितीमध्यें ( हिला समाजशास्त्रज्ञ मृगयावृत्ति ह्मणतात ) मनुष्य शिकार करून अगर कंदमुळें खाऊन आपली उपजीविका

करतो, झाडांच्या ढोलींत अगर डोंगरांच्या गुहांत राहतो व जनावरांची कातडी पांघरून थंडवाऱ्यापासून शरीराचें रक्षण करतो. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे या स्थितींत त्याच्या व पशुपक्ष्यांच्या राहणींत फारसें अंतर नसते.

परंतु सुधारलेल्या देशांतील अतिशय साध्या व स्वल्प राहणीनें राहणाऱ्या अगदीं हलक्या दर्जाच्या मनुष्याच्या गरजा भागविण्यास देखील हजारों लोकांच्या मदतीची व सहकार्याची जरूरी लागते. आपणा सर्वांच्या नेहमींच्या वापरण्यांतील अगदीं क्षुल्लक अशी वस्तु घ्या उदाहरणार्थ आगकाडी. एवढी लहानशी काडी पण ती तयार करण्यास शेंकडो लोकांचें श्रम कारणीभूत होतात. मोठमोठालीं लांकडे तोडून त्यांचे आगकाड्यांच्या आकाराचे अगदीं बारीक असे तुकडे करण्यापासून ते त्या तुकड्यांना गंधक लावून त्यांच्या पेट्या भरण्यापर्यंतच्या नानाविध क्रिया नानाविध लोकांच्या हांतून होत असतात; व त्या काड्यांच्या पेट्या कारखान्यांत तयार होऊन आपल्या हातांत येऊन पडेपर्यंत आणखी किती तरी लोकांच्या हातांतून गेलेल्या असतात. तसेंच आपण वापरतो ते पैसे तयार करावयास किती निरनिराळे लोक खपत असतात हें ज्यांनीं टांकसाळी पाहिल्या आहेत त्यांना सांगावयास नकोच. सदरहू प्रमाणेंच आपण खातो तें धान्य, वापरतो तें कापड; दिव्यांत जाळतो तें तेल इत्यादि आपणांस लागणाऱ्या हरएक वस्तूंची स्थिति आहे. एकंदरीत पाहिले असतां असें दिसून येईल कीं, प्रत्येकाकरितां सर्व

जग रावतें आहे. सध्यांच्या काळीं जर कोणी ह्मणेल कीं मला लागणाऱ्या सर्व वस्तु माझ्या मीच तयार करून घेईन तर त्याचे क्षणभरही चालणार नाहीं. कारण प्रत्येक मनुष्याला हरघडी ज्यांची जरूर लागते असे कित्येक उद्योगधंदे आहेत कीं ते सर्व आपलेसे करून घेऊन आपल्यास लागणारे जिन्नस स्वतःच बनविणें ही मानवी सामर्थ्याच्या बाहेरची गोष्ट आहे. इतकेंच नव्हे तर त्याला मनुष्याचें सर्व आयुष्यच काय पण असलीं अनेक आयुष्येंही पुरी होणार नाहींत. सारांश अगदीं बाल्यावस्था सोडून थोडीशी जास्त प्रगति झालेल्या समाजामध्यें समाजांतील प्रत्येक व्यक्तीला आपल्या सर्व गरजा भागविण्यास लागणाऱ्या सर्व वस्तु स्वतः उत्पन्न अगर तयार करणें व्यवहार्य व शक्य नसते व ह्मणूनच प्रत्येकाला या बावतींत समाजांतील इतर सर्व व्यक्तींचें सहाय्य व सहकार्य यांचेवर अवलंबून रहावें लागते. याचा अर्थ असा कीं आपणांस लागणाऱ्या अनेक वस्तु आपल्याला दुसऱ्याकडून मिळवाव्या लागतात.

**श्रमविभाग**:— नुकतेंच सांगितल्याप्रमाणें आपल्या गरजा अपरिमित आहेत, व त्यांचें निवारण करावयास लागणाऱ्या वस्तूही तशाच अपरिमित आहेत. ह्मणून आपणा सर्वांना लागणाऱ्या नानाविध वस्तूंचें उत्पादनही तशाच अवाढव्य प्रमाणांत झालें पाहिजे. व सध्यां तसें तें होतही आहे. आतां आपल्याला प्रत्यहीं लागणाऱ्या असंख्य वस्तूंचें उत्पादन कार्य जें एवढ्या विस्तृत प्रमाणावर होत असतें त्याच्या मुळाशीं एक महत्त्वाचें तत्त्व आहे.

व त्या तत्वानुसार चालल्यामुळेंच अशा तऱ्हेचें उत्पादन करणें शक्य होते. हें तत्व ह्मणजे ' श्रम विभाग ' हें असून त्यासंबंधीं या ठिकाणीं थोडेसे विवेचन केलें असतां अप्रस्तुत होणार नाहीं. श्रम विभाग ह्मणजे श्रमांची अगर कामांचीं वांटणी. बरीचशी कामें करावयाचीं असलीं ह्मणजें तीं एकट्यानेंच न करितां निरनिराळ्या लोकांकडे थोडथोडी वांटून दिली तर जलद आटोपतात हें रोजच्या व्यवहारांतील उदाहरण आपल्या नेहमींच्या अनुभवांतील आहे, व रोजचा अनुभवच या तत्वांत गोंविला आहे.

**श्रमविभागापासून फायदे**:—एकाच व्यक्तीनें निरनिराळीं कामें करण्यापेक्षां निरनिराळ्या व्यक्तींनीं आपापल्या शक्तीप्रमाणें व हिंमतीप्रमाणें निरनिराळीं कामें केली तर तीं सर्व कामें कमी वेळांत, जास्त प्रमाणांत व जास्त चांगल्या तऱ्हेनें होतील. एकाच इसमाकडे पुष्कळशीं कामें असलीं ह्मणजे त्याची बहुधा एक ना धड भाराभर चिंध्या अशांतली स्थिति होते. त्याची सर्वच कामें अर्धवट अशी होतात; पण पूर्णपणें एकही होत नाहीं. तेंच जर त्याच्याकडे एखादेंच विवक्षित काम दिलें तर पूर्णपणें मन लावून त्याला तें उत्तम तऱ्हेनें पार पाडतां येईल. तसेंच एखाद्यानें एकच काम करावयाचा शिरस्ता ठेवला ह्मणजे संवयीनें त्याला त्या कामांत वाकबगारी येते व तो इतरांपेक्षां तें काम केव्हांही अधिक सफाईनें व कमी वेळांत करूं शकतो. या वरून आपणास असें दिसून येईल कीं संपत्तीच्या उत्पादनांमध्यें

श्रमविभागाच्या तत्वाचा अवलंब केल्यानें वेळाची बचत, वाढत्या प्रमाणावर उत्पादन व अधिक सफाईदार काम असा त्रिविध फायदा होतो, व त्यामुळें समाजांतील उद्योग धंद्याची, कलाकौशल्याची व संपत्तीची वाढ झपाट्यानें व्हावयास चांगलीच मदत होते. नेहमींच्या अनुभवांतलें एखादें उदाहरण घेतलें असतां हें आपल्याला चटकन समजून येईल. एखादें घर बांधावयाचें काम चालू असते तिथें आपण पाहिलें तर आपल्याला काय दिसून येते ? कांहीं लोक चुना तयार करीत असतात, कांहीं दगड घडीत असतात, कांहीं लांकूड काम ( दारें चौकटी वगैरे ) करीत असतात, कांहीं लोक प्रत्यक्ष भिंती वगैरे बांधण्याचें काम करीत असतात तर कांहीं त्यांच्या हाताखालीं राहून त्यांना दगड चुना वगैरे आणून देत असतात. अशा रीतीनें ते सर्व लोक मिळून एखादा मोठा बंगला वर्ष सहा महिन्यांच्या आंत बांधून देतात. तेंच काम जर कोणी एकट्यानें करावयाचें ह्मटलें तर त्याला सर्व आयुष्यभरही खपून तें पूर्ण करतां येईल कीं नाहीं याची शंकाच आहे. म्हणून दगड फोडणें, घडणें, लांकडें कापणें, बांधकाम करणें इत्यादि निरनिराळीं कामें पाथरवट, सुतार, गवंडी वगैरे त्या त्या कामांत वाकबगार असलेले लोक जितकी जलद व सफाईदार करतील तेवढी एकच मनुष्य सर्व कामें करूं लागला तर त्याचें हांतून होणार नाहींत.

यावरून मनुष्याच्या रोजच्या व्यवहारांत श्रमविभागाला किती महत्त्वाचें स्थान आहे हें सहजच दिसून येईल. इतकेंच नव्हे तर

सभ्यांची समाजाची उभारणी पुष्कळ अंशी श्रमविभागाच्या तत्वावर झालेली आहे व श्रमविभागाशिवाय आपला हा मानवी व्यवहाराचा गाडा रेंसभरही हालावयाचा नाहीं, असें ह्मटलें असतांहीं फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं.

**श्रमविभागाचें अनादिकालापासून अस्तित्वः—** हें श्रमविभागाचें तत्व कोणी नवीन शोधून काढलेले नसून समाजाच्या अगदीं सुरवातीपासून कोणत्याना कोणत्यातरी रूपानें तें अस्तित्वांत आहे. प्रख्यात तत्ववेत्ता प्लेटो यानें तर श्रमविभागाचें तत्व हें समाजाच्याच उत्पत्तीचें एक कारण आहे असें ह्मटलें आहे. समाजाच्या अगदीं बाल्यावस्थेंत ज्यावेळीं मनुष्यप्राणि आपल्या सर्व गरजा आपणच भागवितो अशा स्थितीतही स्त्री आणि पुरुष यांच्या कामांची वांटणी झालेली असते. यामुळें जस जसा समाज अधिकाधिक सुधारत जातो तसतसा या श्रमविभागाचाही जास्त जास्त प्रसार होत जातो; कारण पुढें पुढें मनुष्याच्या असें अनुभवास येऊं लागते कीं एका मनुष्यानें शक्यतो एकाच कामांत आपला सर्व वेळ, बुद्धि व सामर्थ्य खर्च करणें हें त्याच्या स्वतःच्या व सर्व समाजाच्याही दृष्टीनें फायद्याचें आहे. आपल्या आर्य पूर्वजांनीं गुणकर्म स्वभावानुसार समाजाची चातुर्वर्ण्य रचना केली तिच्या मुळाशीं सुद्धां हेंच श्रमविभागाचें तत्व असल्याचें आपल्यास दिसून येईल.

**विनिमय अथवा देवघेवः—** श्रमविभागाच्या तत्वानुसार उत्पादनाचें कार्य होऊं लागलें ह्मणजे विनिमय अस्तित्वांत येतो.

विनिमय ह्मणजे देवघेव किंवा अदलाबदल; एक वस्तु देऊन तिच्या-बदला दुसरी वस्तु घेणें. आपण आपल्याला जरूर लागणाऱ्या अनेक वस्तु मुख्यतः विनिमय करूनच मिळवितों. विनिमय अमुक एका वेळेपासून अस्तित्वांत आला हें सांगणें फार कठीण किंबहुना अशक्य आहे. अनादि कालापासून मनुष्य विनिमयाचे योगानें आपल्या गरजा भागवीत आला आहे. अॅडम् स्मिथ् या प्रख्यात इंग्रज अर्थशास्त्रज्ञाचे तर असें ह्मणणें आहे कीं विनिमयाचे योगानें ( परस्पर वस्तूंची अदलाबदल करून ) आपल्याला पाहिजे असलेली वस्तु मिळविण्याची प्रवृत्ति ही मानवस्वभाव विशिष्ट प्रवृत्तींपैकींच एक प्रवृत्ति आहे, व ती दुसऱ्या कोणत्याही प्राण्यांत दिसून येत नाहीं. दोन मनुष्यें ज्याप्रमाणें एकमेकांच्या वस्तूंची अदलाबदल किंवा देवघेव करतांना दिसतात त्याप्रमाणें दुसरे कोणतेही दोन प्राणी अशा तऱ्हेचा देवघेवीचा व्यवहार करतांना आढळत नाहींत. सिंह, वाघ, कुत्रीं, मांजरें वगैरे सारख्या प्राण्यांनीं आपापल्या शिकारींची अगर खाद्यांची एकमेकांत देवघेव केलेली कोणी पाहिली आहे काय? एकंदरींत अशा तऱ्हेनें विनिमय करण्याची प्रवृत्ति ही फक्त मनुष्य-प्राण्यांतच दिसून येते, व आपल्या नेहमींच्या गरजांपैकीं बऱ्याचशा गरजा तो या रीतीनेंच भागवितो.

**विनिमयांतील मूलभूत तत्वः**— आतां या विनिमयाच्या मुळाशीं मुख्य हेतु तरी कोणता असावा? मागें सांगितल्याप्रमाणें मानवी गरजा ह्या अपरिमित असतात व त्यांची तृप्ति कोणत्याही

एका वस्तूनें कधीहीं होत नाहीं. या मुळें मनुष्याची नजर नेहमीं विविधतेकडे असते. तसेंच आपली प्रत्येक गरज अगर वासना अशी आहे कीं तिची तृप्ति अगर समाधान होण्यास लागणारी कोणतीही वस्तु कांहीं विविक्षित प्रमाणापर्यंतच पुरी होते; व त्या प्रमाणापेक्षां अधिक जर ती वस्तु आपल्या जवळ असेल तर ती आपल्याला नकोशीही होते. ह्मणजे कुटल्याही पदार्थाचा आपल्या जवळील संचय कांहीं विविक्षित प्रमाणा बाहेर असला ह्मणजे त्याची आपल्या स्वतःच्या उपयोगाच्या दृष्टीनें जरूरी वाटत नाहींशी होते व त्याचा वीट येऊं लागतो. पण आपली एक इच्छा पुरी झाली कीं, आपल्यास दुसऱ्या एखाद्या वस्तूची वासना उत्पन्न होते, व ती मिळविण्याच्या प्रयत्नाला आपण लागतो. ज्याच्या जवळ पुष्कळसें धान्य आहे अशा एका शेतकऱ्याचें आपण उदाहरण घेऊं. आपल्या शेतकऱ्या जवळ इतकें धान्य आहे कीं, तें त्याला व त्याच्या सर्व कुटुं-बाळासुद्धां पुरेसें होऊन आणखी बरेंचसें शिल्लक राहील. या शिल्लक राहणाऱ्या धान्याची त्याला कांहींच जरूरी नाहीं; पण त्याला आपल्या इतर गरजा भागविण्या करितां दुसऱ्या कित्येक वस्तूंची जरूरी आहे. समजा त्याला कांहीं कापड पाहिजे आहे. आतां त्याच्या जवळ त्याच्या जरूरीपेक्षां अधिक असलेलें तेवढें ह्मणजे त्याला नको असलेलें धान्य घेऊन कापड देणारा कोणी इसम जर भेटेल तर मोठ्या आनंदाने तो आपल्या जवळील धान्य देऊन त्या दुसऱ्या इसमाजवळील कापड घेईल. पण कापडवाला मनुष्य देखील कापड देण्याचे अगोदर

आपल्या जवळ स्वतःच्या गरजा भागून दुसऱ्यास देतां येण्यासारखें कापड आहे किंवा नाहीं व त्या कापडाचे मोबदला जें धान्य मिळणार त्याची त्याला गरज आहे किंवा नाहीं या गोष्टींचा विचार करणारच. म्हणजे त्याच्याजवळ जरूरीपेक्षां अधिक कापड असेल व त्याला धान्याची जरूर असेल तेव्हांच तो धान्य घेऊन कापड देईल.

या प्रमाणें देवघेवीचा सौदा करतांना प्रत्येकाच्या मनांतील हेतूविषयीं आपण थोडासा बारकाईनें विचार केला तर आपल्याला असें दिसून येईल कीं, प्रत्येकजण आपल्या जवळ असलेली पण आपल्यास नको असलेली वस्तु दुसऱ्यास देऊन, त्याचे जवळ असलेली आणि आपल्यास हवी असलेली अशी वस्तु मिळविण्याचा प्रयत्न करीत असतो. म्हणजे विनिमयाच्या मुळाशीं आपल्याला निरुपयोगी अगर कमी उपयुक्त अशा वस्तूच्या मोबदला स्वतःला अधिक उपयुक्त अशी वस्तु मिळविणें हीच एक भावना असते. याचवेळीं विनिमय करणारा प्रत्येक मनुष्य, आपल्या जवळील किती जिन्नस देऊन दुसऱ्या जवळील किती जिन्नस मिळविला असतां आपला फायदा होईल, याचा मनांतल्या मनांत हिशोब करीत असतो व त्या अनुरोधानेंच तो व्यवहार करितो. आतां त्याचा हिशोब चुकीचा असो अगर त्याला भासणाऱ्या एखाद्या वस्तूच्या गरजेबद्दल व उपयुक्ततेबद्दल त्याची कल्पना चुकीची असो, पण निदान त्याच्या दृष्टीनें तरी व्यवहार करतेवेळीं त्याची अशीच भावना असते कीं, या व्यवहारामध्यें आपण दिलें त्यापेक्षां कांहीं तरी अधिक उपयुक्त असें

मिळविलें आहे व त्यामुळें आपला फायदा झाला आहे. आणि अशी जर भावना नसेल तर मनुष्य सहसा स्वखुषीनें देवघेवीचा व्यवहारच करणार नाहीं. **विनिमयाची हीच मौज आहे कीं, त्यांत दोन्ही पक्षानां आपलाच अधिक फायदा झाला आहे असें वाटतें; व प्रत्येकाच्या दृष्टीनें पहातां तें खरेंही असतें.**



## प्रकरण २ रें.

# विनिमयांतील मूलभूत कल्पना.

**किंमत, मोल, उपयुक्तता**:— निरनिराळ्या जिनसांची देवघेव करतांना मनुष्य आपल्याला कमी उपयोगी असलेला जिन्नस देऊन त्या बदली आपल्याला अधिक उपयोगी असलेला जिन्नस मिळविण्याचा प्रयत्न करतो हें आपण नुकतेंच पाहिलें आहे. तसेंच दोन वस्तूंची देवघेव करतांना त्यांचें मोल काय अगर त्यांचें परस्पर विनिमय प्रमाण काय असावें या बद्दल तो आपल्या मनांत हिशोब करीत असतो हेंही आपण पाहिलें आहे. या मोलाच्या कल्पनेलाच विनिमयामध्यें विशेषेंकरून प्राधान्य आहे; व ह्मणून या प्रकरणांत

आपल्याला मुख्यत्वें किंमत, मोल व उपयुक्तता या विनिमयामध्यें अंतर्भूत होणाऱ्या तीन कल्पनांचा विचार करावयाचा आहे.

**किंमत ह्मणजे पैशाच्या स्वरूपांतील मोलः—** हल्लीं आपले सर्व देवघेवीचे व्यवहार पैशाचे सहाय्यानेच चालतात; तेव्हां देवघेवींतील एक वस्तु ठरलेलीच असते. ती ह्मणजे पैसा. तिच्या-बरोबर इतर निरनिराळ्या वस्तूंचा विनिमय व्हावयाचा. अमुक इतक्या पैशाला अमका जिन्नस अमुक इतका मिळतो असें नेहमीं आपण ह्मणतो. हेंच थोड्या निराळ्या शब्दांत सांगावयाचें ह्मणजे आपण त्या पदार्थाची 'किंमत' काय आहे ते सांगतो. किंमत ह्मणजे काय ही कल्पना सर्वांच्या माहितीची आहे. एखाद्या वस्तूची किंमत ह्मणजे तिच्या मोबदला घ्याव्या लागणाऱ्या पैशाचे प्रमाण. ह्या पुस्तकाची किंमत काय असें आपण विचारतो ह्मणजे या पुस्तका बद्दल किती पैसे द्यावे लागतील याची आपण चौकशी करतो. थोड्या शास्त्रीय भाषेंत बोलावयाचें झाल्यास **किंमत ह्मणजे पैशाच्या स्वरूपांतील मोल असें ह्मणतां येईल.**

**'मोल' ह्मणजे काय ?:—** किंमतीची कल्पना जशी सर्व परिचित आहे तशी मोलाची मात्र नाहीं. ह्मणून मोल ह्मणजे काय हें समजण्यासाठीं थोडासा बारकाईनें व खोल विचार केला पाहिजे. नेहमींच्या व्यवहारांत लोक 'किंमत' व 'मोल' हे शब्द बहुधा समानार्थी वापरतात. एखाद्या वस्तूला मोल फार पडतें असें आपण ह्मणतो. या ठिकाणीं आपल्या ह्मणण्याचा उद्देश असा

असतो कीं त्या वस्तूला किंमत जास्त पडते. ह्मणजे तिच्याबद्दल जास्त पैसे द्यावे लागतात. परंतु अर्थशास्त्राचे दृष्टीनें किंमत व मोल यांमध्यें फरक आहे, व मोलाची कल्पनाही किंमतीच्या कल्पनेपेक्षां अधिक व्यापक स्वरूपाची आहे. **एखाद्या वस्तूचें मोल ह्मणजे त्या वस्तूच्या बदली इतर वस्तु मिळविण्याची तिची शक्ति** ह्मणजे ज्याप्रमाणांत तिची इतर वस्तूंबरोबर अदलाबदल होऊं शकते तें प्रमाण. समजा कीं, माझ्याजवळ एक सुंदर घड्याळ आहे. मी जर त्या घड्याळाची अदलाबदल करावयाचें मनांत आणलें तर मला त्याबद्दल एक सायकल द्यावयास एक गृहस्थ तयार आहे. त्याचप्रमाणें कोणी हार्मोनियम, कोणी ग्रामोफोन, कोणी उंची कापडाचा सूट, कोणी चार तोळे सोनें तर कोणी खंडीभर धान्य वगैरे निरनिराळे जिन्नस त्या घड्याळाचे मोबदला मला द्यावयास तयार आहेत. अथवा मला पैसेच पाहिजे असतील तर एकजण १०० रुपयेही द्यावयास तयार आहे. अशा तऱ्हेनें निरनिराळे जिन्नस निरनिराळ्या प्रमाणांत मला त्या घड्याळाबद्दल मिळूं शकतील. ह्मणजे एक सायकल, हार्मोनियम, ग्रामोफोन, उंची कापडाचा सूट, चार तोळे सोनें, खंडीभर धान्य, १०० रुपये इत्यादि निरनिराळ्या तऱ्हेचें त्या घड्याळाचें मोल होऊं शकेल. यावरून आतां लक्षांत येईल कीं एखाद्या वस्तूचें मोल हें तिच्या बरोबर विनिमय होऊं शकणाऱ्या जेवढ्या ह्मणून जिनसा आहेत तितक्या निरनिराळ्या रूपांनीं व्यक्त होऊं शकतें. वरील उदा-

ह्मणांत मी ह्मटलें आहे कीं माझ्या घड्याळाबद्दल मला १०० रु. ही मिळूं शकतील; ह्मणजे माझ्या घड्याळाचें पैशाच्या स्वरूपांतील मोल १०० रुपये झालें. यालाच किंमत असें ह्मणतात.

**किंमत व मोल यांमधील फरकः**—वरील विवेचनावरून किंमत व मोल यांमधील फरक सहज ध्यानांत येईल. किंमत ह्मणजे एका विशिष्ट वस्तूच्या स्वरूपांतील मोल; व ती विशिष्ट वस्तु ह्मणजे समाजामध्यें रूढ झालेला पैसा अगर नाणें ही होय. एखाद्या वस्तूची किंमत ही एका सर्व संमत व विवक्षित अशा रूपांतच (पैशाच्या रूपांतच) असते, पण तिचें मोल मात्र हजारों रूपांत असूं शकतें. यावरून लक्षांत येईल कीं मोल व किंमत यांमधील फरक हा सामान्यविशेष (Genus and Species) या स्वरूपाचा आहे. मोल हें एक 'सामान्य' (Genus) धरलें तर किंमत ही त्याखालीं येणारें एक 'विशेष' (Species) आहे.

**विनिमयमोल व उपयुक्तता-मोलः**—ॲडम स्मिथ् वगैरे कांहीं अर्थशास्त्रज्ञानीं विनिमय-मोल (value-in-exchange) व उपयुक्तता-मोल (value in use) असे मोलाचें दोन प्रकार मानले आहेत. वरील विवेचनांत मोलाचा जो दुसरा अर्थ दिला आहे त्याला ते विनिमय-मोल असें नांव देऊन वस्तूच्या उपयुक्तते-अन्वयें वस्तूचें उपयुक्तता-मोल, अशा तऱ्हेचा मोलाचा आणखी एक प्रकार ते मानतात. परंतु थोडा बारकाईनें विचार केला तर असें दिसून येईल कीं उपयुक्तता-मोल हा शब्दप्रयोगच मुळीं

घोटाळा उत्पन्न करणारा आहे. कारण या कल्पनेमध्यें कार्य व कारण यांचे एकीकरण झालें आहे. उपयुक्तता-मोल या मोठ्या जोड शब्दाचा अगदीं साधा अर्थ ह्मणजे उपयुक्तता एवढाच होतो. केव्हां केव्हां मोल या शब्दाचा उपयोग आपण उपयुक्तता या अर्थानें करतो, परंतु व्यवहारांत इतरही कांहीं शब्दांचा उपयोग त्यांच्या शास्त्रीय अर्थाप्रमाणें केला जात नाहीं; त्यांतलाच प्रकार येथेंही आहे; आणि अर्थशास्त्राचें दृष्टीनें आपण वरील विवेचनांत घेतलेला मोलाचा अर्थच बरोबर आहे.

आतां उपयुक्तता-मोल या शब्दप्रयोगांत कार्य व कारण यांचा संयोग कसा झाला आहे तें पाहूं. कोणत्याही वस्तूला जें मोल येतें, ह्मणजे तिच्याबद्दल इतर वस्तूंची अदलाबदल करावयाला लोक तयार होतात, याचें कारण लोकांना ती उपयुक्त असते. ह्मणून उपयुक्तता हें मोलाचें एक कारण आहे. इतकेंच नव्हें तर कोणत्याही वस्तूला मोल येण्याचें तें एक मुख्य कारण आहे. व मोल हें वस्तूच्या उपयुक्तता या गुणामुळें होणारें एक कार्य आहे. उपयुक्ततेशिवाय वस्तूला मोल असूंच शकत नाहीं. याबरून उपयुक्तता ह्मणजे मोल नव्हे हें दिसून येईल.

**उपयुक्तता ह्मणजे काय?** :— आतां उपयुक्तता ह्मणजे काय तें आपण पाहूं; ह्मणजे मोल व उपयुक्तता यांचेमधील फरक जास्त स्पष्टपणें लक्षांत येईल. उपयुक्तता म्हणजे मानवी वासना अगर गरजांचें (मग त्या कितीही क्षणिक अगर काल्पनिक असोत).

समाधान करण्याची शक्ति. ही शक्ति ज्या वस्तूत असेल तिला उपयुक्तता आहे असें आपण ह्मणतो. अशा तऱ्हेची, मनुष्यांच्या वासना तृप्त करण्याची शक्ति, जर एखाद्या वस्तूत नसेल तर तिला उपयुक्तता नाहीं. आणि जर तिच्यांत उपयुक्तता नाहीं तर ती कोणास घ्यावीशीही वाटणार नाहीं व कोणीही तिच्या मोबदला कांहींही घ्यावयास तयार होणार नाहीं, ह्मणजे तिला मोल येणार नाहीं. उपयुक्तता ह्मणजे मानवी गरजांचें समाधान करण्याचा गुण; ही गोष्ट लक्षांत ठेविली असतां असें दिसून येईल कीं उपयुक्तता हा कोणत्याही वस्तूंमध्यें अंगभूत (inherent) असणारा असा गुण नाहीं तर मानवी वासना अगर गरजा यांच्याशीं संबंधीत ( relative ) असणारा असा गुण आहे. जगामध्यें जर मनुष्य प्राणि नसेल अगर मनुष्यांना कुठल्याच गरजा राहणार नाहींत तर जगांतील कोणत्याही वस्तूला उपयुक्तता राहणार नाहीं. उदाहरणार्थ अन्न व पाणी यांचा उपयोग मनुष्याच्या भूक व तहान या गरजांचें निवारण करण्या करितां होतो. पण जर कांहीं चमत्कारिक विधिघटनेनें मनुष्याची भूक, तहान नाहींशी झाली तर अन्नपाण्याची त्याला जरूरीही लागणार नाहीं व त्यांची त्याला कांहींच उपयुक्तता, ( किंवा हा जाडा संस्कृत शब्द सोडून नेहमीच्या व्यवहारांतील उपयोग हा शब्द घेऊं ) ह्मणजे त्यांचा कांहींच उपयोग राहणार नाहीं आणि त्यांना प्राप्त करून घेण्यासाठीं तो कांहीं प्रयत्नही करणार नाहीं. याचप्रमाणें इतर सर्व वस्तूंची गोष्ट आहे.

ह्मणजे मनुष्य जो एखादी वस्तु मिळविण्याचा प्रयत्न करतो तो त्या वस्तूचा उपयोग त्याची एखादी वासना तृप्त करण्याकडे होतो ह्मणून करतो. याचाच अर्थ असा कीं त्या पदार्थांत अशी वासना तृप्त करण्याची शक्ति आहे; ह्मणजेच त्याच्यामध्यें उपयुक्तता हा गुण आहे.

**उपयुक्तता व मोल यांचा परस्पर संबंधः—** परंतु वस्तूला उपयुक्तता असली ह्मणजे तिला मोल असतेंच असें मात्र नाहीं. उपयुक्तता हें मोलाचें एक कारण आहे ही गोष्ट खरी, पण मोलाचें तेवढें एकच कारण आहे असें मात्र नव्हें. वस्तूला मोल यावयास दुसरीही कित्येक कारणें असतात इतकेंच नव्हें तर निरनिराळ्या वस्तु कमी अधिक प्रमाणांत मनुष्याला उपयोगी असतात ह्मणून त्यांचें मोलही त्याच प्रमाणांत कमी जास्त असेल असेंही नाहीं. उदाहरणार्थ अन्न, पाणी हीं मनुष्याच्या जीवनाला अत्यंत उपयुक्त, नव्हें अत्यंत आवश्यक असणारी अशीं आहेत. उलटपक्षीं हिरे, माणिक, मोतीं वगैरे जिन्नस मानवी जीवनाला आवश्यक तर नाहींतच पण अन्न पाणी वगैरेपेक्षां फारच कमी उपयोगी आहेत. असें असूनही अन्न, पाणी इत्यादि अत्यावश्यक वस्तूंचें मोल हिरे, माणिक वगैरेंच्या मोलापेक्षां अगदींच कमी असतें. यावरून असें दिसून येईल कीं मोल व उपयुक्तता हीं एक तर नाहींतच परंतु त्यांचा एकमेकांशीं कांहीं समप्रमाणबद्ध असा संबंधही नाहीं. वस्तूंचें मोल ठरण्याला ज्या अनेक गोष्टी कारणीभूत होतात त्यापैकीं उपयुक्तता ही एक मुख्य गोष्ट आहे येवढेंच. एखाद्या वस्तूचें

मोल ठरण्यास अनेक निरनिराळ्या गोष्टी कशा कारणीभूत होतात या बद्दल एक उदाहरण घेऊं. एखाद्या नदीमध्यें अगर तलावांत पाणी घेण्याला कांहीं किंमत पडत नाहीं. पण तेंच दूरवरून म्युनिसिपालिटीनें पुष्कळ खर्च करून नळाच्या सहाय्यानें शहरांत आणवून घरोघर पुरविलें ह्मणजे घेण्याला थोडीशी कां होईना पण किंमत ( कर ) द्यावी लागते. जिथें पाण्याचें फार दुर्भिक्ष असतें अशा कांहीं कांहीं ठिकाणीं बरीच किंमत देऊन पाणी विकत घ्यावें लागतें हें आपल्यापैकीं पुष्कळांच्या अनुभवांत आहे. सहारा वाळवंटासारख्या ठिकाणीं तर एखादे वेळीं पेलाभर पाण्याचें मोल शेंकडों रुपयांपेक्षांही अधिक होऊं शकतें. एकंदरींत स्थल, काळ, परिस्थिती वगैरे निरनिराळ्या कारणांमुळें वस्तूंचें मोल निरनिराळें होऊं शकतें.

**वस्तूंना मोल कां येतें ?**:— वस्तूंना मोल कां येतें, त्यांचें मोल कसें ठरतें व त्याला कोणकोणत्या गोष्टी कारणीभूत होतात हे प्रश्न अत्यंत गुंतागुंतीचे असून, त्याबद्दल अर्थशास्त्रज्ञामध्यें बराच वाद आहे. निरनिराळ्या शास्त्रज्ञांनीं आपापल्या मताप्रमाणें निरनिराळीं कारणें दाखवून मोलाबद्दल निरनिराळें सिद्धांत (theories) पुढें मांडले आहेत. हा विषय बराच क्लिष्ट व तितकाच निव्वळ तात्विक वादाच्या स्वरूपाचा असल्यामुळें त्याबद्दल येथें विशेष बारकाईनें ऊहापोह करण्याचें कारण नाहीं; व प्रस्तुत पुस्तकांतील विषय समजण्यास त्याची फारशी जरूरीही नाहीं. ह्मणून त्या निरनिराळ्या

सिद्धांतापैकीं फक्त कांहींची, येथें जरूर तेवढीच माहिती देण्याचा विचार आहे. एका पक्षाचें मत असें आहे कीं वस्तूंमध्यें उपयुक्तता असते ह्मणून त्यांना मोल येतें. याला उपयुक्ततेनुसार केलेला मोलाचा सिद्धांत किंवा थोडक्यांत **मोलाचा उपयुक्तता-सिद्धांत** ( theory of value ) असें ह्मणतात. पण उपयुक्तता हें मोलाचें एकच कारण नव्हें त्याला इतरही अनेक कारणें आहेत; तेव्हां नुसत्या उपयुक्ततेच्या दृष्टीनें ठरविलेला सिद्धांत एकांगी व सदोष आहे.

दुसऱ्या एका पक्षाचें असें ह्मणणें आहे कीं वस्तु निर्माण करावयाला खर्च लागतो ह्मणून वस्तूला मोल असतें. ह्मणजे एखाद्या वस्तूच्या उत्पादनाला जो खर्च लागतो त्यावर त्या वस्तूचें मोल अवलंबून असतें. यावरून एक असें अनुमान निघतें कीं ज्या वस्तूला निर्माण करावयाला जास्त खर्च लागतो तिचें मोल जास्त असलें पाहिजें व ज्या वस्तूला कमी खर्च लागतो तिचे मोल कमी असलें पाहिजे. याला वस्तूच्या उत्पादन-व्ययानुरूप केलेला मोलाचा सिद्धांत अगर **उत्पादन-व्यय सिद्धांत** ( cost of production theory of value ) असें ह्मणतात. प्रत्यक्ष अनुभवांतीं हाही सिद्धांत पूर्णपणें लागू पडत नाहीं. उदाहरणार्थ समजा कीं एका मनुष्यानें सारखाच खर्च करून दोन घरें बांधलीं आहेत. एक अगदीं गावांत, मध्यवस्तींत व व्यापाराचें केंद्र आहे अशा ठिकाणीं व दुसरें अगदीं गांवाबाहेर व मध्यवस्तीपासून लांब अशा ठिकाणीं. वरील मीमांसेनुरूप दोन्ही घरांचें मोल सारखेंच असलें पाहिजें. परंतु

प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र असें आढळून येतें कीं गांवाबाहेर बांधलेल्या घरास कोणी विचारीत नाहीं व गांवांतील घरावर लोकांच्या मागण्यावर मागण्या येतात, व त्याचें मोल वाढतें. आणखी एक उदाहरण घेऊं. एक लंगडा मनुष्य आहे. त्याच्याकडे एक अगदीं थोड्या खर्चांत तयार झालेली कुबडी व तिच्यापेक्षां बराच अधिक खर्च जिला तयार करावयास लागला आहे, अशी एक बायसिकल नेली तर तो बायसिकलपेक्षां कुबडीच अधिक पसंत करील कारण त्याचे दृष्टीनें बायसिकलपेक्षां कुबडीचाच उपयोग त्याला जास्त होणार व ह्मणून बायसिकलपेक्षां कुबडीचें मोल अधिक ठरणार. तसेंच थंडीनें कुडकुडत असणाऱ्या एका मनुष्यापुढें थोड्याशा खर्चांत तयार झालेली घोंगडी व अतिशय परिश्रमानें व खर्चानें तयार केलेलें तलम असें मलमलीचें वस्त्र ठेविलें तर त्याच्या दृष्टीनें मलमलीच्या तलम वस्त्रापेक्षां घोंगडीचेंच मोल अधिक. यावरून हें स्पष्ट होतें कीं वस्तूच्या मोलावर "एकंदर मागणीचा" व मागणी करणाराच्या परिस्थितीचाही परिणाम होतो.

एकंदरींत आपल्याला असें दिसून येईल कीं ज्याप्रमाणें उपयुक्तता हें एकच वस्तूच्या मोलाचें कारण होऊं शकत नाहीं त्याचप्रमाणें उत्पादनाला लागणारा खर्च हेही मोलाचें एकच कारण होऊं शकत नाहीं, तर मोलाच्या कारणामध्यें उपयुक्तता व उत्पादनखर्च या दोहोंचाही समावेश होतो. ह्मणजे वस्तूला मोल येण्याकरितां या दोन्हींही गोष्टींची जरूरी लागते.

त्याचप्रमाणें कोणत्याही वस्तूला मोल येण्याकरितां **ती कोणाच्यातरी मालकीची असावी लागते.** एखादी वस्तु, उदाहरणार्थ हवा जर कोणाच्याच मालकीची नसेल तर तिच्या विनिमयाचा प्रश्नच उद्भवणार नाहीं. कारण ती कोणालाही मोफत मिळूं शकेल. व विनिमयाचा प्रश्न न उद्भवल्यामुळें मोलाचाही प्रश्न साहजीकच उपस्थित होत नाहीं. याचप्रमाणें ही हवा खेळती ठेवण्यासाठीं ह्मणजे एका दृष्टीनें, लोकांस पुरविण्यासाठीं नेहमीं भरगच्च भरणाऱ्या थिएटरमध्यें विजेचे पंखे बसविण्यास खर्च करावा लागतो, त्यावेळीं या हवेच्या पुरवठ्याचें मोल होतें. फक्त या प्रसंगीं तें अप्रत्यक्षरीत्या घेतलें जातें.

आतां एखादी वस्तु उत्पन्न करण्यास खर्च कमी आला असेल. पण अशा तऱ्हेची वस्तु पुष्कळांस हवीशी वाटत असेल, व ती पुन्हां उत्पन्न होऊं शकत नसेल, तर तिचें मोल अधिक वाढेल; उदाहरणार्थ एखाद्या प्राचीन वस्तूला, चित्राला, नाण्याला वगैरे आपण पुष्कळ मोल देण्यास तयार असतोच ना? याचप्रमाणें **वेळेचाही मोलावर परिणाम होतो.** हिंवाळ्याचे आरंभी लोंकरीच्या कापडांचें मोल वाढतें पण त्याच गठ्यांतील कांहीं माल राहिल्यास उन्हाळ्यांत त्याचेच मोल कमी होतें. पुष्कळवेळीं एखादी वस्तु उत्पन्न करण्यास कमी खर्च आला असेल, पण **पुन्हां ती उत्पन्न करण्याचेवेळीं तिचा उत्पादन खर्च बऱ्यचा कारणामुळें वाढलाही असेल;** अशावेळीं प्रथम उत्पादन केलेल्या वस्तुपैकीं जितका साठा विनिमयासाठीं येईल त्या सर्वाचें मोल वाढेल.

**उपयुक्तत्ता, उत्पादन मोल, पुन्हां उत्पादन करण्याचें मोल, वस्तूचा कमिजास्त पुरवठा, वेळेचा व परिस्थितीचा परिणाम वगैरे नाना तऱ्हेचीं कारणें वस्तूस मोल येण्यास एक-समयावच्छेदें-करून कारणीभूत होतात.**



प्रकरण ३ रें.

## आरंभींचा विनिमय व त्यामधील अडचणी.

**ऐनजिनसी देवघेवः**— समाज बाल्यावस्थेंत असतांना लोकांमध्यें जे देवघेवीचे व्यवहार होतात ते ऐनजिनसी पद्धतीनें होय. प्रथमदर्शनीं ही पद्धत फार सोपी दिसते, कारण यामुळें प्रत्यक्ष वस्तूंचीच अदलाबदल होत असल्यामुळें विनिमयाला साधनीभूत अशा तिऱ्हाइत, विशिष्ट पदार्थाची यांत गरज नसते. फार काय, पण समाजांत रूढ असलेल्या, अत्यंत सोईच्या वाटणाऱ्या, व पैशाचे सहाय्यानें होणाऱ्या अशा देवघेवीपेक्षांही ही फार सोपी वाटते; कारण पैशाचा उपयोग केल्यानें एक प्रकारें दोनदां देवघेव करावी लागते व त्यायोगें एकच हेतु साधण्यास, दुप्पट त्रास होतो असें

वाटतें. पण थोडासा बारकाईनें विचार केला तर असें दिसून येईल कीं, हा नुसता भास असून ऐन जिनसी देवघेवींतच जास्त त्रास व गैरसोय आहे. आतां तो त्रास व त्या गैरसोयी कोणकोणत्या प्रकारच्या असतात याची, आपणा सुधारलेल्या व शतकानुशतकें पैशाच्या सहाय्यानेंच ज्यांत सर्व व्यवहार चाललेले आहेत अशा जगांत राहाणाऱ्या लोकांना कल्पनाही होत नाहीं. इतकेंच नव्हे तर पैशाची आपणांस इतकी संवय झाली आहे कीं, त्याच्या सहाय्याशिवाय कधींकाळीं व्यवहार होत असतील अशी आपणांस शंकासुद्धां येत नाहीं. तसेंच पैशाचा उपयोग केल्यानें आपल्या कितीतरी अडचणी दूर होतात तेही लक्षांत येत नाहीं.

**ऐनजिनसी देवघेवींतील अडचणी:— १ सवदा जुळविण्याची पंचाईत:** ऐनजिनसी विनिमयामध्यें पहिली अडचण पडते ती सवदा जुळविण्याची. प्रत्येकाला निरनिराळ्या वस्तूंची निरनिराळ्या प्रमाणांत जरूर असते. याचप्रमाणें प्रत्येकाजवळ कांहीं तरी स्वतःच्या वस्तु असतात व या त्याला पाहिजेच असतील असें नाहीं अगर पाहिजे असल्या तरी त्याच्याजवळील या वस्तूंचा साठा बहुधा त्याच्या गरजेपेक्षां जास्तच असेल; पण त्याला इतर पुष्कळ वस्तूंची जरूरही असेल. त्याच्या जवळील वस्तूंची इतरांना गरज असते; व इतरांपैकीं कांहींजणाजवळील वस्तूंची त्याला गरज असते. अशावेळीं एकमेकांच्या गरजा कशा भागावयाच्या? समजा कीं 'अ' जवळ पांच गाई आहेत व त्याला

दोहोंचीच गरज आहे, पण त्याच्याजवळ त्यास गरज असलेली दोन कांबळीं नाहींत. 'ब' जवळ दहा कांबळीं आहेत व त्याला फक्त चारांचीच गरज आहे. अशावेळीं 'बला' गाईंची जरूर असल्यास एकमेकांच्या गरजा कदाचित् ऐन जिनसी देवघेवीनें भागतील, परंतु अशी साधी स्थिति या नानाविध वस्तूंनीं व अपरिमित गरजा असलेल्या लोकांनीं भरलेल्या जगांत क्वचितच मिळेल. वरील तऱ्हेच्या 'अ' ची व 'ब' ची गांठ कशी पडणार? त्यांतूनही कांबळीवाल्या मनुष्याला फक्त गायींचीच जरूर तरी कशी असणार? समजा या 'बला' धान्याची जरूर आहे. स्वतःच्या जरूरीपेक्षां पुष्कळ अधिक धान्य 'क' जवळ आहे. 'क' ला बैल पाहिजे आहेत, ते 'ड' जवळ आहेत. 'डला' गवत पाहिजे आहे, तें 'ई' जवळ आहे; व या 'ईला' गाई पाहिजे आहेत. अशा परिस्थितींत अला 'ब' जवळचीं कांबळीं कशीं मिळणार? 'अ' नें प्रथम 'ई' ला नंतर 'ड' ला, अशातऱ्हेनें हुडकत गेलें पाहिजे ह्मणजे शेवटीं 'अ' ला कांबळीं मिळतील व प्रत्येकाच्या गरजा भागूं शकतील. यांतही विनिमय परिमाणाचा घोंटाळा विचारांत घेतलाच पाहिजे. तेव्हां अशा तऱ्हेनें या नानाविध वस्तूंनीं भरलेल्या जगांत अपरिमित गरजा असलेल्या लोकांमध्यें देवघेव कशी होणार? **या प्रमाणें ऐनजिनसी देवघेवींत प्रथमतः दोन व्यक्तींचा सवदाच जुळण्याची अडचण पडते.**

याला एकच उपाय आहे; तो असा कीं, प्रत्येकजण आपापल्या वस्तूच्या मोबदला सररहा स्वीकारण्यास तयार होईल

अशी एखादी सर्वसंमत वस्तु ठरवून, त्या वस्तूच्या सहाय्यानें सर्व देवघेवी करावयाच्या. अशी एखादी वस्तु ठरली ह्मणजे निरनिराळ्या जिनसांच्या मालकांना त्या वस्तूच्या सहाय्यानें जरूर ती देवघेव सहज व चांगल्या तऱ्हेनें करितां येईल. आपला माल देऊन वरील सर्वमान्य वस्तु घ्यावयाची व आपल्याला लागेल त्यावेळीं लागेल तो माल घेऊन ती द्यावयाची अशा रीतीनें सर्व व्यवहार होऊं लागतील. या सर्वमान्य वस्तूला **विनिमय-साधन** असें ह्मणतात.

२ **वस्तूंचें परस्पर मोल ठरविण्यास होणारा त्रासः**—दुसरीही एक अडचण ऐनजिनसी विनिमयामध्यें उत्पन्न होते, ती निरनिराळ्या जिनसांचें **परस्पर मोल** ह्मणजे **'परस्पर–विनिमय–प्रमाण'** कसें ठरवावयाचें या बाबतींत होय. घटकाभर आपण असें समजूं कीं नुकत्याच आपण घेतलेल्या उदाहरणांत 'अ' व 'ब' यांना परस्परांजवळ असलेल्या जिनसांची जरूरी आहे. पण प्रत्यक्ष अदलाबदल करावयाचे वेळीं असा एक प्रश्न उपस्थित होईल कीं, एका गाईबद्दल किती कांबळीं द्यावयाचीं ? शिवाय दोन विवक्षित वस्तूंचे बाबतींत (तूर्त आपली गाय व कांबळीं यांचे बाबतींत) जरी हें प्रमाण एखादे वेळीं ठरलें तरी पुन्हां तिसऱ्या वस्तूबरोबर अदलाबदल करावयाची पाळी आली कीं पुन्हां तोच प्रश्न उद्भवणार. कांबळीं देऊन 'अ' ला 'क' कडून धान्य घेण्याचें वेळीं धान्य व कांबळें यांचें परस्पर मोलाचें प्रमाण काय असावें याबद्दल प्रश्न उभा राहाणारच. थोडेसें गणित करून पाहिलें तर आपणांस असें

दिसून येईल कीं जर १०० निरनिराळया वस्तू असल्या, तर त्यांच्या एकमेकांत अदलाबदली ४९५० तऱ्हेनें करतां येतील; ह्मणजे या वस्तूंपैकीं प्रत्येकीचें परस्पर किंमतीचें प्रमाण ठरवूं ह्मटलें तर ४९५० निरनिराळीं प्रमाणें ठरतील. नेहमीच्या व्यवहारांत तर आपल्याला लागणाऱ्या गरजा जशा अगणित आहेत तशाच वस्तूही अगणित आहेत. तेव्हां अशा अगणित वस्तूंचीं निरनिराळीं प्रमाणें कोठवर ठरवीत बसणार? व जो मनुष्य व्यवहार करावयास निघेल त्यानें हीं इतकीं प्रमाणें कोठवर लक्षांत ठेवावयाचीं ?

हा त्रास चुकविण्याकरितां जिच्या मोलाशीं इतर सर्व वस्तूंच्या मोलाचें प्रमाण ठरवितां येईल अशा एखाद्या वस्तूची निवड झाली पाहिजे. एका वस्तूशीं इतर सर्व वस्तूंचें विनिमय प्रमाण ठरल्यामुळें त्यांचें आपापसांत काय प्रमाण पडेल हें अगदीं सहज समजेल. उदाहरणार्थ एका गाईबरोबर दहा कांबळीं, एकमण धान्य, चार बकरीं वगैरे प्रमाणें एकदां ठरलेलीं असलीं ह्मणजे एका कांबळ्याला किती धान्य अगर एका बकऱ्याला किती कांबळीं मिळतील हें सहज समजते. अशा रीतीनें निवड होऊन ठरलेल्या वस्तूला "**साधारण-मूल्य-परिमाण**" (A common measure of value) असें ह्मणतात; व **अशा परिमाणाचा, ऐन जिनसी विनिमयांत अभाव असतो, ही त्यांतील एक मोठीच अडचण आहे.**

**३ कांहीं कांहीं वस्तूंची अविभाज्यता:**— आतां ऐन-जिनसी विनिमयांतील तिसऱ्या एका अडचणीचा आपण विचार करूं.

आपल्याला लागणाऱ्या कित्येक वस्तु अशा आहेत कीं, त्यांचे आपल्याला आपल्या इच्छेनुरूप हवे तेवढे लहान मोठे विभाग पाडता येतात; व विभाग पाडल्यानें त्यांची उपयुक्तताही कमी होत नाहीं. उदाहरणार्थ सोनें, रुपें, धान्य वगैरे जिनसांचे लहान मोठे भाग करून त्यांची अदलाबदल करतां येते; परंतु गाई, ह्मशी, शेळ्या, मेंढ्या, वगैरे जनावरें अगर कांबळीं, कोट, शर्ट, टेबलें, खुर्च्या वगैरे तयार केलेले जिन्नस यांचे भाग कसे पाडावयाचे? आपल्या प्रारंभीच्या उदाहरणामध्यें 'अ' जवळ देण्यासारखी गाय असून त्याला एकच कांबळें पाहिजे आहे असें समजा. आतां एका कांबळ्या पेक्षां गाईची किंमत अधिक असल्यामुळें एका कांबळ्याची किंमत द्यावयाची ह्मणजे गाय कापून द्यावी लागेल. अशा स्थितींत सवदा करतां येणार नाहीं किंवा सबंध गाईच्या किंमतीची येतील तेवढीं कांबळीं, मग तीं त्याला पाहिजे असोत वा नसोत, घेतलीं पाहिजेत. **सारांश कांहीं कांहीं जिनसांच्या बाबतींत त्यांची उपयुक्तता व मोल कायम राखून, त्यांचे आपल्याला जरूर लागतील त्या प्रमाणें विभाग करतां येत नाहींत व अशा ठिकाणीं ऐन जिनसी व्यवहार होण्यास मोठीच पंचाईत पडते.**

या प्रमाणें ऐनजिनसी विनिमयांतील मुख्य अडचणी आहेत. समाज जसजसा सुधारत जातो तसतशा त्याच्या गरजा वाढत असल्यामुळें विनिमयाच्या कार्यांतील या अडचणी मनुष्याला जास्त जास्त तीव्रतेनें भासूं लागतात व त्या दूर करण्याचे उपाय तो शोधूं लागतो.

**विनिमयाला आवश्यक असणऱ्या गोष्टीः—** आजच्या समाजस्थितींत पुढें दिलेल्या चार गोष्टी, ह्या विनिमयाला आवश्यक आहेत. त्यांच्या अभावीं देवघेवीचा व्यवहार करणें जवळ जवळ अशक्य होईल असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति तर होणार नाहींच, पण या चारांमध्यें जसजशा सुधारणा होऊन त्यांची प्रगति होत जाईल तसतसें देवघेवीचे व्यवहार करणेंही अधिकाधिक सोपें, सोईचें, सुखाचें व फायद्याचें होईल यांत शंका नाहीं. त्या चार गोष्टी येणेंप्रमाणें आहेतः—

( १ ) पैसा अथवा विनिमय–साधन ( Medium of exchange. )

( २ ) बाजार अथवा वस्तु खरेदी विक्री करण्याच्या जागा ( Markets. )

( ३ ) माल ने आण करण्याचीं साधनें ( Means of transport. )

( ४ ) व्यापारी ( Merchants. )

या पैकीं माल ने आण करण्याची साधनें व व्यापारी, यांच्याशीं आपल्याला प्रस्तुत कांहीं करावयाचें नाहीं. तेव्हां पुढील प्रकरणांत 'बाजार' याबदल थोडीशी माहिती देऊन नंतर विनिमयाला आवश्यक अशी जी मुख्य गोष्ट ' पैसा ' तिच्याकडे वळूं.



## प्रकरण ४ थें.

# बाजार व बाजारभाव.

**बाजाराचें महत्त्वः—** विनिमयाचें कार्य सुलभ होण्यास पैशाची अत्यंत जरूरी आहे ही गोष्ट जरी खरी असली तरी तें कार्य नुसतें पैशानेंच भागतें असें नाहीं. मनुष्याला भासणारी, विनिमय करावयास लागणाऱ्या प्रत्यक्ष साधनांची अडचण पैशाचे योगानें नाहींशीं होईल; परंतु विनिमय करूं इच्छिणारे लोक एकमेकांना भेटले तरी पाहिजेत ? देवघेव करण्याची इच्छा व साधनें असलेले लोक पुष्कळ असतील; पण एक या ठिकाणीं तर दुसरा येथून चार कोस दूर व तिसरा कोठें तरी तिसरी कडेच, अशी स्थिति असल्या-वर प्रत्येक वेळीं आपल्याला हवा असणारा इसम कुठें शोधीत बसावयाचें ? एवढ्याच साठीं देवघेव करणारे लोक एकमेकांना कोठें तरी भेटतील अशी कांहीं ठरावीक जागा पाहिजे. अशा जागांनाच आपण बाजार ह्मणतो. या वरून **बाजार ह्मणजे जिन्नस खरेदी विक्री करणाऱ्या लोकांची, देवघेवीसाठीं एकत्र येण्याची जागा होय असें** दिसून येईल. विनिमयाप्रमाणेंच, ‘बाजारही’ फार प्राचीन काळीं समाजाच्या उत्क्रांतीच्या अगदीं आरंभापासून आस्तित्वांत आलेले आहेत. थोडक्यांत असें ह्मणतां येईल कीं विनिमयाबरोबरच ‘बाजाराला’ अस्तित्व येतें, आणि बाजारा-

शिवाय विनिमय सुलभही होत नाहीं व त्याचा प्रसारही होत नाहीं. ह्मणजे **विनिमय व बाजार हे परस्परावलंबी आहेत** असें ह्मणावयास हरकत नाहीं.

**बाजाराची लौकिक व शास्त्रीय व्याख्याः**— जिन्नस खरेदी विक्री करणाऱ्या लोकांची देवघेवीसाठीं एकत्र येण्याची जागा ह्मणजे बाजार असें जें वर सांगितलें आहे तिला बाजाराची लौकिक व्याख्या असें ह्मणतां येईल. याच अर्थानें बाजार हा शद्ब आपण नेहमींच्या बोलण्याचालण्यांत वापरतों. या ठिकाणीं बाजार ह्मणजे एक विवक्षित जागा असा अर्थ होतो. त्याचप्रमाणें बाजार ह्मटला कीं त्याठिकाणीं खरेदी विक्री करणारे लोक प्रत्यक्ष जातीनें हजर आहेत अशीही आपली कल्पना असते. मुंबईचें क्रॉफर्डमार्केट अगर पुण्यांतील रे मार्केट हीं बाजाराच्या लौकिक अर्थाचीं उदाहरणें ह्मणून देतां येतील. अशा प्रकारचे बाजार सर्व मोठमोठ्या शहरांतून अनेक असतात.

पण अर्थशास्त्राच्या भाषेंत बाजार ह्या शद्बाला थोडा वेगळा अर्थ आहे. बाजार ह्मणजे त्या ठिकाणीं खरेदी विक्री करणारे लोक प्रत्यक्षच हजर पाहिजेत असें नाहीं. इतकेंच नव्हे तर अर्थशास्त्राचे दृष्टीनें बाजार हा एखाद्या विवक्षित जागेंतच असला पाहिजे असेंही नसून तो स्थानिक, राष्ट्रीय, फार काय पण अंतरराष्ट्रीय देखील असूं शकतो. त्यामध्यें खरेदी–विक्री करणाऱ्या लोकांनीं प्रत्यक्ष हजर असणें ही गोष्ट मुद्याची नसून ह्या लोकांमध्यें एखाद्या वस्तूच्या

खरेदी–विक्रीसाठीं आपापसांत चढाओढ सुरू असली पाहिजे ही मुख्य मुद्याची गोष्ट आहे. अशा तऱ्हेची चढाओढ असली व त्या प्रमाणें वस्तूंची देवघेव होत असली ह्मणजे झालें. या देवघेव करणाऱ्या लोकांनीं प्रत्यक्ष हजर असण्याची जरूरी नाहीं कारण गैरहजर असूनही अशी चढाओढ करितां येते. यावरून अर्थशास्त्राच्या भाषेंत बाजार ह्मणजे आपण नेहमींच्या व्यवहारांत समजतों त्याप्रमाणें एखादी विवक्षित जागा नसून **एखाद्या विवक्षित वस्तूकरितां आपापसांत चढाओढ करून खरेदी–विक्री करणाऱ्या लोकांचा समूह होय** हें दिसून येईल. मग ते एकमेकांपासून हजारों मैल दूर असले तरी हरकत नाहीं. ह्मणजे **देवघेव करणाऱ्या लोकांचे जितके निरनिराळे समूह तितके निरनिराळे बाजार होत.** आपण सोन्याचा बाजार, कापसाचा बाजार, शेअरबाजार इत्यादि जेव्हां जेव्हां ह्मणतों तेव्हां तेव्हां आपण ‘ बाजार ’ हा शब्द या अर्थानेंच उपयोगांत आणतों. मग सोन्याची वगैरे खरेदी विक्री करणारे लोक निरनिराळ्या ठिकाणीं असले तरी हरकत नाहीं.

**बाजाराचें वैशिष्ट्यः**— पूर्णपणें संघटित झालेल्या बाजारामध्यें त्या बाजाराच्या कोणत्याही भागांत कोणत्याही वस्तूला एका वेळीं एकच किंमत असते, व ती खरेदी विक्री करणाऱ्या लोकांच्या आपापसांतील चढाओढीनें ठरली जाते. अशा **चढाओढीनें ठरलेली सार्वत्रिक एक किंमत हेंच बाजाराचें मुख्य वैशिष्ट्य होय.**

जितक्या प्रमाणांत बाजाराची संघटना झाली असेल, तितक्या प्रमाणांत चढाओढीला जास्त वाव मिळतो व त्या बाजाराच्या मर्यादेंत कोणत्याही ठिकाणीं एकाद्या वस्तूचा एकच भाव ठरण्याची व तो रहाण्याची अधिक प्रवृत्ति असते. अर्थातच ती वस्तु एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेण्यास लागणारा खर्च हा या ठिकाणीं आपण लक्षांत घेतला नाहीं; व हा खर्च ज्या प्रमाणांत कमी जास्त होईल त्या प्रमाणांत त्या वस्तूच्या किंमतींत थोडा बहुत फरक हा पडणारच, ही गोष्ट आपण विसरतां कामा नये.

**स्थानिक, राष्ट्रीय व अंतरराष्ट्रीय बाजारः—** अर्थशास्त्राच्या दृष्टीनें बाजार हे स्थानिक, राष्ट्रीय अगर अंतरराष्ट्रीयही असूं शकतात असें वर सांगितलें आहे; हें कसें तें पुढील कांहीं उदाहरणांवरून समजेल. कांहीं कांहीं वस्तूंना फक्त स्थानिक बाजारच असूं शकतात. उदाहरणार्थ अगदीं पक्व झालेलीं फळें, ताजें दूधदुभतें, ताजा भाजीपाला, ताजे मासे इत्यादि वस्तु फार वेळ टिकणें शक्य नसतें ह्मणून त्या फार दूरच्या ठिकाणीं पाठवितां येत नाहींत. त्यामुळें अशा वस्तूंची खरेदी—विक्री, त्या ज्या ज्या ठिकाणीं उत्पन्न होतात त्या त्या ठिकाणीं अगर थोड्या आसपासच्या प्रदेशांत होते. अशा वस्तूंच्या बाजारास स्थानिक बाजार ह्मणतात. तसेंच अशा कांहीं वस्तु असतात कीं त्यांना फक्त कांहीं विशिष्ट देशांतूनच मागणी येते; व तेवढ्या देशामध्येंच त्यांच्या खरेदी विक्री बद्दल चढाओढ असते. अशा वस्तूंना राष्ट्रीय बाजार मिळतो.

ह्मणजेच त्यांच्या बाजारास ‘ राष्ट्रीय बाजार ’ ह्मणतात. उलट कांहीं वस्तूंच्या खरेदी विक्रीबद्दल, सर्व जगांतील खरेदी विक्री करणारांमध्यें चढाओढ असते. उदाहरणार्थ सोनें, चांदी, कापूस, गहूं, तांबें, लोखंड इत्यादि वस्तूंच्या खरेदी विक्रीबद्दल सर्व जगांतील लोकांमध्यें चढाओढ चाललेली असते व ह्मणून अशा वस्तूंच्या बाजारास ‘ अंतरराष्ट्रीय बाजार ’ असें ह्मणतात.

**प्राचीन व अर्वाचीन बाजार**:— औद्योगिक सुधारणा, निरनिराळे यांत्रिक व शास्त्रीय शोध, देवघेवीच्या साधनांमध्यें झालेली वाढ व सुधारणा इत्यादि गोष्टींच्या योगानें बाजाराच्या स्वरूपामध्यें पूर्वीपेक्षां हल्लीं फारच फरक पडला आहे. पूर्वीच्या काळीं बाजार ह्मटला ह्मटजे त्यांत पुढील पांच विशिष्ट गोष्टींचा समावेश होत असे:—

१ खुला व्यवहार ( Publicity of market dealings )

२ व्यापारास पूर्ण मोकळीक ( Freedom of trade )

३ चढाओढीनें वस्तूंच्या किंमती ठरणें (Competition prices)

४ ठराविक वेळ व जागा ( Limits of time & space )

५ सट्टे करण्यास प्रतिबंध ( Restraint on speculation )

बाजारांतील सर्व देवघेवीचा व्यवहार उघडपणें चारचौघा देखत होत असे; व तेथें गुप्त अगर छपवा छपवीच्या व्यवहाराला वाव मिळत नसे. कारण गुप्तपणें व्यवहार करून लोकांना फसवाफसवी वगैरे करतां येऊं नये ह्मणून कांहीं कांहीं देशांत सरकार सुद्धां बाजारावर देखरेख ठेवीत असे. आपल्या इकडे अद्यापही

ज्याप्रमाणें ठिकठिकाणीं यात्रा भरतात व तेथें मोठमोठे देवघेवीचे व्यवहार चालतात त्याचप्रमाणें पूर्वीं इंग्लंड वगैरे सर्व पाश्चात्य देशांत देखील मोठमोठ्या 'जत्रा' भरत असत व तेथें व्यापारी लोक आपला माल विकावयास मांडीत असत; आणि बऱ्याच मोठ्या प्रमाणावर मालाची खरेदी विक्री होत असे. अशा ठिकाणीं व्यापारावर गिऱ्हाइकांच्या सोईसाठीं बरेच निर्बंधही घालण्यांत येत असत. उलटपक्षीं व्यापाऱ्यांनांही आपला माल बाजारांत आणल्यावर आपल्या इच्छेप्रमाणें विकण्याची मोकळीक असे. तसेंच मालाच्या किंमतीही व्यापाऱ्यांच्या व गिऱ्हाइकांच्या आपसांतील चढाओढीनें ठरत असत. सट्टे वगैरे करावयाची कोणाला परवानगी नसे. बाजारांत अगोदर माल खरेदी करून तोच माल पुन्हां तेथेंच जास्त किंमतीनें विकण्यास बंदी असे. व या विरूद्ध वर्तन करणारावर सरकार कायदेशीर इलाज करीत असे. त्याचप्रमाणें बाजाराचीं ठिकाणें व दिवसही ठरलेले असत; व हल्लींच्या मोठमोठ्या शहरांप्रमाणें रोजच्यारोज बाजार भरत नसत. आपल्याकडे देखील अद्याप पुष्कळ ठिकाणीं आठवड्यांतून एकाद्या विवक्षित दिवशींच व ठराविक जागींच बाजार भरत असतात.

परंतु हल्लीं पूर्वींपेक्षां कितीतरी फरक झाला आहे. पतीचा ( credit ) प्रसार व विद्युतशक्ति यांनीं बाजाराच्या मर्यादा वगैरे पार नाहींशा करून, निदान त्या कल्पनातीत वाढवून, सर्व जग हें एका बाजाराच्या कक्षेंत आणिलें आहे. तसेंच या सगळ्या 'जगाच्या

बाजारांत' धाउक खरेदी–विक्री व किरकोळ खरेदी–विक्री असे दोन भाग पडून पहिल्या प्रकारांत सट्टयाचा व्यवहार पूर्णपणें जोरांत चाललेला आहे. तेव्हां पूर्वी सारखें सट्टयाला नियंत्रण असण्याऐवजीं उलट ( एक प्रकारें ) जास्तच उत्तेजन दिलें जात असल्याचें आपल्या दृष्टोत्पत्तीस येते. बाकीच्या राहिलेल्या तीन गोष्टींचें ह्मणजे खुला व्यवहार, व्यापाराला पूर्ण मोकळीक व चढाओढीनें किंमती ठरणें, यांचे मात्र हल्लीच्याही बाजरांत पूर्वी प्रमाणेंच अस्तित्व आहे असें प्रत्यक्ष व्यवहारांत नसलें तरी तत्वतः तरी मानण्यांत येतें.

**वस्तूची बाजारांत किंमत कशी ठरते ? :—** आतां आणखी एका प्रश्नाचा थोडक्यांत विचार करून हें प्रकरण पुरें करूं. एखादी वस्तु बाजारांत विकावयास आली ह्मणजे तिची किंमत कशी ठरते ? या प्रश्नाचें थोडक्यांत उत्तर असें आहे कीं, **कोणत्याही वस्तूची बाजारांतील किंमत** [तिचा बाजारभाव] **मागणी आणि पुरवठा यांच्या अनुरोधानें ह्मणजे यांच्या एकमेकांवरील परिणामानें ठरते. यालाच किंमती संबंधींचा 'मागणी आणि पुरवठा' नियम ह्मणतात.** तेव्हां 'मागणी' ह्मणजे काय, 'पुरवठा' ह्मणजे काय व 'मागणी आणि पुरवठा' हा नियम काय आहे हे आतां आपण पाहूंया.

**मागणी ह्मणजे काय ? :—** मनुष्याला एखाद्या वस्तूची वासना असली ह्मणजे त्या वस्तूला मागणी येण्याचा संभव असतो; परंतु मागणी येईलच असें एवढ्यावरून सांगता येत नाहीं. कारण

'मागणी' या शब्दाचा अर्थ एखाद्या वस्तूबद्दल मनुष्याची वासना असणें अगर त्याला ती पाहिजे असणें इतकाच नाहीं. एखाद्याला कोणत्याही वस्तूची वासना असूं शकेल. मोटार विकत घ्यावी अशी एखाद्याला वासना असली ह्मणजे ही कांहीं त्या वस्तूला त्याची मागणी नव्हे. कोणतीही वस्तु आपल्याला मिळावी अशी जरी पुष्कळ इच्छा असली तरी ती वस्तु विकत घेण्याला जवळ सामर्थ्य ह्मणजे पैसा जर नसेल तर त्या इच्छेचा काय उपयोग? असली इच्छा हवेंतील मनोऱ्या प्रमाणेंच होय. 'उत्पद्यन्ते विलीयन्ते दारिद्राणां मनोरथाः' या श्लोकार्धांत सांगितल्याप्रमाणें दरिद्री लोकांच्या वासना जशा उत्पन्न होतात तशाच त्या नाहींशाही होतात. त्यांना मागणीचें स्वरूप येत नाहीं. अशा वासनांना मागणीचें स्वरूप प्राप्त होण्याकरितां त्यांना पैशाचें [ह्मणजे त्या वासनांच्या पूर्तीसाठीं लागणाऱ्या सामर्थ्याचें] पाठबळ पाहिजे. तें जर नसेल तर एरवीं सर्वच वासनांना मागणीचें रूप येणार नाहीं परंतु यामध्यें वासनेची उत्कटता व पैशाचें सामर्थ्य यांच्या एकमेकांवर होणाऱ्या परिणामाचेंच मागणींत रूपांतर होतें हें लक्षांत टेविलें पाहिजे. वासना जशी उत्कट असेल त्या प्रमाणांतच मनुष्य पैसे देण्यास तयार होतो; व मनुष्याजवळ ज्या मानानें पैसा असेल त्या मानानेंच त्यास वासनेकडे लक्ष देतां येतें. सारांश **'मागणी' मध्यें 'वासना' व 'पैशाचें सामर्थ्य' या दोन्ही गोष्टींचा समावेश** विशिष्ट तऱ्हेनें होतो. प्रस्तुतच्या विवेचनामध्यें 'मागणी' या शब्दाला

त्याच्या नेहमींच्या अर्थापेक्षां थोडा निराळा, संकुचित व विशिष्ट असा अर्थ आहे हें दिसून येईल. **मागणी असलेला माल ह्मणजे एका विविक्षित बाजारांत, विविक्षित वेळेला व विविक्षित किंमतीला मागणी केलेला** [ गिऱ्हाइकांनीं घेऊं केलेला ] **सर्वच माल होय.**

अशा या मागणी संबंधीं अर्थशास्त्रज्ञांनी एक सर्व साधारण नियम ठरविला आहे तो असाः– " **जसजशी एखाद्या वस्तूची किंमत कमी कमी होत जाते तसतसें** ( किंमती व्यतिरिक्त इतर सर्वगोष्टी ह्मणजे वासना, आर्थिक परिस्थिती, इत्यादि होत्या तशाच आहेत असें गृहीत धरून ] **मागणी केलेल्या मालाचें प्रमाण वाढत जातें; व जसजशी वस्तूची किंमत वाढत जाते तसतसें** [ पुन्हां इतर गोष्टी होत्या तशाच आहेत असें गृहीत धरून ] **हें प्रमाण कमी कमी होत जातें.** "

पण ज्याप्रमाणांत एखाद्या वस्तूची किंमत कमी अगर जास्त होते, बरोबर त्याच प्रमाणांत त्या वस्तूची मागणी जास्त अगर कमी होते असें मात्र नाहीं. उदाहरणार्थ मीठ या अत्यंत उपयोगी वस्तूची किंमत चौपट वाढविली तर मिठाला मागणी कमी होईलच, पण पूर्वींच्या चतुर्थांशा इतकी खास कमी होणार नाहीं. कारण मीठ हा सर्वांस अत्यंत उपयुक्त पदार्थ असलेनें गरीब लोकांस इतर एखाद्या वस्तूवरील खर्च कमी करून कां होईना पण जरूर तें मीठ घ्यावेंच लागेल. याच्या उलट याच मिठाची किंमत दसपट कमी केली तरी

याला मागणी दसपट मुळींच वाढणार नाहीं हेंहि उघडच आहे. याचप्रमाणें वरील नियम देतांना 'इतर सर्व गोष्टी होत्या तशाच आहेत' हें गृहीत धरिले आहे हेंहि पूर्ण लक्षांत ठेविले पाहिजे. कारण समजांतील रूढी बदलल्यास अगर लोकांच्या आर्थिक परिस्थितीवर विशेष परिणाम झाला असल्यास एखाद्या वस्तूच्या मागणीमध्यें किंमती संबंधी बदल न होतांच परिणाम होतो हें विसरतां कामा नये. एकंदरींत कोणत्याहि विशिष्ट प्रमाणांत होणारा असा **हा प्रमाणबद्ध फरक नसून, असा फरक होण्याची ही एक प्रवृत्ती आहे** ही गोष्ट या ठिकाणीं लक्षांत ठेविली पाहिजे. साधारणतः वस्तूच्या किंमतींत फरक झाला कीं मालाच्या मागणीच्या प्रमाणांतही फरक होतो, व हा फरक नेहमीं व्यस्त प्रमाणांत असतो.

हा मागणीचा नियम सगळीकडे लागूं पडतो; व याची उदाहरणेंही आपल्या सभोंवती हवी तितकी पहावयास मिळतील. पूर्वी ज्यावेळीं पैशाला एक पोस्ट कार्ड मिळत असे त्यावेळीं एखाद्या मनुष्याला आपला इतर सर्व खर्च वगैरे लक्षांत घेतां महिना दोन आण्याची कार्डें घेण्याला परवडत असले तर आतां एका कार्डाची किंमत दोन पैसे झाल्याबरोबर (त्याची इतर सर्व परिस्थिती पूर्वी प्रमाणेंच आहे असें धरून) त्याला पूर्वीप्रमाणें दरमहिन्याला ८ कार्डें लिहिण्यास परवडणार नाहीं; व खरोखरच कार्डपाकिटांचे दर वाढल्या बरोबर दरसाल पत्रें पाठविण्याचें प्रमाण कमी झालें असें अनुभवास आले आहे. तसेंच महिना दोन रुपये देऊन कामाला

गडी मिळत असतांना एखाद्या मनुष्याला गडी ठेवणें परवडत असेल तर तो गडी महिना चार रुपये मागूं लागला ह्मणजे तो इसम गड्या शिवाय आपलें काम भागविण्याचा प्रयत्न करील व गडी काढून टाकील. परंतु तेंच जर दरमहा १ रु. ला गडी काम करूं लागेल तर पूर्वीं २ रु. दरमहाचा दर असतांना सुद्धां ज्या लोकांना गडी ठेवणें परवडत नव्हते परंतु ज्याना १ रु. गड्याप्रीत्यर्थ खर्च करणें परवडते असें लोकही गडी ठेऊं लागतील; व असें लोक पुष्कळ असतील. तसेंच ५००० रु. ला मोटार मिळत असतांना जितकें लोक मोटार घेतील त्या पेक्षां जास्त लोक मोटारीची किंमत ३००० रु. झाली असतां घेऊं लागतील. कारण पूर्वीं ज्यांना पांच हजार रु. मोटारीसाठीं खर्चण्याची ऐपत नव्हती परंतु तीन हजार खर्च करण्याची ऐपत होती असे लोक मोटारी शिवाय भागवीत असत ते आतां मोटारीची किंमत त्यांच्या आटोक्यांत आल्याबरोबर मोटारी घ्यावयाला सुरवात करतील व अशा तऱ्हेनें मोटारींना मागणी जास्त येईल; परंतु मोटारींच्या किंमती वाढूं लागल्यास याच्या उलट परिणाम होईल. मिठासारख्या अत्यंत जरूरीच्या जिनसावरील कर देखील सरकारनें वाढविला असतां त्याची किंमत वाढल्यामुळें खप कमी झाला असें उदाहरण अगदीं अलीकडे आपल्या आठवणींत घडलें आहे. वरील प्रमाणें थोडक्यांत मागणीच्या नियमाचें स्वरूप आहे.

**पुरवठा ह्मणजे काय? पुरवठ्याचा नियम :—** 'मागणी' या शब्दाच्या विविष्ट अर्थाप्रमाणेंच 'पुरवठा' या शब्दा-

लाही विशिष्ट अर्थ आहे. 'पुरवठा' ह्मणजे देशांत तयार असलेला एकूणएक माल नव्हे, तर **एका विविक्षित ठिकाणीं, विविक्षित वेळेला व विविक्षित किंमतीला देऊं केलेला ह्मणजे विकावयास काढलेला सर्व माल.** एखाद्या वस्तूचा पुरवठा अर्थातच त्या वस्तूची उत्पादन शक्यता, लोकांमधील रूढी, प्रचलित किंमत वगैरे पुष्कळ गोष्टींवर अवलंबून आहे. पण आपणांस या विविध कारणांशीं याठिकाणीं कर्तव्य नाहीं.

अशा या पुरवठ्यासंबंधीही अर्थशास्त्रज्ञांनीं एक ठोकळ नियम ठरविला आहे. हा नियम पुढील प्रमाणें आहे:

"जसजशी एखाद्या वस्तूची किंमत वाढत जाते तसतसें [इतर सर्व गोष्टी (पा. ४० पहा) पूर्वीं प्रमाणेंच आहेत असें गृहीत धरून] विक्रीस काढलेल्या मालाचें प्रमाणही वाढत जातें; व जसजशीं किंमत कमी होत जाते तसतसें (इतर सर्व गोष्टी पूर्वींप्रमाणेंच आहेत असें गृहीत धरून) त्या विविक्षित किंमतीस विकावयास काढलेल्या मालाचें प्रमाणही कमी होत जातें." अगर थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे "**एखाद्या वस्तूची किंमत जसजशी वाढत जाते तसतसा** (इतर सर्व गोष्टी पूर्वींप्रमाणेंच आहेत असें गृहीत धरून) **त्या वस्तूचा 'पुरवठा' वाढत जातो व जसजशी ही किंमत कमी होत जाते तसतसा** [इतर सर्व गोष्टी पूर्वींप्रमाणेंच आहेत असें गृहीत धरून] **तिचा पुरवठाही कमी होत जातो.**" अर्थात या ठिकाणीं पुरवठा या शब्दाचा आपण आरंभी पाहिलेला

विशिष्ट अर्थ घ्यावयाचा हें निराळें सांगावयास नकोच. हा नियमही अगदीं उघडच आहे. मालाची किंमत कमी होऊं लागली कीं व्यापारी आपल्या जवळचा माल विकेनातसे होतात. कारण कमी किंमत असतांना माल विकूं लागल्यास त्यांचा तोटा होईल. ह्मणून व्यापारी लोक आपल्या जवळील माल बाहेर विक्रीसाठीं न काढतां पुढें चांगला दर आल्यावर विकता येईल या आशेनें शक्य तितक्या वेळ दाबून ठेवितात. उलटपक्षीं एखाद्या जिनसाची किंमत वाढूं लागली तर पुष्कळ अधिक लोक आपल्या जवळील माल विकावयास तयार होतात; व या मालाचें उत्पादनही जरूर तितके वाढविण्याचा शक्य तो प्रयत्न पुष्कळच लोक करूं लागतात.

यासाठीं आपण एक लहानसें उदाहरण घेऊं. साखरेचा भाव चार रुपये मण आहे. या भावानें साखरेचा कांहीं एक 'पुरवठा' आहे. हा भाव थोडासा वाढला—समजा तो सव्वाचार रुपये झाला, तर वाढल्या भावाचा फायदा घेण्यासाठीं तात्र्डतोब पुष्कळ व्यापारी शक्य तितकी जास्ती साखर विक्रीस काढतील व साखरेचे कारखानदारही शक्य तितका जास्ती माल उत्पन्न करून त्याची विक्री करण्याचा प्रयत्न करतील थोडक्यांत ह्मणजे साखरेचा 'पुरवठा' वाढेल. याच्या उलट समजा कीं हा भाव साडेतीन रुपये झाला तर कमी भावानें साखर विकण्याचे ऐवजीं पुष्कळ व्यापारी पुढें भाव वाढेल या आशेने आपल्या जवळील शक्य तितकी साखर विक्रीस न मांडण्याचा प्रयत्न करतील. एकंदरींत साखरेचा पुरवठा कमी होईल यांत शंकाच नाहीं. परंतु

हा नियमही प्रमाणबद्ध नसून ही एक प्रवृत्तीच आहे. प्रचलित दर, लोकांची आवड, पदार्थाचा टिकाऊपणा, पुनरुत्पादनाची शक्यता, व्यापाऱ्याची भांडवल गुंतवून ठेवण्याची तयारी वगैरे विविध कारणांच्या एकत्रित पारिणामावरच पुरवठ्याच्या कमीजास्तीचें प्रत्यक्ष प्रमाण अवलंबून आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

**मागणी व पुरवठा यांचें समीकरणः**—मागणी व पुरवठा यांचे हे दोन नियम थोडक्यांत वरीलप्रमाणें आहेत. आतां या दोन नियमांचें एकीकरण करून पुढील प्रमाणें मागणी व पुरवठा यांचें समीकरण ( The equation of demand and supply ) तयार होते. "**कोणत्याही बाजारांत मालाची किंमत अशी ठरते कीं त्या किंमतीला मागितलेल्या मालाचें मागणीचें परिमाण, त्या किंमतीला विकावयास काढलेल्या मालाच्या** ( पुरवठ्याच्या ) **परिमाणाबरोबर होईल.**" यावेळीं शक्य तितके जास्ती व्यापारी व गिऱ्हाइकें यांचें समाधान होतें; व याचप्रमाणें सबंध बाजारांत एकच किंमत असते हें विसरता कामा नये. हें समीकरण घडवून आणणारी शक्ति ह्मणजे चढाओढ होय. बाजारांत नेहमीं एका बाजूला व्यापारी व दुसऱ्या बाजूला गिऱ्हाईक यांची ऐकमेकांत चढाओढ चालू असते. त्याचप्रमाणें व्यापाऱ्यांत व गिऱ्हाइकांतही आपापसांत चढाओढ सुरू असते. कारण प्रत्येक इसम आपल्याला परवडेल ती किंमत बोलत असतो; ही चढाओढ मागणी व पुरवठा यांची बरोबरी होईपर्यंत चालते.

एका उदाहरणानें वरील समीकरण स्पष्ट होईल. समजा कीं बाजरांत पांच व्यापारी आहेत व एकप्रकारचा जिन्नस त्यापैकीं प्रत्येकांस कमीतकमी पुढील किंमतीस देण्यास परवडते.

अला ( व्यापारी ) १ रु. , बला २ रु. , कला. ३ रु. , डला ४ व ईला ५ रु. .

आतां समजा कीं या तऱ्हेच्या वस्तु घेण्यास बाजारांत पांचच गिऱ्हाइकें आलीं आहेत. त्यांपैकीं प्रत्येकाची जास्तींत जास्त पुढील प्रमाणें किंमत देण्याची तयारी आहे.

अ [ गिऱ्हाईक ] ची १ रु. , बची २ रु. , कची ३ रु. , डची ४ रु. , व ईची ५ रु. .

अशा परिस्थितींत बाजारांत किंमत कशी ठरणार? आतां समजा कीं वरील जिनसाची किंमत १ रु. ठरली तर फक्त एकच व्यापारी तो जिन्नस विकण्यास तयार होईल पण या किंमतीस गिऱ्हाइकें मात्र पांच असणार व अर्थातच यापैकीं एकाचेंच समाधान होईल.

हीच किंमत २ रु. झाल्यास विकणारे दोन व घेणारे चार होतील; कारण या किंमतीस पहिलाही आपला जिन्नस विकणारच. त्याला त्याच्या कल्पनेपेक्षां जास्त फायदा मिळेल. घेणाऱ्यापैकीं फक्त पहिला या किंमतीला बाजारांतून जाईल.

याचप्रमाणें किंमत ३ रु. झाल्यास विकणारे ३ व घेणारे ३ रहातील. किंमत ४ रु. झाल्यास विकणारे ४ पण घेणारे २ च रहातील व किंमत ५ रु. झाल्यास विकणारे पांच पण घेणारा एकच

राहील. एकंदरींत पहातां किंमत ३ रु. असतांनाच तीन व्यापारी व तीन गिऱ्हाइकें ह्मणजे एकंदर सहाजणांचें समाधान होईल व 'मागणी' आणि 'पुरवठा' यांचीं परिमाणें सारखींच रहातील. इतर कोणत्याही स्थितींत इतक्या लोकांचें समाधानही होणार नाहीं व 'मागणी' आणि 'पुरवठा' यांचीं परिमाणें समानही होणार नाहींत. यावरून या बाजारांत या जिनसाची ३ रु. किंमत होईल हें उघडच आहे.

**मागणी, पुरवठा व किंमत यांचा परस्पर संबंधः—** आतांपर्यंतच्या विवेचनांत, प्रथम आपण मागणी व पुरवठा ही किंमतीवर अवलंबून आहेत, असें जणूं काय गृहीत धरिले होते; व नंतर बाजारांत किंमत कशी ठरते याचें विवेचन केलें. परंतु वास्तवीक पहातां हे सर्व परस्परावलंबी आहेत; ह्मणजे मागणी व पुरवठा ही जशी किंमतीवर अवलंबून असतात तशीच किंमतही मागणी व पुरवठा यांच्यावर अवलंबून असते. हें कसें तें पहाण्यासाठीं आपण दोन साधीं उदाहरणें घेऊं. आंब्यांच्या एका व्यापाऱ्याजवळ नेहमीं इतकेच आंबे विकावयास आहेत व नेहमींच्या अनुभवाप्रमाणें त्यानें त्यांची एक कांहीं तरी (उ. १ रु. डझन प्रमाणें) किंमत ठरविली आहे. कांहीं कारणामुळें एखादे दिवशीं वाजवीपेक्षां जास्त लोकांना आंब्यांची जरूरी लागली. बाजारांत आंबे तर नेहमीइतकेच आहेत. तेव्हां जो तो आपल्याला दुसऱ्याच्या अगोदर आंबे मिळावेत अशी खटपट करणार व त्यासाठीं (त्याला त्यावेळीं अगदीं जरूरीच असल्यामुळें) थोडी जास्त किंमत द्यावी लागली तरी ती तो देऊं करणार.

अशारीतीनें गिऱ्हाइकांमधील आपापसांतील चढाओढीमुळें व मालाचा पुरवठा मर्यादित असलेमुळें त्या आंब्यांची किंमत वाढत जाणार हें सहाजिकच लक्षांत येईल. अशी परिस्थिति पाहून तो व्यापारीही शक्य तेवढ्या जास्त किंमतीस आपला माल विकण्याचा प्रयत्न करील. व जे गिऱ्हाईक जास्त किंमत द्यावयाला तयार होईल त्यालाच तो माल देईल. याच्या उलट बाजारांत माल जास्त आला व गिऱ्हाईक नेहमींप्रमाणेंच असलें तर आपला माल अगोदर खप-विण्यासाठीं व्यापाऱ्यांत चढाओढ सुरू होईल व जो तो शक्य तेवढ्या कमी किंमतीस माल देऊं करून गिऱ्हाईक आपल्याकडे वळवून घेण्याचा प्रयत्न करील व अशारीतीनें किंमत उतरावयास लागेल. यावरून पूर्वीं दिलेले मागणी व पुरवठा यांचे नियम निराळ्या तऱ्हेनें पुढील प्रमाणेंही मांडता येतील:— १ **जसजशी मालाची मागणी वाढत जाईल तसतशी** (पुरवठा मात्र पूर्वीं इतकाच आहे असें गृहीत धरून) **मलाची किंमतही वाढूं लागेल, उलट जसजशी मालाची मागणी कमी होत जाईल तसतशी** (पुन्हां पुरवठा तितकाच आहे असें समजून) **मालाची किंमतही उतरत जाईल.**

**२ जसजसा मालाचा पुरवठा वाढत जाईल** (मागणी मात्र पूर्वी इतकीच आहे असें गृहीत धरून) **तसतशी मालाची किंमत कमी होत जाईल, उलटपक्षीं जसजसा पुरवठा कमी होत जाईल तसतशी** (मागणी तितकीच आहे असें गृहीत धरून) **किंमत वाढत जाईल.**

येथपर्यंत विनिमय ह्मणजे काय, तो कसा व कां अस्तित्वांत येतो, व त्यांत कोणकोणत्या मूलभूत कल्पनांचा अंतर्भाव होतो वगैरे गोष्टीबद्दल विवेचन झालें. तसेंच विनिमयाला सुलभता आणून त्याची वाढ करण्यास कारणीभूत होणाऱ्या एका साधनाचीही (बाजाराची) थोडीशी माहिती आपणास झाली आहे. व आपल्या पुस्तकाचा मुख्य विषय समजण्याकरितां एवढी प्रास्ताविक माहिती पुरे आहे. तेव्हां आतां आपण आपल्या पुस्तकाचा मुख्य विषय जो पैसा त्याकडे वळूं.



# प्रकरण ५ वें

## पैसा व त्याचें महत्त्व.

**पैसा ह्मणजे काय? :**—प्रकरण ३ मध्यें सांगितल्याप्रमाणें ऐनजिनसी विनिमयांतील मुख्य अडचण ह्मणजे एखाद्या सर्वसंमत विनिमय साधनाचा (medium of exchange) अभाव ही होय. हें साधन (ह्म. अशी वस्तु) जवळ असल्यास निरनिराळ्या वस्तूंची देवघेव सोप्या व सोईस्कर तऱ्हेनें करतां येईल. कारण ही वस्तु घेऊन आपल्यास लागणारे सर्व जिन्नस इतर लोक आपल्यास देतील

अगर आपणांसही आपली नाशवंत वस्तु योग्यवेळीं देऊन टाकून अशी सर्वसंमत वस्तु पुढें उपयोगासाठीं साठवून ठेवतां येईल. समाज जसजसा सुधारत जातो, लोकसंख्येची व उद्योगधंद्याची जसजशी वाढ होत जाते, व लोकांच्या गरजा जसजशा अधिकाधिक वाढत जातात तसतशी सर्वसंमत-विनिमय-साधनाच्या अभावाची अडचण अधिकच तीव्रतेनें भासूं लागते. मनुष्याला एखाद्या गोष्टीची जरूरी भासूं लागली कीं या जरूरीच्या टोंचणीमुळें ती भागविण्यासाठीं तो आपल्या सर्व शक्ती एकवटून खटपट करितो व या खटपटीमुळेंच पुष्कळ शोध लागतात. इंग्रजीमध्यें ‘necessity is the mother of invention’ अशी जी ह्मण आहे तिचें मूळही यांतच आहे. याप्रमाणेंच देवघेव करण्याला सर्वसाधारण अशा विनिमय साधनाची आवश्यकता भासूं लागल्यामुळें ती कोणत्या उपायांनी दूर करावी इकडें मनुष्याची कल्पकबुद्धि धाव घेऊं लागली; व त्याला सुचतील आणि पटतील अशा निरनिराळ्या वस्तूंचा तो या कामीं उपयोग करूं लागला. **अशा विनिमय-साधनांस अर्थशास्त्रांतील शास्त्रीय संज्ञा ‘पैसा’ अशी आहे.** आपण नेहमीं लौकिक अर्थानें पहातो तोच फक्त पैसा असें नाहीं तर ही शास्त्रीय संज्ञा व्यापक आहे व तिच्यामध्यें सर्व विनिमयसाधनें येतात हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आपण नेहमीं पहातो तो पैसा जरी एखाद्या विवि-क्षित स्वरूपाचा असला तरी सध्यांच्या स्वरूपाला येऊन पोंचण्याला त्याला कित्येक शतकें लागली असून कित्येक पिढ्यांचे अनुभव खर्चीं

घालावें लागले आहेत. सारांश अर्थशास्त्रामध्यें पैशाला नेहमीच्या बोलण्यांतील संकुचित अर्थ नसून वर सांगितलेला व्यापक अर्थ आहे. यासाठींच **पैसा या सदराखालीं, सर्व-संमत-विनिमय-साधन ह्मणून उपयोगांत येणाऱ्या कोणत्याहि वस्तूचा समावेश होतो, मग ती वस्तु आपल्या नेहमींच्या पाहण्यांतील व बोलण्यांतील पैशापेक्षां कितीही वेगळ्या स्वरूपाची अगर आकाराची असो.**

**पैसा ही रोजच्या व्यवहारांतील साधी पण अत्यावश्यक वस्तु होयः**—पैसा ही आपल्या रोजच्या व्यवहारांतील एक अत्यंत साधी परंतु जिच्यावांचून कोणाचेही क्षणभर सुद्धां चालायवाचे नाहीं अशी वस्तु आहे. लहानापासून ते थोरापर्यंत अगर अगदीं भिक्षापतीपासून ते लक्षापतीपर्यंत पैशाचा उपयोग करणें ही गोष्ट, खाणें, पिणें, बोलणें, चालणें वगैरे आपल्या नैसर्गिक व्यवहाराइतकीच प्रत्येकाच्या अंगवळणीं पडली आहे. व साधारणतः मनुष्याला ज्याप्रमाणें आपल्या नैसर्गिक व्यवहाराबद्दल विशेष जिज्ञासा व महत्व वाटत नाहीं त्याचप्रमाणें पैशाबद्दलही वाटत नाहीं. तरी पण पैसा हा आपल्या रोजच्या व्यवहारामध्यें इतका आवश्यक होऊन बसला आहे कीं त्याच्याशिवाय आपल्याला लागणाऱ्या बारीकसारीक वस्तु सुद्धां मिळण्याची मारामार पडते. विचार विनिमय करण्याला जशी मनुष्याला भाषेची जरूरी लागते तशीच पदार्थ विनिमय अगर वस्तूंची देवघेव करण्याला त्याला पैशाची जरूरी

लागते. आजच्या परिस्थितीचा विचार केला तर पैशाशिवाय जगामधील देवघेवीचें व्यवहार चालूंच शकणार नाहींत असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. मनुष्यांच्या अपरिमित गरजा भागविण्यासाठीं लागणाऱ्या अनंत वस्तूंचें उत्पादन सध्यां जें इतक्या अवाढव्य प्रमाणावर चाललें आहे त्याचें कारण ह्मणजे त्या सर्व वस्तूंची देवघेव करतां येऊन त्यांचा खप होतो हेंच होय. व पैशाच्या मदतीनेंच अशा तऱ्हेची मोठ्या प्रमाणावर देवघेव होणें शक्य आहे. प्रख्यात इंग्लिश लेखक एच्. जी. वेल्स यानें पैशासंबंधी एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं "विश्वसनीय पैशाच्या अभावीं साऱ्या युरोप खंडाची स्थिती शुद्धरक्ताचा पुरवठा नसल्यामुळें सुन्न झालेल्या मेंदूप्रमाणें होऊन जाईल. त्याच्यामध्यें हालचाल करण्याचीही शक्ति राहणार नाहीं व लोकांना उद्योगधंदा मिळेनासा होऊन उत्पादनाचें कार्यच बंद पडण्याची वेळ येईल. आपल्या समाजाला सध्यां प्राप्त झालेली स्थिती ही, रोख व पतीचा व्यवहार आणि पैशाच्या मोलावर मनुष्याचा असलेला विश्वास यांचे, आधारावर उभारलेली आहे." यावरून पैशाचें महत्व स्पष्टच होतें.

**मानवी जीवनक्रमाशीं पैशाचा निकट संबंधः—** सांप्रत काळीं प्रत्यहीं जें निरनिराळ्या अगणित वस्तूंचें उत्पादनकार्य इतक्या अवाढव्य प्रमाणावर चाललें आहे त्याच्याही मुळाशीं पैसाच आहे. पैशाच्या सहाय्यानें निरनिराळ्या वस्तूंचा विनिमय करणें फारच सुलभ झाल्यामुळें आपण उत्पन्न केलेले जिन्नस बाजारांत

विकले जातील असा प्रत्येकाला भरवसा वाटतो. यामुळें आपापल्या कुंवती प्रमाणें आपल्याला शक्य असतील ते जिन्नस तयार करावयाचे, ते बाजारांत विकून त्याबद्दल पैसे मिळवावयाचे व त्या पैशांच्या सहाय्यानें आपल्याला जरूर लागणारे इतर सर्व जिन्नस खरेदी करावयाचे असा प्रत्येकाचा एक ठराविक कार्यक्रम होऊन राहिला आहे. इतकेंच नव्हे तर बहुजनसमाजाच्या दृष्टीनें मनुष्याचें शिक्षण, त्याचें ज्ञान, त्याच्या अंगचें कलाकौशल्य इत्यादि सर्व गुणांचें अंतिम ध्येय एकप्रकारें पैसा मिळविणें हेंच होऊन बसलें आहे. व साधारणपणें मनुष्याचा मोठेपणा, त्यानें मिळविलेली कीर्ति फार काय पण त्याचें सौख्यसुद्धां पैशानेंच मोजलें जातें ! एखादा प्रख्यात वकील अगर डॉक्टर याची योग्यता त्यानें मिळविलेल्या पैशावरूनच बहुशः लोक ठरवितात ही आपल्या नेहमींच्या अनुभवाची गोष्ट आहे. 'सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते' ही आपल्याकडील सुप्रसिद्ध ह्मणही पैशाच्या या माहात्म्याचीच द्योतक नाहीं काय ?

प्रख्यात इंग्लिश लेखक लॉर्ड मेकॉले यानें एकें ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं "वाईट क्राऊन व वाईट शिलिंग यांचेमुळें एक वर्षांत इंग्लंडचें जेवढें नुकसान झालें .तेवढें नुकसान वाईट राजे, वाईट कायदेमंडळ अगर वाईट न्यायाधीश यांचे हांतून पंचवीस वर्षांत तरी झालें असेल कीं नाहीं याची शंकाच आहे." सूक्ष्मपणें अवलोकन केलें असतां आपणांस असें आढळून येईल कीं कोणत्याही समाजाची आर्थिक भरभराट होण्यास अगर त्याची सांपत्तिक

स्थिति खालावण्यास जीं कांहीं निरनिराळीं कारणें होतात त्यांपैकीं बहुतेक सर्वांचा कोणत्या ना कोणत्या तरी तऱ्हेनें पैशाशीं संबंध आलेला असतो. निदान सध्यांच्या परिस्थितींत तरी आपले सर्व प्रयत्न पैसा मिळविण्याकरितांच चाललेले असून आपले हितसंबंध व आपल्या आकांक्षा ह्याही पैशामध्येंच गुंतून राहिलेल्या आहेत. थोडक्यांत सांगावयाचे ह्मणजे आपलें एकंदर ऐहिक जीवनच पैशावर इतकें अवलंबून आहे कीं पैशाच्या सहाय्याशिवाय आपले व्यवहार नीट चालूंच शकत नाहींत.

मिल् या आंग्ल अर्थशास्त्रज्ञाच्या मतें ‘ मनुष्याचा वेळ व श्रम वांचविण्याचें एक उत्कृष्ट साधन ’ एवढेंच पैशाला महत्व आहे. परंतु मिल्च्या पश्चात् पैशाच्या बाबतींत जी विलक्षण क्रांति झाली, बँका आणि पत ( credit ) यांच्या अभूतपूर्व प्रसारामुळें अर्थिक व्यवहारांना जें महत्वाचें वळण मिळालें आहें, त्याच्या योगानें **पैशाचें कार्यक्षेत्र हें नुसत्या ‘सोईच्या साधना’ पेक्षां फारच निराळें झालें आहे; व पैसा हा मनुष्याच्या अर्थिक जीवनाचा केवळ प्राणच होऊन राहिला आहे.** –

**पैशाचें स्वरूप व कार्य यांबद्दल पूर्ण ज्ञानाची आवश्यकताः**-- अशा प्रकारें सध्याच्या जगांत जवळ जवळ प्रतिपरमेश्वर होऊन राहिलेल्या पैशाच्या कार्याची व त्यामुळें सर्व समाजावर होणाऱ्या परिणामांची योग्य कल्पना बऱ्याचशा लोकांना नसल्यामुळें त्याचें महत्व काय आहे हें कळणें त्यांना शक्य नसते.

व ह्मणूनच सध्यांच्या औद्योगिक व अर्थिक घोटाळ्यांची योग्य उपपत्ति लावणें त्यांना कठीण पडते. पैशाच्या सहाय्यानें देवघेव करण्याची संवय ही मनुष्याला अत्यंत प्राचीन काळापासून लागलेली आहे व सध्यांतर ती त्याची एक स्वाभाविक प्रवृत्तिच होऊन राहिलेली आहे. या करितां प्रस्तुत परिस्थितीची पूर्ण माहिती करून तिच्या मूलभूत कारणांचा योग्य अभ्यास केल्याशिवाय आणि पैशाचें व त्याच्या कार्यकारणांचें खरेंखुरें स्वरूप व महत्व यांचें, यथातथ्य ज्ञान प्राप्तकरून घेतल्याशिवाय आपल्याला आपली औद्योगिक स्थिति सुधारण्याच्या अगर अर्थिक प्रश्न सोडविण्याच्या बाबतींत योग्य प्रयत्न करतां यावयाचे नाहींत असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. इतकेंच नव्हें तर अशा तऱ्हेचें योग्य ज्ञान नसतांना केलेले सर्व प्रयत्न फुकट होऊन त्यांपासून अंतिम फायदा तर काडीचाही होणार नाहीं पण उलट निरुत्साह, असंतोष व द्वेष हीं मात्र आपल्या वाट्यास येतील. तेव्हां हें ज्ञान आपणांस जर नसले तर आपली वागणूक ह्मणजे, एखाद्या डॉक्टरानें रोगाच्या परिस्थितीचें व कारणांचें योग्य निदान न करतां अगर चुकीचें निदान करून औषधोपचार करण्यासारखाच, प्रकार होईल.

आतां, फक्त पैशाचें स्वरूप व कार्य यांचें ज्ञान झालें ह्मणजे आपल्या अर्थिक व्यवहारांतील सर्व गुंतागुंतीच्या प्रश्नांचा योग्य निकाल आपल्याला लावतां येईल असें मात्र नाहीं. कारण मानवी व्यवहार हे फार गुंतागुंतीचे असतात व त्यांत कित्येक निरनिराळ्या

गोष्टींचा कार्यकारण संबंध आलेला असतो. व असे प्रश्न सोडविताना या सर्व निरनिराळ्या गोष्टीही आपल्याला विचारांत घ्याव्याच लागतात. परंतु पैशाचें स्वरूप, कार्य व त्याचे व्यावहारिक परिणाम यांचें योग्य ज्ञान हें या बाबतींत इमारतीच्या पायाप्रमाणें आहे.

**संपत्ति आणि पैसा यांचा समानार्थक उपयोगः—** मनुष्याच्या नेहमींच्या बोलण्याचालण्यांत 'पैसा' व 'संपत्ति' हे शब्द पुष्कळ वेळां समानार्थी वापरण्यांत येतात. उदाहरणार्थ एखादा मनुष्य पुष्कळ श्रीमंत अगर संपत्तिमान आहे असें ह्मणावयाचे असल्यास तो खूप पैसेवाला आहे अगर त्याच्याजवळ रग्गड पैसा आहे असे आपण ह्मणतो. तसेंच एखाद्याच्या संपत्तिमध्यें इतरही पुष्कळ जिनसांचा आपण समावेश करतो. दागदागिनें, जमीनजुमला, गुरेंढोरें, घरदार, गाड्याघोडीं, कपडालत्ता, हिरे माणकें वगैरे रत्नें, कंपन्यांचे शेअर, पोस्टाचीं कॅश सर्टिफिकीटें, सरकारी बॉंड, प्रामिसरीनोटा, इ. निरनिराळ्या अनेक वस्तूंची जरी संपत्तींत आपण गणना करीत असलों तरी संपत्ति हा शब्द उच्चारतांच पुष्कळ पैसा असणें ही कल्पना प्रामुख्यानें आपल्या मनश्चक्षूंपुढें उभी रहाते.

परंतु साधारणतः, मनुष्य जरी वर लिहिलेल्या वस्तूसारख्या नानाविध वस्तूंना संपत्ति म्हणून ओळखीत असला तरी त्यांना तसें कां ह्मणावयाचे अगर संपत्ति या एका सदराखालीं त्यांची गणना करण्यांस त्या निरनिराळ्या वस्तूंमध्यें सामान्य गुणधर्म काय दिसतात हें त्याला सांगता येणार नाहीं. परमेश्वरानें निर्माण केलेल्या सर्वच

वस्तूंना कांहीं कोणी संपात्ति ह्मणत नाहीं. उदाहरणार्थ सूर्य, चंद्र, तारे, हवा, पाणी, प्रकाश, समुद्र, आकाशांत स्वैरपणें विहार करणारे पक्षि, अरण्यांत स्वच्छंदानें राहणारे पशु अगर पाण्यामध्यें निर्भयपणें हिंडणारे मासे यांची आपण कोणाच्या संपत्तिमध्यें गणना करीत नाहीं. या वरून एकंदरींत असा निष्कर्ष निघतो कीं संपत्तिमध्यें गणना होण्यास कोणत्याही वस्तूमध्यें कांहीं विशेष गुण असावे लागतात; व ज्या वस्तूंमध्यें असे गुणधर्म असतील त्यांचीच संपात्तिमध्यें गणना केली जाते. तेव्हां हे विशेष गुणधर्म काय असावेत याचा आपण आतां विचार करूं.

**संपत्तीचे गुणधर्मः**—निरनिराळ्या अर्थशास्त्रज्ञांनी आपापल्या मताप्रमाणें संपत्तीचे निरनिराळें गुणधर्म कल्पून त्या त्या प्रमाणें संपत्तीची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे. व ‘ ज्या ज्या वस्तु मनुष्योपयोगी आहेत ह्मणजे ज्यांच्यामध्यें मानवी गरजा भागविण्याची शक्ति आहे त्या सर्व संपत्तिमध्यें मोडतात’ अशी एक संपत्तीची व्याख्या करण्यांत आली आहे. ही व्याख्या फार विस्तृत स्वरूपाची आहे कारण तिच्याप्रमाणें पाहिले असतां एकूण एक मनुष्योपयोगी वस्तूंची संपत्तिमध्यें गणना केली पाहिजे. पण वास्तविक तसें होत नाहीं. कारण हवा, प्रकाश इत्यादि सारख्या मानवी जीवनाला अत्यावश्यक वस्तूंची कांहीं संपत्तिमध्यें गणना होत नाहीं. तेव्हां संपत्तिमध्यें यापेक्षां इतरही कांहीं गुण असले पाहिजेत असें सिद्ध होते. व निरनिराळ्या अर्थशास्त्रज्ञांमध्यें संपत्तीच्या गुणधर्माबद्दल जी एकवाक्यता दिसत नाहीं ती या इतर गुणधर्मांचे बाबतींतच होय.

(१) **उपयुक्तताः**— परंतु कोणतीही वस्तु संपत्ति म्हणून समजली जाण्यास तिच्यामध्यें उपयुक्तता ( Utility ) हा गुण प्रामुख्यानें असलाच पाहिजे. याबद्दल सर्वांची एकवाक्यता आहे. उपयुक्तता म्हणजे मानवी वासना (Wants = गरजा) तृप्त करण्याची शक्ति. मग ती गरज अगर वासना कितीही क्षणिक अगर काल्पनिक असो. ज्या वस्तूंमध्यें अशी शक्ति नसेल म्हणजे ज्या वस्तूंमध्यें उपयुक्तता नसेल तिची गणना संपत्तिमध्यें होत नाहीं. मानवी गरजा व संपत्ति यांमधील हा संबंध फार महत्त्वाचा आहे.

आतां उपयुक्तता हा गुण स्थल काल परत्वें व निरनिराळ्या परिस्थितींनुरूप बदलत असतो. शेक्सपीअर अगर गडकरी यांच्या नाटकांची एखाद्या सुशिक्षित काव्यप्रेमी मनुष्याच्या दृष्टीनें फारच उपयुक्तता असेल; पण एखाद्या जंगली अडाण्याच्या दृष्टीनें त्यांची कांहींच उपयुक्तता नसेल. हिरे, माणकें वगैरे रत्नांची ज्याला मुळींच माहिती नाहीं अशा एखाद्या अज्ञानी मनुष्याला त्यांचीं कांहींच गरज (उपयुक्तता) वाटणार नाहीं पण ज्यांना त्या रत्नांची खरी योग्यता माहीत आहे त्यांच्या दृष्टीनें त्या रत्नामध्यें फार उपयुक्तता आहे. सहारा वाळवंटांत तृषार्त झालेल्या मनुष्याला पेलाभर पाण्याची जी उपयुक्तता वाटेल तितकी हिऱ्यामोत्यांचीही वाटणार नाहीं. एकंदरींत एखाद्या वस्तूची उपयुक्तता स्थलकालपरत्वें जरी कमीजास्त होत असली तरी संपत्तीमध्यें गणना होण्यास कोणत्याही वस्तूंत ती प्रामुख्यानें असली पाहिजे.

(२) **दुर्मिळता अगर परिमितताः**—नुसती उपयुक्तता असली म्हणजे कोणतीही वस्तू संपत्तिमध्यें मोडते असे मात्र नाहीं व

नुसत्या उपयुक्ततेच्या दृष्टीनें केलेली संपत्तीची व्याख्या फारच व्यापक स्वरूपाची होते हें आपण नुकतेंच पाहिले आहे. उपयुक्ततेच्या जोडीला संपत्तीचा दुसरा विशेष म्हणजे दुर्मिळता अगर परिमितता (limitation in quantity or relative scarcity). एखादी वस्तु मनुष्याला पुष्कळ उपयुक्त आहे, फार काय पण हवा अगर पाणी यांच्यासारखी जीवनाला अत्यावश्यक आहे; पण जर ती कांहींही श्रम न करतां, कितीही लोक असले तरी प्रत्येकाला पाहिजे तेव्हां पाहिजे तेवढी मिळण्याइतकी विपूल असेल तर तिची संपत्तींमध्यें गणना केली जात नाहीं. अशा वस्तु म्हणजे परमेश्वरानें अखिल मानव जातीला बहाल केलेल्या देणग्या असून त्यांच्यावर सर्वांचा सारखाच अधिकार आहे, म्हणून त्यांना संपत्तींत मोडतां येत नाहीं. उदाहरणार्थ समुद्रकांठावर वाळू अगर हिमालयांतील निबिड अरण्यांत लांकडें यांना संपत्ति ह्मणतां येत नाहीं पण तेंच एखाद्या कंत्राट-दारानें घर बांधण्यासाठीं वाळू अगर इमारती-लांकूड शहरांत आणलेले असले ह्मणजे त्यांची त्याच्या संपत्तिमध्यें गणना होते.

(३) **मालकी अथवा अधिकार**:—संपत्तीचा तिसरा विशेष ह्मणजे तिच्यावर असणारी मालकी अगर अधिकार. जर एखादी वस्तु कोणाच्याच मालकीची नसेल व सर्वांना अप्रतिबंध फुकट मिळत असेल तर ती संपत्तींमध्यें मोडणार नाहीं. साधारणत: संपत्ति हा शब्द उच्चारला कीं ती कोणाच्या तरी मालकीची असली पाहिजे अशी आपली भावना होते. सूर्य, चंद्र, हवा, प्रकाश इत्यादि शद्बांचे उच्चाराबरोबर ही कोणाच्या तरी मालकीची असावीत

अशी भावना आपल्या मनांत उत्पन्न होत नाहीं. तेंच घरदार, जमीन जुमला, दागदागिने, गाड्याघोडीं, गुरेंढोरें वगैरेंच्या कल्पनेंबरोबरच तीं कोणाच्या तरी मालकीची असावीत हीहि कल्पना आपल्या मनांत येते. तेव्हां संपत्ति या सदरांत मोडणारी प्रत्येक वस्तु कोणाच्या तरी मालकीची असली पाहिजे.

(४) **मनुष्यापासून अलग असणें**:—अशाप्रकारचें त्रिविध गुण असणारी कोणतीही वस्तु मनुष्यापासून अलग असेल तरच तिला संपत्तिमध्यें मोडावयास कांहीं हरकत नाहीं. मग ती मूर्त (material) असो अगर अमूर्त (Immaterial) असो. ह्मणजे मनुष्यापासून अलग असणें हा संपत्तीचा चौथा विशेष होय. कांहीं अर्थशास्त्रज्ञांच्या मतें संपत्ति ही मनुष्यापासून अलग (external to man) असलीच पाहिजे असें नाहीं. त्यांच्या दृष्टीनें मनुष्याचें कौशल्य अगर बुद्धि अगर विद्वत्ता यांची त्याच्या संपत्तिमध्येंच गणना झाली पाहिजे. मूर्त स्वरूपांतील संपत्तीची उदाहरणें व्यवहारांत पदोपदीं आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात. अमूर्त स्वरूपांतील संपत्तीची उदाहरणें ह्मणून एखाद्या व्यापाऱ्याचा नांवलौकिक (Goodwill) अगर एखादा वकील अगर डॉक्टर यांच्या धंद्याचा 'बस' (business connections) हीं देतां येतील.

**संपत्तीची व्याख्या**:— वरील विवेचनाला अनुसरून आपली संपत्तीची व्याख्या पुढीलप्रमाणें होईल: '**संपत्ति ह्मणजे ज्यांच्या अंगीं मानवी गरजा भागविण्याचें सामर्थ्य असून ज्या अपरिमित नाहींत, व ज्या मिळविण्यास श्रम करावें**

**लागतात व ज्या कोणाच्या तरी मालकीच्या असून दुसऱ्यास देतां येतात अशा मानवी शरिरापासून अलग अस्तित्व असणाऱ्या सर्व मूर्त अगर अमूर्त वस्तु.'**

ही झाली संपत्तीची सर्वसाधारण व्याख्या. पण या व्याख्ये-प्रमाणेंही पाहिल्यास एखादी वस्तु एक तऱ्हेनें संपत्ती होऊं शकेल तर दुसऱ्या तऱ्हेनें होणारही नाहीं. प्रस्तुत आपणांस या मुद्या-मधें विशेष खोल शिरण्याची जरूर नसल्यानें फक्त एकच उदाहरण दिलेले बरें. एखाद्या देशाच्या किनाऱ्याजवळ माशांचे थवे असल्यास हे थवे एकप्रकारें 'संपत्ती' होतात. पण कशी व कोणाची? यांना उपयुक्तता, दुर्मिळता व मनुष्यापासून अलगपणा हीं आहेत पण यावर मालकी कोणाची? अर्थात् एखाद्या मनुष्याची अगर खासगी संस्थेची नसून सबंध राष्ट्राची मालकी यांच्यावर असणार; ह्मणजेच हे थवे कोणा मनुष्याच्या अगर खासगी संस्थेच्या संपत्तींत येणार नाहींत तर ते राष्ट्राच्या संपत्तींत येणार. यावरून दिसून येते कीं संपत्तीचेही प्रकार असणार. ते पुढीलप्रमाणें आहेत:

**संपत्तीचे तीन प्रकारः**— वैयक्तिक संपत्ति, राष्ट्रीयसंपत्ति व अंतर-राष्ट्रीय-संपत्ति असे संपत्तीचे तीन विभाग पाडण्यांत येतात. **वैयक्तिक संपत्तीमध्यें** प्रत्येक व्यक्तीच्या मालकीच्या व ज्या दुसऱ्यास देतां येतील अशा मूर्त वस्तु, व त्याच्या शरिरापासून अलग असणाऱ्या व ज्यांच्या योगानें त्याला इतर मूर्त वस्तु मिळवितां येतात अशा तऱ्हेच्या अमूर्त वस्तु [ उ० व्यापाऱ्याचा लौकिक Goodwill

अगर वकिलाचा धंद्याचा जम business connections ) यांचा समावेश करण्यांत येतो.

**राष्ट्रीय संपत्तीमध्यें** राष्ट्रांमधील सर्व इसमांच्या संपत्तीचा अंतर्भाव होतोच पण त्या शिवाय इतरही अनेक गोष्टींचा समावेश करण्यांत येतो. उदाहरणार्थ देशांतील सर्व लोक, पशु, पक्षी, नद्या, पर्वत, समुद्र किनारा, किनाऱ्यालगतचा तीन मैलांचा समुद्राचा टापू, त्यांतील मासे वगैरे जलचरप्राणी, खाणी, अरण्यें, हवा खाण्याचीं ठिकाणें, आरोग्यकारक व औषधीपाण्याचे झरे, वाचनालयें, पदार्थसंग्रहालयें वगैरे सार्वजनिक मालकीचीं ठिकाणें, व्यापारधंदे, लोकांचें कलाकौशल्य, वाङमय, लोकांच्या अंगांतील गुण, त्यांची कार्यक्षमता, त्यांनीं लावलेले शोध, फार काय पण देशाचें हवापाणी वगैरेंचा देखील प्रत्येक देशाच्या संपत्तीत ( ह्म. राष्ट्रीय संपत्तींत ) समावेश करतात.

**अंतरराष्ट्रीय संपत्ति** ह्मणजे सर्व जगाची संपत्ति. हिच्यामध्यें जगांतील सर्व राष्ट्रांच्या संपत्तीचा अंतर्भाव होत असून शिवाय समुद्र, महासागर, व त्यांतील कोणत्याही देशाच्या मालकीची नाहींत अशी बेटें वगैरेंचा समावेश होतो.

**संपत्ति व पैसा यांमधील फरकः**— वरील विवेचनावरून संपत्ति व पैसा हे समानार्थक शब्द नाहींत हें कळून येईल. संपत्तीमध्यें जसा पैशाचा समावेश होतो तसा इतरही कित्येक वस्तूंचा होतो. पण त्या वस्तूंना आपण पैसा ह्मणत नाहीं. ह्मणजे संपत्ति व पैसा यांचेमध्यें सामान्य—विशेष—भाव ( Genus and species) आहे. पैशाची कल्पना ही संपत्तीच्या कल्पनेंत अंतर्भूत

होते पण पैशाच्या कल्पनेंत संपत्तीच्या कल्पनेचा अंतर्भाव होत नाहीं. थोड्या निराळ्या शद्बांत सांगावयाचें ह्मणजे **पैसा हा संपत्तीचा एक अगदीं लहानसा घटक आहे.**

**पैशाची व्याख्या**:—संपत्ति ह्मणजे काय याची सर्व-साधारण व्याख्या ठरविण्याचा जसा आपण नुकताच प्रयत्न केला आहे त्याप्रमाणें पैसा ह्मणजे काय याचीही एखादी लहानशी व्याख्या करतां येते कीं काय हें पाहूं गेलें असतां असें दिसून येते कीं अशा तऱ्हेची व्याख्या ठरविणें हें थोडेसें कठीणच काम आहे. व ह्मणूनच पुष्कळ वेळां पैशाची व्याख्या त्याच्या योगानें होणाऱ्या कार्यान्वयें करण्यांत येते. ह्मणजे पैशाचें कार्य जो जिन्नस पार पाडतो तो पैसा अशी पैशाची मोघम व्याख्या होऊं पहाते. आतां पैशाचें कार्य कोणतें हा प्रश्न साहाजिकच उभा राहतो. या बद्दल विस्तृत विवेचन पुढील एका प्रकरणांत यावयाचें असल्यामुळें एवढेंच सांगितलें ह्मणजे पुरें कीं पैशाच्या अनेक कार्यांपैकीं मनुष्यांच्या अर्थिक व्यवहारांमध्यें विनिमय साधन ' (विनिमय म्ह० देवघेव) व ' मोलाचें सर्व-साधारण परिमाण ' या दृष्टीनें उपयोग होणें हीं दोन पैशाची प्रमुख कार्यें आहेत. त्यांतल्यात्यांत पहिलें कार्य अतिशय महत्वाचें आहे. तेव्हां हीं कार्यें, ज्या ज्या वस्तूंच्या सहाय्यानें होऊं शकतात त्यांना पैसा हें नांव देतां येईल. ह्मणजे '**जी वस्तु मनुष्याच्या आर्थिक व्यवहारांत विनिमय साधन व मोलाचें सर्वसाधारण परिमाण होणें ही कार्यें करूं शकते तिला पैसा ह्मणावयाचें**'

अशी पैशाची थोडक्यांत व्याख्या होईल. मग अशी वस्तु आपण हल्लीं नेहमींच्या प्रचारांत उपयोग करीत असलेल्या पैशापेक्षां जरी निराळ्या स्वरूपाची असली तरीही तिची गणना पैसा ह्मणूनच केली पाहिजे. अशा या पैशाचे प्रकार पुष्कळच असणार. ते असे:

**पैशाचे प्रकार:**—आपण आपल्या दररोजच्या देवघेवींमध्यें रुपये, आणे, नोटा, वगैरे निरनिराळ्या प्रकारच्या पैशाचा उपयोग करतो. पण या बहुरूपी पैशाचें अर्थशास्त्राच्या दृष्टीनें साधारणतः पुढीलप्रमाणें वर्गीकरण करण्यांत येतें.




पैशाच्या या निरनिराळ्या प्रकाराबद्दल पुढें योग्य स्थळीं माहिती देण्यांत येईलच.



## प्रकरण ६ वें.

# पैशाचें कार्य व त्याची विविध रूपें.

**पैशाचीं कार्यें**:— मानवी समाजाची थोडीशी प्रगती झाल्यावर व जीवनोपयोगी वस्तु विनिमयाच्या योगानें मिळवि-ण्यास सुरवात होऊन मनुष्यप्राणी ऐनजिनसी विनिमय करूं लागला असतांना त्याच्या देवघेवींच्या मार्गांत येणाऱ्या अडचणी दूर कर-ण्याचा एक उपाय व साधन ह्मणून पैसा अस्तित्वांत आला. ऐनजिनसी विनिमयांतील मुख्य अडचणी ह्मणजे विनिमय साधन व मूल्य मापनाचें परिमाण यांचा अभाव, ह्या पैशाच्या योगानें दूर झाल्या हें नुकतेंच आपण पाहिलें आहे. ह्मणजे विनिमय—साधन व साधारण—मूल्य-परिमाण हीं पैशाची दोन मुख्य कार्यें झालीं. प्रथम या दोन कार्यांचें विवेचन करून नंतर या दोहोंच्या अनुसंगानें निष्पन्न होणाऱ्या इतर कार्यांकडे आपण वळूं.

**१ विनिमय-साधन** (**Medium of exchange**): विनिमय साधन या दृष्टीनें पैशाचें कार्य फारच महत्वाचें आहे. ऐनजिनसी व्यवहारांत अशा साधनाच्या अभावीं देवघेव होण्यास किती अडचणी येतात व त्रास पडतो हें मागील एका प्रकरणांत (प्र. ३ पहा) दिसून आलेंच आहे. उलट पैशासारख्या सर्वसंमत विनिमय-साधनाच्या योगानें देवघेव किती सहजासहजी व सुलभरीतीनें करतां येते हें आपणांस आपल्या दररोजच्या अनुभवानेंच समजतें.

एकंदरीत पहातां सध्यांच्या काळीं विनिमयसाधनांच्या अभावीं मानवी व्यवहारांचा गाडा एक क्षणभरही चालणार नाहीं असें म्हटलें असतां आतिशयोक्ति होणार नाहीं. अर्वाचीन उद्योगधंद्यांच्या निरनिराळ्या शाखांमध्यें निरनिराळ्या लोकांनीं जें विशेष प्राविण्य मिळविलें आहे तें, फक्त ऐनजिनसी अदलाबदलीचे व्यवहार चालू असणाऱ्या समाजांत केव्हांही शक्य होणार नाहीं. इतकेंच नव्हे तर विनिमय साधन या दृष्टीनें पैसा हा अर्वाचिन अर्थिक जीवनाचा पायाच आहे. पैशाच्या योगानें देवघेवींच्या व्यवहारांना जी सुलभता आली आहे त्या योगानेंच श्रमविभागाचें तत्वानुसार विस्तृत प्रमाणावर संपत्त्युत्पादनाचें कार्य शक्य झालें आहे; व वस्तूंची देवघेवही अवाढव्य प्रमाणांत होऊं लागून राष्ट्रीय वृद्धीला अतोनात मदत झाली आहे. इतकेंच नाहीं तर पैशाशिवाय इतक्या अवाढव्य प्रमाणांत देवघेव होणें शक्यच नाहीं अर्थातच अधुनिक अफाट उत्पादनही शक्य नाहीं व ह्मणूनच अधुनिक समाजही अस्तित्वांत येणें शक्य नाहीं.

तेव्हां राष्ट्राच्या उद्योगधंद्यांची वाढ होऊन राष्ट्र समृद्धीस येण्याला अत्यंत आवश्यक अशा गोष्टी पैकीं एक ह्मणजे सोइस्कर विनिमयसाधनें हीच होय. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे सध्यांच्या सामाजिक परिस्थितींत पूर्ण क्रांती झाल्याखेरीज विनिमय साधनांची आवश्यकता नाहींशी होणार नाहीं. कारण सध्यांचें संपत्त्युत्पादनाचें कार्य हें श्रमविभागाचें तत्वानुसार होत आहे; श्रमविभागाच्या तत्वाच्या मुळाशीं उत्पन्न झालेल्या वस्तूंची शक्य तितक्या जलद देवघेव झाली पाहिजे

हें तत्व असतें; व अशा तऱ्हेनें जलद देवघेव होण्यासच पैशासारख्या विनिमयसाधनाची आवश्यकता लागते. अशा रीतीनें हे सर्व एका सांखळीचे दुवे आहेत. या थोड्याशा विवेचनावरून पैशाचें विनिमय-साधन ह्मणून होणारें कार्य किती महत्वाचें आहे हें आतां सहज समजून येईल.

२ मूल्यमापनाचें साधारण परिमाण ( **A common measure of value.**): विनिमयाचें साधन या दृष्टीनें सर्व लोकांना हवासा वाटणारा, कोणीही इसम आपखुषीनें ताबडतोब स्वीकारील असा, व ह्मणून आपल्याला लागणाऱ्या कोणत्याही वस्तु त्याचे योगानें केव्हांही मिळविता याव्यात या हेतूनें, जो जिन्नस प्रत्येक मनुष्य थोड्याबहुत प्रमाणांत तरी आपल्यापाशीं ठेवण्याची इच्छा करतो असा कोणताही जिन्नस पैसा होऊं शकेल. परंतु साधारणतः पुष्कळ दिवसांच्या संवयीनें, प्रचारानें, व अनुभवानें, जास्तींत जास्त सोइस्करपणें पैशाचीं सर्व कार्ये करणारा असा एखादा जिन्नस, ज्या त्या परिस्थित्यनुरूप विशेषेंकरून उपयोगांत आलेला असतो. अशा प्रकारें विनिमयसाधन ह्मणून एखादा जिन्नस प्रचारांत आला ह्मणजे त्याचा मूल्य मापनाचें साधारण परिमाण ह्मणून उपयोग होऊं लागतो. पैशाचें हें दुसरें कार्यही पहिल्या कार्याइतकेंच महत्वाचें आहे. कारण पैशाच्या सहाय्यानें निरनिराळ्या वस्तूंची देवघेव करूं लागल्यामुळें लोकांना संवयीनें निरनिराळ्या वस्तूंचे पैशाच्या रूपांतील मोल ह्मणजे त्यांच्या

किंमती काय आहेत हें कळूं लागते व मग त्यांचें परस्पर मोलाचें प्रमाण काय आहे हें तुलनात्मक दृष्टीनें समजावयास फारसा वेळ लागत नाहीं. उदाहरणार्थ एका घोड्याला शंभर रुपये, एका गाईला पन्नास, व एका शेळीला पांच रुपये पडत असले तर घोडा, गाय व शेळी यांचें परस्पर मोलाचें परिमाण काय आहे व एक घोडा घेण्यास किती गाईंची अगर किती शेळ्यांची किंमत द्यावी लागेल हें ताबडतोब लक्षांत येतें. तेंच रुपायासारखें एखादें साधारण मूल्य परिमाण नसतें तर ह्या तीन जनावरांचें परस्पर मोल नक्की ठरविण्याच्या बाबतींत कितीतरी अडचणी आल्या असत्या.

३. **मूल्यनिधि** ( **Store of value** ):— पैसा ही अशी वस्तु असते कीं इतर वस्तूंच्या मानानें पाहिल्यास तिच्या मोलामध्यें बहुधा फारसा बदल होत नाहीं व हा पैसा सर्व लोक खुषीनें घेतात. या दोन गुणांमुळें पैशाकडून आणखी एक कार्य घडतें; ' मूल्यनिधी ( store of value ) ह्मणून उपयोग होणें ' हें तें कार्य होय. कांहीं कांहीं वेळा मनुष्याला आपल्या जवळील सर्व शिल्लक संपत्ति पुढें उपयोगीं पडावी ह्मणून आटोपशीर व सोइस्कर स्वरुपांत सांठवून ठेवण्याची जरूरी पडते. वेळप्रसंगीं त्याला ती एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं सहजासहजीं नेता अगर पाठवितांही आली पाहिजे. वाढत्या समाजांत, विशेषतः मोठ्याप्रमाणावर व श्रमविभागाच्या तत्वावर संपत्युत्पादन चालू असलेल्या सध्याच्या समाजांत तर हीं कार्यें क्षणोक्षणीं करावी लागतात. या कार्यांसाठीं देशांतील पैशाचा उपयोग केला

जातो. कारण मोलानें भारी, वजनानें कमी व आकारानें आटोपशीर आणि सर्व लोक स्वीकारतील अशी दुसरी वस्तु पैशाशिवाय सहसा मिळणार नाहीं. हे गुण ज्यांत विशेष असतील अशीच वस्तु शक्य तो 'पैसा' म्हणून वापरली जाते हें लक्षांत ठेविले पाहिजे (प्र. ७पहा). हल्लींच्या काळीं तर कितीही रक्कम असली तरी नोटांच्या रूपानें ती अगदीं आटोपशीर रीतीनें ठेवतां येते व ती सुरक्षितपणें व बंदोबस्तानें ठेवण्यासही फारसा त्रास अगर खर्च पडत नाहीं. आतां हिरे, माणिक वगैरे मूल्यवान रत्नांच्या रूपानें ही संपत्ति सांठवून ठेवतां येते ही गोष्ट खरी परंतु यारूपानें ठेविलेली संपत्ति पैशाइतकी जरूर लागेल तेव्हां देवघेवीला उपयोगीं पडण्यास हातांत तरती राहूं शकत नाहीं. तसेंच धान्य, गुरेंढोरें वगैरे स्वरूपानें ठेविलेली संपत्ति 'पैशा' पेक्षां अधिक नाशवंत असते; धान्य वगैरेला कीड लागण्याची भीती असते, तर गुरेंढोरें वगैरे केव्हां आजारी पडतील अगर मरतील याचा नेम नसतो. या सर्व कारणांमुळें 'पैसाच' संपत्ति ह्मणून सांठवून ठेवण्यासाठीं जास्त उपयोगीं पडतो.

## ४. कालावधीनें पुऱ्या होणाऱ्या देवघेवींचें परिमाण

( A standard of deferred payments. ): समाजामध्यें नानातऱ्हेचे अर्थिक व्यवहार सतत सुरूं आहेत. यापैकीं उधारीची व पुतीची देवघेव, मोठ्या प्रमाणांवर व श्रमविभागाचें तत्वावर संपत्त्युत्पादन, इत्यादि व्यवहार पुरे होण्यास बराच कालावधी लागतो. हे व्यवहार शक्यतेच्या सदरांत आणण्याचें कार्य पैशास करावें लागते.

मागें सांगितल्याप्रमाणें एखादा जिन्नस संवयीमुळें व रूढीमुळें पैसा ह्मणून उपयोगांत येऊं लागला ह्मणजे लोकांचे सर्व व्यवहार या पैशानेंच होऊं लागतात. आपल्याला माहीतच आहे कीं देवघेवीच्या व्यवहारामध्यें दोन्ही बाजूंचा एकमेकांवर विश्वास बसला ह्मणजे प्रत्येकवेळीं रोखीचे व्यवहार करीत बसावे लागत नाहीं. आपली व दुकानदाराची एकमेकांच्या सचोटीबद्दल खात्री असली ह्मणजे जसजसा आपल्याला लागेल तसतसा आपण त्याच्याकडून माल आणवितो; व नंतर ठराविक वेळीं सर्व पैसे एकदम देऊन टाकितो. या प्रमाणें उधारीचे व्यवहार सुरू होतात. आतां पैसा जर अस्तित्वांत नसेल तर असले उधारीचे किंवा उसनवारपणाचे अगर कर्जाऊ पद्धतीचे व्यवहारही ऐनजिनसीच व्हावे लागतील. अर्थातच अशा व्यवहारांची समाजांत वाढ होणेंच अत्यंत कठीण पडेल. समजा कीं एखाद्या इसमाला कांहीं धान्याची गरज लागली व त्यानें एखाद्या ओळखीच्या माणसाकडून आपल्याला पाहिजे तेवढें धान्य घेऊन तें कांहीं दिवसांनीं परत देण्याचें कबूल केलें. हा झाला कालावधीनें संपणारा एकप्रकारें ऐनजिनसी उधारीचा व्यवहार. आतां हें उसनें घेतलेलें धान्य सव्याज परत करतां येईल हें खरें; पण जेव्हां तें परत देण्याची वेळ येईल तेव्हां धान्याचें मोल पूर्वीचेंच कायम असेल हें कशावरून? धान्याचा पुरवठा दरसालचें पिकावर व रोगराईवर अवलंबून असल्यानें त्याचें मोल थोड्या दिवसांत बरेंच बदलूं शकेल व अशातऱ्हेनें धान्य परत देतेवेळीं त्याच्या मोलांत फरक पडण्याचा

जास्त संभव असल्यानें सावकार किंवा धान्य कर्जाऊ घेणारा या पैकीं कोणातरी एकाचा निरर्थक फायदा व दुसऱ्याचा निरर्थक तोटा होणार. तसेंच कदाचित् धान्य परत यावयाचे वेळीं सावकाराजवळ धान्याचा सांठा पुष्कळ झाला असण्याचा व त्याला आतां अधिक धान्याची जरूरी न वाटून दुसरा एखादा जिन्नस हवा असें वाटूं लागण्याचा संभव आहे. याचप्रमाणें प्रत्येक मनुष्याला कितीतरी निरनिराळे जिन्नस लागतात ते सर्व एकाच मनुष्याकडे मिळणें अगर मिळाल्यास ते सर्व आपण उत्पन्न अगर तयार करून परत करणें हें शक्य नाहीं. तसेंच आपणांस जरूर असलेल्या बहुतेक सर्व वस्तूंचें उत्पादन करण्यास कालावधी लागतो. दरम्यान उत्पादन करणारास बरेंच भांडवल गुंतवावें लागतें व त्याचे बरेच व्यवहार, कालावधीनें मिळ-ण्याची कल्पना असलेल्या, आपल्या वस्तूंच्या किंमतीच्या हिशेबाकडे लक्ष देऊन चाललेले असतात.

ह्मणून सर्वलोक नेहमीं स्वीकारतील, ज्याच्या बदलीं दुसरी कुठलीही वस्तु मिळूं शकेल व ज्याच्या मोलांत फारसा फरक कधींही पडणार नाहीं असा एखादा जिन्नस असे उधारीचे, उसनवारीचे, कर्जाऊ स्वरूपाचे अगर कालावधी लागणाऱ्या संपत्त्युत्पादनाचे, व्यवहार करावयास असला ह्मणजे फार सोईचें होते. असा जिन्नस ह्मणजे समाजांत चालू असणारा पैसा हाच होय. याप्रमाणें पैशाचें आणखी एक कार्य सिद्ध होतें, व तें ह्मणजे कालावधीनें पुऱ्या होणाऱ्या देवघेवींचें परिमाण ( A standard of deferred payments ) हें होय.

**५. 'पती'च्या व्यवहारांचा पायाः**—याशिवाय आणखीहि एक पैशाचें विशेषतः मोल्यवान धातु ह्म० सोनें रुपें यांचें कार्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. सध्यांच्याकाळीं सुधारलेल्या देशांतील जवळ जवळ $\frac{९}{१०}$ व्यापार व देवघेवीचे व्यवहार धात्वात्मक पैशाशिवाय नुसत्या व्यापाऱ्यांच्या व गिऱ्हाइकांच्या पतीच्या जोरावर कागदी 'पत–पत्रिकां'च्या ( Credit instruments. ) सहाय्यानें होतात [ प्र. ९ पहा ]. व अशा तऱ्हेच्या 'पत-पत्रिका' लोक स्वीकारतात याचें कारण त्यांच्यामागें पैशाचा पाठिंबा आहे ह्म. त्यांच्याबदली केव्हांही रोख पैसा [ धात्वात्मक ] मिळेल अशी त्यांची खात्री असते हेंच मुख्यतः आहे. यावरून पतीच्या व्यवहारांचा पैसा हा पाया आहे हें दिसून येईल. आणि हा पतीचा प्रसारच व्यापाराची सर्व जगभर अवाढव्य वृद्धी करण्यास व सर्व जगास एका ठिकाणीं ग्रथित करण्यास मुख्यतः कारणीभूत झाला आहे हें लक्षांत आणिले ह्मणजे पैशाचें हेंही कार्य कांहीं कमी महत्वाचें नाहीं हें सहज दिसून येईल.

**पैशाचीं विविध रूपें:**— याप्रमाणें पैशाचीं निरनिराळीं कार्यें आहेत. हीं सर्व कार्यें शक्य तितक्या चांगल्या रीतीनें व एकसमयावच्छेदेंकरून पार पाडणारा जो जिन्नस असेल तोच पैसा ही संज्ञा प्राप्त होण्याला खरोखर योग्य होय. असा जिन्नस शोधून काढण्याकरितां मनुष्य प्राण्यानें आपली बरीचशी अक्कल व पुष्कळसा अनुभव हीं खर्ची घातलीं आहेत. सध्यांच्या सुधारलेल्या काळांत

राहून आपल्याला सोनें, रुपें, निकल, तांबें असल्या धातूंचीं नाणी अगर कागदी नोटा वगैरे वापरण्याची संवय अगदीं आपणांस समजावयास लागल्यापासून झालेली असते. त्यामुळें पैसा ह्मटला कीं आपल्यापुढें चटकन् हा पैसा उभा रहातो. परंतु आजपर्यंत कितीतरी निरनिराळे जिन्नस निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या समाजांत पैसा ह्मणून उपयोगांत आले आहेत. किंबहुना एखाद्या विविक्षित समाजाच्या विविक्षित परिस्थितींत कोणता जिन्नस पैसा ह्मणून जास्त उपयुक्त ठरेल हें त्या त्या समाजाच्या सोईवर अवलंबून असते असें आपणांस स्पष्ट दिसून येते; कारण कोणतीही वस्तु घेतली तरी तिच्यामध्यें एकप्रकारें कमीजास्त प्रमाणांत विनिमय साधन व मोलाचें परिमाण हे दोन गुण असतातच. तेव्हां **समाजाच्या निरनिराळ्या स्थित्यंतराबरोबरच पैशाचीं विविध रूपेंही दिसून येतात.**

समाज शास्त्राप्रमाणें सामाजिक प्रगतीचीं चार स्थित्यंतरें मानण्यांत आलीं आहेत; तीं अशीं:—१ मृगयावृत्ति (The Hunting stage), २ गोपालवृत्ति (The Nomadic stage), ३ कृषिवृत्ति (The Agricultural stage) व ४ उद्योगवृत्ति (The Industrial stage). अगदीं रानटी स्थितींत असलेल्या **मृगयावृत्ति** समाजामध्यें शिकार करून मिळविलेल्या वस्तु (ह्मणजे मारलेल्या जनावरांचीं कातडीं वगैरे) साहजिकपणेंच मोलवान व उपयुक्त ह्मणून समजल्या जातात व ह्मणून प्रत्येकाला त्या हव्याशा वाटणेंही साहजिक आहे. यामुळें त्यांचा विनिमय-साधन ह्मणून

उपयोग केला जात असे यांत कांहींच आश्चर्य नाहीं. इतकेंच नव्हे तर पुढेंपुढेंही समाज पुष्कळसा सुधारल्यावर देखील कांहीं कांहीं देशांत कातड्यांचीं नाणीं सुरू असत असें इतिहासावरून दिसून येतें. रोम व कार्थेज येथें पूर्वी कातड्यांचीं नाणीं चालू असल्याचे दाखले आहेत. तसेंच रशियामध्यें पीटर दि ग्रेट याच्या कारकिर्दीपर्यंत ह्मणजे सतराव्या शतकापर्यंत देखील कातड्यांचीं नाणीं कोठें कोठें प्रचारांत दिसत असत. उत्तर अमेरिकेतील रेड इंडियन् नांवाच्या मूळच्या रानटी रहिवाशांमध्येंही कातड्यांचा पैशासारखा उपयोग करीत असत.

**गोपालवृत्ति** समाजांत गुरेंढोरें हींच मनुष्याची मुख्य संपत्ति गणली जाते. तसेंच पैशामध्यें असावे लागणारे कांहीं कांहीं विशेष यांच्यामध्येंही आहेतच. तीं एकमेकांस देतां घेतां येतात, त्यांना कोठेंही नेतां येते, व साधारणतः बऱ्याच वर्षांपर्यंत तीं जगूं शकतात. या कारणामुळें प्राचीन काळीं गुराढोरांचा देखील पैशासारखा उपयोग करण्यांत आलेला आहे. आपल्याकडे गाईंचा देवघेवींच्या कामीं उपयोग करीत असत असें मानण्यास जागा आहे. त्याचप्रमाणें ग्रीस देशांत देखील बैलांचा असाच उपयोग करण्यांत येत असे, असें प्रख्यात कवि होमर याच्या काव्यांतील कांहीं कांहीं वर्णनावरून दिसतें. डायोमेड नांवाच्या एका वीराच्या चिलखताची व शस्त्रास्त्रांची किंमत ९ बैल होती व ग्लॉकसच्या चिलखताची व शस्त्रास्त्रांची किंमत १०० बैल होती अशी वर्णनें करण्यांत आलेली

आढळून येतात. पैसा याला रोमन प्रतिशब्द pecunia हा pecus म्हणजे गुरें या शब्दापासून झाला आहे. ह्या pecus शब्दाचें संस्कृतमधील 'पशु' ह्या शब्दाशीं किती साम्य आहे हें लक्षांत आल्यावाचून राहणार नाहीं.

लोक **कृषिकर्माचा** अंगिकार करून जमजसें ठिकठिकाणीं स्थाईक होऊन राहूं लागले व निरनिराळीं धान्यें वगैरे पिकवूं लागले, व समाजही वृद्धिंगत होऊन अधिकाधिक सुधारूं लागला तसतसा धान्यादि शेतांत पिकणाऱ्या जिनसांचा पैशासारखा उपयोग होऊं लागला. चहाचे तिकोनी तुकडे, कोकोची फळें, गहूं, मीठ, तंबाखु इत्यादि नानाविध वस्तूंचा निरनिराळ्या देशांतून पैसा म्हणून उपयोग होत असे. साधारणतः अलीकडे म्हणजे इ. स. १७३२ पर्यंत देखील मेरीलँड नांवाच्या वसाहतींत तंबाखू हें एक कायदेशीर चलन म्हणून समजले जात असे.

स्वित्झरलंडमध्यें आल्प्स पर्वतावर असलेल्या कांहीं खेड्यांतून अंड्यांचा, व न्यूफौंडलंडमध्यें वाळविलेल्या कॉड नांवाच्या माशांचाही विनिमय साधनें म्हणून उपयोग होत असल्याची माहिती उपलब्ध आहे. तसेंच कोठें कोठें कवड्या, शिंपा, शंख, चकचकीत कांचेचे मणि वगैरेंचाही पैसा म्हणून उपयोग करण्यांत येत असे. इतकेंच काय पण आपल्याकडे पुण्यासारख्या मोठमोठ्या शहरांत देखील कांहीं वर्षांपूर्वीपर्यंत कवड्यांचा पैशाप्रमाणें उपयोग होत असे, व अद्यापही कांहीं ठिकाणीं तो तसा होत असेल. निरनि-

ळ्या धातूंचा व कागदी चलनांचा उपयोग तर आपण दररोज प्रत्यक्ष पहातोंच आहोंत. सुरवातीला लोखंडाचा सुद्धां पैसा ह्मणून उपयोग होत असे. इंग्लंडमध्यें कांहीं विवक्षित वजनाच्या लोखंडाच्या तुकड्यांचा पैसा ह्मणून प्राचीन काळीं उपयोग करीत असत असें त्या वेळच्या लेखकांनीं लिहून ठेविलें आहे. व चलन ह्मणून लोखंडाचा प्रथमतः उपयोग केला जात होता असें अरिस्टॉटल या सुप्रसिद्ध ग्रीक तत्ववेत्त्यानेंही ह्मटलें आहे. पण सोनें, रुपें, तांबें वगैरे अधिक मूल्यवान धातूच कांहीं काळानें मुख्यतः पुढें आले व लोखंड मागें पडलें.

यावरून आपल्यास असें दिसून येईल कीं अगदीं प्राचीन काळापासून मनुष्यप्राणि अनेकविध वस्तूंचा विनिमय—साधनें ह्मणून उपयोग करीत आला आहे. आतां देशकालपरत्वें व निरनिराळ्या परिस्थित्यनुरूप निरनिराळे जिन्नस सोइस्कर वाटले ही गोष्ट खरी. परंतु यांपैकीं कोणताही जिन्नस पाहिला असतां आपल्यास दिसून येते कीं ज्या त्या वेळच्या विशिष्ट परिस्थितीमध्यें व समाजामध्यें हा जिन्नस मूल्यवान व सर्वांना उपयुक्त असा समजला जात असे व ह्मणून सर्व लोक देवघेवीमध्यें हा स्वीकारण्यास खुषी असत. तथापी ह्या निरनिराळ्या अनेक जिनसांपैकीं सध्यांच्या काळीं फक्त कांहीं विवक्षित धातू व कागदी नोटा एवढेंच आपल्याला प्रचारांत दिसून येतात. अर्थातच वरील दोन गुणाशिवाय आणखी कांहीं गुण 'पैसा' ह्मणून उपयोगांत येणाऱ्या वस्तूमध्यें असले पाहिजेत व हें

गुण हल्लीच्या 'पैशामध्यें' हल्लीच्या परिस्थितींत तरी विशेष दिसून येत असले पाहिजेत हे सिद्धच होतें. असें हे गुण काय आहेत याचा विचार पुढील प्रकरणांत होईल.



## प्रकरण ७ वें.

# पैसा ह्मणून योजिल्या जाणाऱ्या वस्तूला आवश्यक गुणधर्म.

पैसा ह्मणून व्यवहारांत चालवयाच्या पदार्थाच्या अंगीं कांहीं विशिष्ट गुणधर्म असले तर त्याला पैशाचीं मागीलप्रकरणांत सांगितलेलीं अनेकविध कार्ये योग्य रीतीनें पार पाडतां येतील. अशा-तऱ्हेचे पैशामध्यें जरूर असणारे सात गुणधर्म मानण्यांत आले आहेत. ते येणें प्रमाणें:—

१ उपयुक्तता व मोल ( Utility and value ), २ सुवाह्यता ( Portability ), ३ अविनाशता ( Indistructi-

bility ), ४ सजातीयता ( Homogeniety ), ५ सुविभाज्यता ( Divisibility ), ६ मूल्यस्थैर्य ( Stability of value ), व ७ अभिज्ञेयता ( Cognizability ). या साती गुणांबद्दल आपण पृथकपणें थोडथोडें विवेचन करूं.

**१ उपयुक्तता व मोलः**— आपण मागें सांगितल्याप्रमाणें सर्व वस्तूंच्या मोलाचें परिमाण असणें हें एक पैशाचें कार्य आहे. अर्थात त्याला स्वतःचें कांहींतरी मोल असलेंच पाहिजे. ह्मणजे त्याचें अंगीं सर्वांच्या दृष्टीनें कांहींतरी उपयुक्तता असलीच पाहिजे. दोन अनोळखी गृहस्थ एकमेकाशीं देवघेव करीत असतां त्यांचा एकमेकांच्या सचोटीवर विश्वास कसा असणार ? अर्थात त्यांच्याजवळ असलेल्या विनिमय साधनामध्यें सर्वमान्य उपयुक्तता व मोल हीं असली ह्मणजे त्यांच्यामध्यें देवघेव होऊं शकेल. आतां एखाद्या वस्तूची चलन ह्मणून, कोणत्याही कारणानें कां असेना, पण चांगली संवय झाली ह्मणजे लोक तिचा विनिमयाचें एक साधन ह्मणून उपयोग करितात; मग तिच्यामध्यें उपयुक्तता हा गुण असो वा नसो. ( उदाहरणार्थ आपल्या चलनी नोटा. ) यावरून पैसा ह्मणून वापरल्या जाणाऱ्या वस्तूला उपयुक्ततां अगर मोल नसलें तरी चालेल असें कदाचित् वरवर पहाणारास वाटेल. तथापि एका देशांतील चलनी नोटा परदेशांतील व्यापारी स्वीकारीत नाहींत ही गोष्ट लक्षांत आणिली ह्मणजे उपयुक्तना व मोल या गुणांची पैशामध्यें अवश्यकता आहे हे पटेल. देशामध्यें विशिष्ट चलनी नोटांचें अस्तित्व असतें

याचें कारण पैशामध्यें 'उपयुक्तता' नसली तरी चालेल असें नसून, व्यापाराची सोय, या नोटा काढणाऱ्यावर विश्वास सरकारचा कायदा, संवय, रूढी वगैरे अन्य गोष्टी या नोटांचें अस्तित्वास कारणीभूत होतात, हें होय. (प्र. ९ पहा). एकंदरींत विनिमय साधनांतील मुख्य गोष्ट अशी आहे कीं तें सर्व लोकांनीं, सर्व प्रसंगीं, सररहा स्वीकारिलें पाहिजे व सुरवातीला तरी लोकांनीं एखाद्या वस्तूचा पैसा 'ह्मणून' स्वीकार करण्याला तिच्यामध्यें उपयुक्तता व मोल हे गुण असल्याशिवाय सहसा भागणार नाहीं. आजपर्यंत जे नानाविध पदार्थ पैसा ह्मणून प्रचारांत असलेले आपण मागें पाहिले ते सर्व त्या त्या वेळीं व त्या त्या परिस्थितींत उपयुक्त व मोलवान ह्मणून समजले जात असत व ह्मणूनच लोक ते पैसा ह्मणून स्वीकारीत.

**२ सुवाह्यताः**— परंतु असा पदार्थ नुसता मोलवान असूनच सर्वस्वी चालणार नाहीं; तर तो सगळीकडे नेण्याआणण्याला सोईचाही असला पाहिजे. म्हणजे आकाराला व वजनाला शक्य तितका कमी भरून मोलानें मात्र शक्य तितका जास्त असला पाहिजे. असें जर नसेल तर मोठ्या प्रमाणावर देवघेव करावयाची झाल्यास एखाद्या इसमाला आपला पैसा मोठमोठ्या गाड्या भरूनच बरोबर बाळगावा लागेल! शेरभर सोनें अगर चांदी यांच्या किंमतीचें लोखंड ठिकठिकाणीं नेण्याला कित्येक लोक लागतील! आपल्याकडे तांब्याचे 'पैसे' आहेत. पण मोठमोठ्या रकमा

बरोबर न्यावयाच्या असल्या ह्मणजे रुपयांच्या अगर नोटांच्या रूपानें जशा त्या सहज नेतां येतील तशा ‘ पैशांच्या ’ रूपानें नेता येत नाहींत व कोणी नेतही नाहीं. ह्मणून सुवाह्यता हा गुण पैसा ह्मणून उपयोगांत येऊं पहाणाऱ्या जिनसामध्यें असला पाहिजे.

**३ अविनाशिता:—** पैसा हा व्यवहारांत एका मनुष्याच्या हांतून दुसऱ्याकडे, तेथून तिसऱ्याकडे असा सारखा फिरता असतो. संपत्ति ह्मणून तो शिल्लकही ठेविला जातो. ह्मणून तो सहजासहजी झिजणारा अगर लवकर नाश पावणारा असा असतां कामा नये. अंडीं, मासें वगैरेंचा पैशासारखा उपयोग करीत हें आपण नुकतेंच पाहिले आहे. पण हे जिन्नस असे किती दिवस टिकणार! अर्थात यांचा पैशासारखा उपयोग केला तो विशिष्ट परिस्थितीनुरूपच होय. तसेंच लोखंडालाही थोडे दिवसांनीं गंज येऊं लागतो. एकंदरींत अशा तऱ्हेच्या जिनसा वरील तऱ्हेच्या कामास ‘ पैसा ’ ह्मणून फारशा उपयोगी पडत नाहींत.

**४ सजातीयता:—** त्याचप्रमाणें पैसा ह्मणून उपयोगांत येणाऱ्या वस्तूमध्यें ‘ सजातीयता हाही गुण अवश्य असला पाहिजे. कारण एखाद्या वस्तूचे सारखे तुकडे केले तर ते सारख्याच नमुन्याचे व मोलाचे झाले पाहिजेत; नाहींतर अशा वस्तूची नाणीं पाडणें अगर सारख्या किंमतीचे विभाग करणें अत्यंत त्रासाचें व घोंटाळ्याचें होईल. एखाद्या सोन्याच्या पाट्यांतील कितीही तुकडे काढले तरी प्रत्येक तुकड्यांतील सोन्याचा दर्जा अगर कस कांहीं बदलत नाहीं. तेंच

एक गाय अगर एक शेळी कांहीं दुसरी प्रमाणें नसते. सारख्या आकाराचे दोन हिरे अगर मोती घेतले तरी ते सारख्याच मोलाचे असतील असें नाहीं. तें त्यांच्या कमीअधिक पाणिदारपणावर अवलंबून असतें. पण सोनें, रुपें हीं जरी अशुद्ध स्थितींत सांपडत असलीं व त्यावेळीं निरनिराळ्या वस्तूंत मिश्र झालेली असली तरी त्यांना शुद्ध करून कोणत्याही ठराविक कसाची केल्यावर त्यांच्या प्रत्येक समान भागाचें सारखेंच मोल असतें; ह्मणजेच त्यांचा प्रत्येक भाग सजातीय असतो. यामुळें त्यांचा नाण्यांच्या रूपानें उपयोग करणें सोईचे असते.

**५ सुविभाज्यता**:— निरनिराळ्या कमीजास्त मोलाच्या पदार्थांची अदलाबदल करून त्यांचा मोबदला देण्याकरितां पैसा ह्मणून वापरलेल्या जिनसाचे जरूरीप्रमाणें लहानमोठें तुकडेही पाडतां आले पाहिजेत. गाई, बैल, शेळया वगैरेंच्या बाबतींत तर हे अगदींच अशक्य आहे. तसेंच हिरे, माणिक, मोतीं वगैरेंच्या बाबतींतही असें भाग पाडणें कठीण आहे. त्यांचे तुकडे पाडिले तर त्यांची किंमत व उपयुक्तता ही प्रमाणाबाहेर कमी होतात. तेव्हां असलें जिन्नस पैसा होण्यास उपयोगी नाहींत.

**६ मूल्यस्थैर्य अथवा मोलाचा कायमपणा**:— आपण इतर सर्व पदार्थांचें मोल पैशानें मोजतो. ह्मणजे पैसा हा मोलाचें परिमाण आहे. ह्मणून पैशाचें स्वतःचें मोल नेहमीं स्थिर अगर कायम असलें पाहिजे. नाहींतर हें परिमाणच जर नेहमीं नेहमीं

बदलूं लागलें तर इतर सर्व वस्तूंचें मोलही त्याबरोबर प्रत्येक वेळीं बदलूं लागेल व व्यवहारांत घोंटाळे उत्पन्न होतील. पैशामध्यें मूल्य-स्थैर्य हा गुण ज्या मानानें कमी असेल त्या मानानें पुरे होण्यास कालावधी लागणाऱ्या व्यवहारांना अधिक अडथळे येतील व असे व्यवहार फारसे वाढणारच नाहींत. अधुनिक समाजांत तर असलेच व्यवहार जास्त आहेत हे लक्षांत ठेविले ह्मणजे या गुणाचें महत्व कळून येईल.

७ अभिज्ञेयताः— पैसा हा व्यवहारांत नित्योपयोगी असा असल्यामुळें पैसा ज्याचा बनवावयाचा तो जिन्नस कोणालाही चट-कन ओळखतां आला पाहिजे. नाहींतर दरवेळीं प्रत्येकाला पैसा घेतांना अगर देतांना त्यांतील प्रत्येक नाणें लक्षपूर्वक तपासावें लागेल, त्याचें वजन करून ध्यावें लागेल, व तें कसाला लाऊन पहावें लागेल. यामुळें व्यवहार करतांना प्रत्यहीं फारच अडचण व गैरसोय होईल. इतकेंच नव्हे तर गरीब अडाणी लोकांना फसवावयाला धूर्त व लबाड लोकांना चांगलेंच फावेल. हिरे, माणीक वगैरे रत्नांचा इतर कांहीं दृष्टीनें जरी चांगला उपयोग होण्यासारखा असला तरी या बाबतींत मात्र तीं निरुपयोगीच ठरतील; कारण त्यांची पारख करावयाची ह्मणजे चांगला अनुभविक व तज्ज्ञ असा रत्नपारखीच पाहिजे. सर्व साधारण लोकांचें तें काम नव्हे.

वरील सातही गुण ज्या वस्तूंमध्यें एकत्र असतील अगर निदान शक्य तितक्या अधिक प्रमाणांत असतील अशा वस्तूंचाच

पैसा ह्मणून उपयोग करणें योग्य होईल. इतर सर्व वस्तूंपेक्षां धातूंमध्यें हे सर्व गुण जास्त प्रमाणांत वसत असल्यामुळें व त्यांतल्यात्यांत सोन्यारुप्यांमध्यें या गुणांचें प्रमाण सर्वांत अधिक असल्यामुळें, हीं पैशाला अधिक योग्य ह्मणून पुढें आलीं व इतर धातु व वस्तु मागें पडल्या. तांबें, निकल वगैरे धातूंचीं नाणींही बहुतेक देशांत प्रचारांत असतात, परंतु फक्त किरकोळ लहानसान व्यवहारांतच तीं उपयोगी पडतात. मोठमोठ्या व्यवहारांमध्यें व देवघेवीसाठीं त्यांचा उपयोग फारसा होत नाहीं. कारण या धातूंचें मोल सोनें, चांदी यांच्या मोलापेक्षां फारच कमी आहे. व पैशाची नेआण मोठ्या प्रमाणावर करावयाची झाल्यास यांच्यापेक्षां सोनें, चांदीं हे धातूच अधिक सोइस्कार ठरतात.

आतां सोनें व रुपें या धातूंना प्राचीन काळापासून जें इतकें महत्व प्राप्त झालें आहे त्याची वरील गुणांखेरीज इतरही कांहीं कारणें आहेत. हे धातु दिसावयाला पुष्कळ तेजस्वी असल्यामुळें मनुष्यप्राणी त्यांचा आपलें शरीर सुशोभित करण्याकरितां उपयोग करीत आला आहे. डामडौल व अलंकार यांची हौस व तज्जन्य हाव ही जवळजवळ मनुष्याच्या स्वभावांतच मुरलेली आहेत. तेव्हां ही पुरी करणारे पदार्थ साहजीकच प्रत्येकाला हवेसे असतात. तसेंच सोनें, रुपें हे धातु अगदीं दुर्मिळही नाहींत व अगदीं विपुलही नाहींत. इतर बऱ्याच धातूंपेक्षां त्यांचें मोल अधिक व्हावें इतके ते दुर्मिळ आहेत व साधारणपणें व्यवहाराला जितक्या प्रमाणांत

त्यांची गरज लागते तितके मिळण्याएवढें ते विपुलही आहेत. तसेंच अतिप्राचीन काळापासून रूढीच्या योगानें त्यांना जें महत्व प्राप्त झालें आहे तें आतांपर्यंत तसेंच कायम टिकलेलें आहे. या धातूंच्या मोलवानपणामुळें प्रत्येकाला त्यांचा हव्यास असतो व ज्याच्याजवळ हे जास्त प्रमाणांत असतील तो मनुष्य मोठा श्रीमंत समजला जातो. तसेंच ज्या देशांत सोनें चांदी अधिक तो देशही श्रेष्ठ मानला जातो व तेथें व्यापार, धंदे वगैरेंची भरभराट असते. एकंदरींत अद्यापपर्यंत तरी सोन्यारुप्याला मौल्यवान् समजलें जाते व सध्यांच्या परिस्थितींत तरी त्यांच्या विपुलतेवरच अर्थिक उन्नति मुख्यत्वेंकरून अवलंबून असते. सोन्याचा विपुल साठा असलेलीं अमेरिका, फ्रान्स वगैरे राष्ट्रें भरभराटीच्या उच्च शिखरावर असलेलीं आपल्यास दिसून येतात ही गोष्ट याचें उत्कृष्ट उदाहरण आहे.



## प्रकरण ८ वें.

# निष्कव्यवहार व ग्रेशमचा सिद्धांत

**'नाणें' ह्मणजे काय?:–** प्रत्येकजण दररोज निरनिराळीं नाणीं उपयोगांत आणतो पण नाणें ह्मणजे काय असें विचारिलें

असता त्याची बरोबर अन्वर्थक व्याख्या त्याला क्वचितच सांगतां येईल. जेव्हॉन्स या इंग्लिश अर्थशास्त्रज्ञानें 'नाण्याची' व्याख्या केली आहे; ती: 'coins are ingots of which the weight and fineness are certified by the integrity of designs impressed upon the surface of the metal.' ह्मणजे '**ज्यांच्या पृष्ठभागावर उठविलेल्या ठशांचा खरेपणा व खात्रीलायकपणा यावरून ज्यांच्या वजनाबद्दल व कसाबद्दल खात्री पटते अशा धातूंच्या तुकड्यांना नाणीं ह्मणतात.**' यावरून असें दिसून येईल कीं नुसते धातूचे तुकडे अगर कांहींतरी ठसे असणारे धातूचे तुकडे (उदाहरणार्थ पदकें, बिल्ले इ.) यांना कांहीं नाणीं ह्मणता यावयाचें नाहीं. तर ज्यांच्यावरील ठसे पाहिल्याबरोबर पहाणाराला ज्यांचें मोल तावडतोब समजतें, व ज्या तुकड्यांचें वजन व कस हीं अमुक एक ठराविक असलीच पाहिजेत हें निश्चितपणें सांगतां येईल, अशा धातुखंडाना 'नाणीं' ही संज्ञा देतां येते.

**नाणें कसें अस्तित्वांत आलें ?:**— निरनिराळ्या विनिमय-साधनांचा उपयोग करतां करतां त्यांतल्यात्यांत अधिक सोइस्कर म्हणून धातूंचा उपयोग जेव्हां मनुष्य प्रथमतः करूं लागला तेव्हां लहान मोठे तुकडे, कांड्या, कांबीं इत्यादि स्वरूपांतच त्यांचा उपयोग होत असे. अमुक एका वस्तूची किंमत अमुक इतक्या वजनाचें सोनें अगर रुपें अशी ठरली म्हणजे तेवढें सोनें अगर रुपें

तोलून घ्यावयाचें अगर द्यावयाचें. परंतु तें कितीसें शुद्ध आहे, अगर त्यांत दुसरी कसली मिसळ वगैरे आहे कीं काय, हें ठरविण्याकरितां तें कसाला लावून पहावें लागे. तेव्हां प्रत्येक देवघेवीच्या वेळीं होणारा हा दुहेरी त्रास चुकवावा कसा याबद्दल उपाय शोधतां शोधतां ही 'नाण्यां'ची क्लृप्ति निघाली असली पाहिजे.

**नाण्यांचा पूर्वेतिहासः**— मनुष्य फार प्राचीन काळापासून ह्मणजे इसवी सनापूर्वीही कित्येक शतकांपासून नाण्यांचा उपयोग करीत आला आहे. अमुक एकावेळीं नाणीं प्रथम प्रचारांत आलीं असें निश्चितपणें जरी सांगता येणें शक्य नाहीं तरी निदान अडीच हजार वर्षांपूर्वी देखील नाणीं प्रचारांत होतीं असें ऐतिहासिक पुराव्यावरून दिसून येतें. आपल्याकडील याज्ञवल्क्य–स्मृति, कौटिलीय–अर्थशास्त्र इत्यादि जुन्या ग्रंथांतून सुद्धां नाण्यांचा उल्लेख केलेला सांपडतो. तसेंच आशियामायनर मधील लीडिया प्रांतांत देखील इसवीसनापूर्वी ६०० वर्षे नाणीं अस्तित्वांत होतीं व बॅबिलोनियामध्यें त्यापूर्वी सुद्धां तीं अस्तित्वांत असावींत असा कित्येक विद्वानांचा अभिप्राय आहे. एकंदरींत अतिशय प्राचिन काळापासून नाण्यांचा प्रचार सुरू आहे ही गोष्ट निर्विवाद खरी आहे.

सुरवातीला नाणीं पाडणें हें निव्वळ देशांतील राजाचें काम आहे असें मानलें जात नव्हतें; तर खासगी लोक देखील नाणीं पाडीत असत. नाण्यांवर खासगी व्यक्तींनीं उठविलेले ठसे असत व त्यावरून त्यांची किंमत वगैरे समजावयाची असे. नाण्यांचे

आकारही कितीतरी निरनिराळ्या तऱ्हेचे असत. आणि नाणीं पाडण्याच्या कलेमध्यें अगर यंत्रसामुग्रीमध्यें हल्लींसारखी सुधारणा झालेली नसल्यामुळें बनावट नाणीं पाडण्याचें काम कांहीं फारसें कठीण नसें. पण पुढें पुढें नाणीं पाडणें हें देशांतील फक्त राजसत्तेचेंच कार्य आहे असें मानण्यांत येऊं लागले. कारण खासगी व्यक्तींच्या हातीं नाणीं पाडण्याचें काम राहिल्यानें बनावट नाण्यांच्या प्रसाराला नीटसा आळा बसत नसे. हें काम राजानें आपल्या हातीं घेतल्यानें खाजगी व्यक्तींना बनावट नाणीं पाडण्याला अवसर मिळेनासा झाला व बनावट नाणीं पाडणें हा देशांतील राजाविरुद्ध एक गुन्हा मानला जाऊन असा गुन्हा करणारास कडक शिक्षा देण्यांत येऊं लागली. जसजसे लोक सुधारत गेले आणि व्यापार व देवघेव यांची उत्तरोत्तर वाढ होत गेली तसतशी या वाढत्या व्यापाराच्या देवघेवीला नाण्यांचा भरपूर पुरवठा पाहिजे अशी जरूर भासूं लागली; व चांगल्या नाण्यांचा भरपूर पुरवठा नेहमीं चालू ठेवण्यासाठीं खासगी लोकांवर अवलंबून रहाणें हें अयोग्य व तोट्याचे आहे असें अनुभवास येऊं लागले. तसेंच एकाच दर्जाचीं नाणीं वजनानें, आकारानें, कसानें, किंमतीनें व दिसावयालाही एकसारखीं असलीं तरच तीं देवघेवीस सोइस्कर होतील. नाणीं पाडणाऱ्यां वेगवेगळ्या खासगी व्यक्तींच्या हातून असें होणें फारच कठीण असते. या सर्व कारणांमुळें फक्त देशांतील राजाकडेच नाणीं पाडण्याचा हक्क असणें व त्यांवर राजाचें योग्य नियंत्रण असणें हेंच योग्य आहे; व

हल्लीं सर्व सुधारलेल्या देशांत याचप्रमाणें पद्धत आहे. एकंदरींत हल्लींच्या काळीं नाण्यांची अगदीं परिणतावस्था झाली आहे असे ह्मटले असतां चालेल. पण या अवस्थेला येऊन पोंचावयाला कितीतरी दिवस लागले! पूर्वींच्या काळच्या कोणीतरी पाडलेल्या व कसल्यातरी आकाराच्या धातूच्या तुकड्यापासून, तें सरकारनें मोठ्या कौशल्यानें पाडलेल्या, हल्लींच्या सुंदर नाण्यांपर्यंत झालेलें संक्रमण, हें व्हावयास मध्यें कित्येक शतकें जावीं लागलीं! पूर्वीं पूर्वीं नाण्यांवर एकाच बाजूनें ठसे उठविलेले असत त्यामुळें दुसरे बाजूनें कानसून त्यांतील धातु काढून घेतां येत असे. तेव्हां दोन्ही बाजूंनीं ठसे उठविण्याची क्लृप्ती निघाली. तरीपण कडा घांसून नाण्यांचें वजन कमी करितां येईच. शेवटीं नाण्यांच्या कडांवरूनसुद्धां कांहीं अक्षरें काढण्याची अगर कंगोरे पाडण्याची युक्ति अमलांत आली. याप्रमाणें हळूं हळूं सध्यांच्या स्थितीला नाणीं पाडण्याची कला येऊन पोंचली. नाण्यांवर उठविण्यांत येणारे ठसेही हल्लीं इतके कौशल्यपूर्ण व सूक्ष्म रीतीनें कामें केलेले निघूं लागले आहेत कीं हुबेहूब तशीं बनावट नाणीं तयार करणें हें साधारण मनुष्यास शक्य नाहीं.

**चांगल्या नाण्यांच्या चलनाचें विशेषः**—हल्लीं कोणत्याही देशांतील निष्कचलनामध्यें मुख्यत्वेंकरून विशेष गोष्टी दिसून येतात; त्याः १ बनावट नाणीं पाडण्यास कायद्यानें प्रतिबंध. २ नाण्यांतील धातु लबाडीनें न कळतां काढून घेतां येऊं नये अशी व्यवस्था ३ नेहमीं होणाऱ्या वापरामुळें जी नाण्यांची झीज होते ती शक्य

तेवढी कमी होईल याबद्दल खबरदारी. याच कारणाकरितां सोन्या-चांदीचीं नाणीं कधींही अगदीं शुद्ध धातूची करीत नाहींत. हे धातु तितकेसे कठिण नसतात व त्यांच्यामध्यें दुसऱ्या एखाद्या कठिण धातूचें मिश्रण नसेल तर ते बरेच लवकर झिजतात. ह्मणून एखादा हलका पण कठीण धातु ( विशेषतः तांबें ), सोनें चांदी यांमध्यें अगदीं थोड्या प्रमाणांत मिसळून त्यांना जरूर तो कठिण-पणा आणतात व मग त्यांचीं नाणीं पाडतात. अशीं नाणीं अनेक शतकेंपर्यंत देखील टिकतात; यामुळें, तीं देशांतील राजांचें व लोकांच्या कलाकौशल्याचें एक ऐतिहासिक स्मारकच होऊन रहातात.

**प्रमाणनिष्क अथवा अंगभूत-मूल्य-निदर्शक नाणें.** (Standard coin):— देशांत चालू असलेल्या निरनिराळ्या नाण्यांचे साधारणः **अंगभूत-मूल्य-निदर्शक** आणि **कृत्रिम-मूल्य-निदर्शक** असे दोन प्रकार असतात. पहिल्या प्रकारच्या नाण्याला प्रमाणनिष्क ( Standard coin ) असें ह्मणतात. त्याचें मोल त्यामध्यें असलेल्या धातूच्या मोलावर सर्वस्वीं अवलंबून असतें; ह्मणजे त्या नाण्यांत असलेल्या धातूची जी किंमत तीच त्या नाण्याचीही किंमत. त्याच्या पृष्ठभागावरील शिक्यांचा अर्थ इतकाच कीं काय-द्यानें ठरविल्याप्रमाणें अमुक इतक्या वजनाची शुद्ध धातु त्यामध्यें आहे. अशा तऱ्हेच्या नाण्यांमध्यें व तेवढ्याच वजनाच्या शुद्ध धातूच्या तुकड्यामध्यें कांहीं फरक नाहीं असें ह्मटलें तरी एका अर्थी चालण्यासारखे आहे. हीं नाणीं परदेशांत जरी गेलीं तरी त्यांची

किंमत बदलत नाहीं कारण त्यांची किंमत ही एखाद्या देशांतील कायद्यानें ठरवून दिलेली अशी विवक्षित कृत्रिम किंमत नसून त्यांतील अंगभूत धातूची किंमत तीच त्यांची किंमत असते. अर्थातच कुठेंही गेलें तरी त्या धातूचें मोल कांहीं नाहींसें होत नाहीं.

**लाक्षणिक अथवा कृत्रिम-मूल्य-निदर्शक नाणें** (**token-coin**):—दुसऱ्या प्रकारच्या नाण्याला लाक्षणिक नाणें असेंहि ह्मणतात. याचें मोल त्यांतील धातूच्या मोलावरून ठरत नाहीं तर तें कायद्यानें ठरविलेले असते; व कायद्यान्वयें अगर पुष्कळ दिवसांच्या संवयीमुळें तीं एका विवक्षित प्रमाणांत 'प्रमाण-निष्का' बदलीं देवघेवींत वापरतां येतात. त्यांचें खरें मोल कांहींच नसतें असा याचा अर्थ नाहीं. त्यांच्यामध्यें असलेल्या धातूचें मोल कांहींतरी होणारच. परंतु त्या मोलापेक्षां त्यांचें व्यावहारिक मोल अधिक असतें व तें कायद्यानें ठरवून दिलेलें असतें. आपल्याकडील रुपयाचें उदाहरण घेतलें असतां असें दिसून येईल कीं त्याचें व्यावहारिक अगर कायदेशीर मोल पाहिलें तर तें 'सोळा आणे' आहे. परंतु त्यांतील धातूचें मोल अदमासें दहाच आणे होतें. ह्मणजे आपला रुपया हें प्रमाण-निष्क नसून लाक्षणिक नाणें आहे. तीच गोष्ट अधेली, पावली, चवली वगैरे नाण्यांची. त्यांचें खरें धातुरूप मोल हें त्यांच्या दर्शनी कायदेशीर मोलापेक्षां कमी आहे. अशीं लाक्षणिक नाणीं परदेशांत गेलीं ह्मणजे तेथें त्यांची किंमत त्यांच्यावर लिहिलेल्या त्यांच्या दर्शनी किंमती एवढी न रहातां त्यांच्यामध्यें असलेल्या

धातूच्या किंमती एवढी होते. सारांश लाक्षणिक नाण्याचें दर्शनी मोल त्याच्या देशापुरतेंच अमलांत असतें. परदेशांत तें तसें चालत नाहीं.

**मुख्य पैसा आणि उपपैसा;** अथवा **परिमित व अपरिमित कायदेशीर-फेडीचीं-चलनें**:— ज्याप्रमाणें पैशाचे अंगभूत-मूल्य-निदर्शक व कृत्रिम-मूल्य-निदर्शक असें प्रकार करतात त्याप्रमाणेंच ( १ ) मुख्यपैसा ह्मणजे अपरिमित कायदेशीर-फेडीचें-चलन ( full legal tender) व ( २ ) उपपैसा ह्मणजे परिमित कायदेशीर-फेडीचें-चलन ( limited tender ), असेही दोन भेद करिता येतात (पा. ६४ पहा). हे भेद वरील प्रकारापैकीं कशाचेही पोटभेद नसून निराळयाच तत्वावर केलेले आहेत. ज्या पैशाच्या कितीही मोठ्या रकमा कर्ज-फेडीसाठीं अगर देवघेवीमध्यें देतां येतात नव्हें सावकारास जो पैसा कितीही मोठ्या रकमेनें घेण्याचे कायदेशीरपणें नाकारितां येत नाहीं ( That which must be accepted by creditor up to any amount when offered in final discharge of debt or in full payment for commoditties ) त्याला मुख्यपैसा अगर अपरिमित कायदेशीर–फेडीचें–चलन म्हणतात. उलट कांहीं नाणीं फक्त लहानसहान देवघेवीमध्येंच उपयोगांत आणण्यासाठींच केलेली असतात. अशा नाण्यांची एखादी मोठी रक्कम कर्जफेडीस आपण देऊं लागल्यास ती घेण्यास सावकार कायद्यानें बांधला गेलेला नसतो. अशा नाण्यांना उपपैसा अगर परिमित कायदेशीर–फेडीचें–चलन ( Limited

legal tender ) ह्मणतात. याप्रमाणें पहातां इंग्लंडमध्यें पौंड, हिंदुस्थानांत रुपया हा मुख्यपैसा होय. तसेंच इंग्लंडमध्यें शिलिंग वगैरे व हिंदुस्थानांत अधेली, पावली, पैसा वगैरे ही उपपैसा होत. या उदाहरणांवरून हेहि लक्षांत येईल कीं अंगभूत--मूल्य--निदर्शक व कृत्रिम--मूल्य--निदर्शक अशा दोन्ही प्रकारचा पैसा मुख्यपैसा ह्मणून असूं शकतो व पुष्कळ ठिकाणीं तसा तो आहेही. उपपैसा मात्र सगळीकडे कृत्रिम-मूल्य-निदर्शकच आहे. कारण अशा तऱ्हेच्या पैशाचें कार्य बरेंच परिमित व नेहमीं देशांतल्या देशांत असल्यानें अशा नाण्यांत भरपूर धातु घालण्याची जरूरच नाहीं.

**नाण्यांच्या चलनाचें तत्त्वः**—मनुष्याच्या वर्तनावर रूढी आणि संवय या दोहोंचें कल्पनातीत वर्चस्व आहे. इंग्रजीमध्यें 'Habit is second nature' म्ह. संवय हा दुसरा स्वभावच आहे अशी एक म्हण आहे. तसेंच आपल्याकडें 'शास्त्रात् रूढिर्बलीयसी' अशीही एक म्हण आहे. यावरून आपल्याला यांच्या महत्त्वाची थोडीशी कल्पना येईल. पुष्कळशा सामाजिक गोष्टी अशा आहेत कीं, वरील तत्व लक्षांत घेतल्याशिवाय त्यांची नीट उपपत्ति लागत नाहीं. आपल्या हिंदू समाजांत तर याचीं उदाहरणें प्रत्यहीं दृष्टीस पडतात. एखाद्या देशामध्यें प्रचारांत असलेल्या पैशाचे म्हणजे चलनाचें बाबतींतही हेंच रूढीचें व संवयीचें वर्चस्व दिसून येतें. देशांतील सर्व लोक चालू चलन स्वीकारण्यास नेहमीं कां तयार असतात हे यावरून दिसून येईल.

आतां याचा आपण थोडा जास्त विचार करूं. प्रथमतः आपण एखादें अगदीं खेडेगांवांतील उदाहरण घेऊं. कुठल्याही अडाणी शेतकऱ्याला आपण एक रुपया दिला व त्याचेकडे धान्य मागितलें तर तो चटकन धान्य देऊन कांहीं कांकू न करितां रुपया घेईल. याचें कारण काय असावें? त्याला त्यांतील धातूचें मोल काय आहे, ती कोणत्या कसाची आहे, रुपयाचें कायदेशीर स्वरूप काय आहे वगैरे गोष्टींचें ज्ञानही नसते; अगर सरकारी कायदा काय आहे, कायदेशीर फेडीचें चलन म्हणजे काय इत्यादि तत्वेंही तो कोठें शिकावयाला गेलेला नसतो. मग तो जो बिनहरकत खुषीनें आपण देऊं केलेल्या रुपयाचा स्वीकार करतो याचें कारण काय असावें? या प्रश्नाचें थोडक्यांत उत्तर असें देतां येईल कीं बहुजन समाजांत जीं नाणीं चालतात ती रूढीमुळें अगर **संवयीमुळें**. सामान्य लोकांस कायदा, तत्व अन् सिद्धांत अगर विनिमय साधन म्हणजे काय व चलन म्हणजे काय याची माहिती नसते. त्यांच्या वर्तनाला मुख्य आधार म्हणजे पूर्वापार चालत आलेल्या रूढीचा व त्यांच्या नेहमीच्या संवयींचा. एक क्ष कुणबी आपल्या धान्याबद्दल रुपया कां घेतो तर इतर लोक घेतात ह्मणून. तो आपल्या जन्मापासून पहात आला आहे कीं सर्व लोक आपापल्या गरजा भागविण्यास व्यवहारामध्यें पैशानें देवघेव करतात; ह्मणून तोही करतो. त्याची खात्री असते कीं आपण आज एक रुपया घेऊन आपल्या जवळील धान्य दिलें तर उद्यां आपल्यास जरूर लागल्यास तोच

रुपया देऊन कोणाकडूनही तसेंच धान्य अगर तितक्या मोलाची इतर कोणतीही वस्तु मिळेल. अर्थातच इतर लोक पैसे घेईनासे झाले तर तोही घेणार नाहीं. शिवाय कोणीही साधारणतः नाणें स्वीकारतो याचें कारण तें त्याच्या परिचयाचें असतें ह्मणून. नाणें दिसावयास आपल्या नेहमीच्या माहितींतलें असलें कीं आपण तें चटकन् घेतों. पण तेंच जर निराळ्या आकाराचें व स्वरूपाचें असलें कीं मनुष्य बिचकतो व तें घेण्यास कचरतो. याचें प्रत्यंतर आपल्याला नेहमीच्या व्यवहारांत पहावयास सांपडतें. हल्लीं सर्वत्र प्रसार पावलेल्या निकलच्या चवल्या, पावल्या जेव्हां नवीनच प्रचारांत येत होत्या तेव्हां खेडेगांवचे अडाणी लोक हीं नाणीं घ्यावयास खुष नसत. कारण असलीं नाणीं त्यांनीं पूर्वीं कधींही चाललेली पाहिली नव्हती, व ह्मणून आपल्याकडून इतर कोणीही हीं स्वीकारतील किंवा नाहीं याची त्यांना खात्री वाटत नसे. पुढें जसजशीं हीं नाणीं प्रचारांत येत जाऊन यांची लोकांना संवय होत गेली तसतसे लोकही मग तीं वापरूं लागले. तसेंच एखादा गोंव्याचा पैसा अगर इंग्लिश शिलिंग (यांचे आकार अगदीं हुबेहूब आपला पैसा व अधेली यांच्या आकारासारखे असतात) कोणा दुकानदाराला देऊं केला तर तो ते घेत नाहीं. कारण त्यांच्यावरचे ठसे निराळे असतात व ते नेहमीच्या माहितीतले नसल्यामुळें इतर लोक ते त्यांच्याकडून घेत नाहींत. या संवयीचें महत्व इतकें आहे कीं कांहीं कांहीं वेळां राजे लोकांनीं नवीन नाणीं पाडण्याचे वेळीं त्यांचें पूर्वींचेंच दर्शनी स्वरूप (ह्म. त्यांवरील ठसे वगैरे)

जसेंच्यातसें कायम ठेविल्याचीं इतिहासांत कित्येक उदाहरणें आहेत.

**बहुजनसमाजाच्या श्रद्धेचा अयोग्य फायदा :—** नाण्यांच्या चलनाच्या मुळाशीं असलेल्या या लोकांच्या संवईचा व अंधश्रध्देचा फायदा घेऊन खोटीं नाणीं पाडणारे लोक व केव्हांकेव्हां देशांतील सरकारही, आपला मतलब साधण्यासाठीं लोकांना फसवितात. बहुजन समाजाजवळ नाणीं तोलण्याचें अगर पारखून घेण्याचें कांहीं साधन नसतें व त्यांना त्याची जरूरही भासत नाहीं. उलट दर घटकेला बारीकसारीक व्यवहार अशा तऱ्हेनें करूं लागल्यास तो एक मोठा त्रासच होईल. शिवाय एकदा एखाद्या प्रकारच्या नाण्याची संवय झाली व त्यावर विश्वास बसला कीं त्याच संवयीवर व विश्वासावर लोक तीं नाणीं पुढें वापरीत असतात. ह्मणून या गोष्टींचा फायदा घेऊन दिसावयास नेहमीं सारखीं पण कमी कसाचीं व कमी मोलाचीं नाणीं पाडून त्यांचा प्रसार केल्याचीं उदाहरणें दृष्टीस पडतात. पूर्वीं पूर्वीं तर अशा तऱ्हेचीं खोटीं नाणीं गुप्तपणें पाडून तीं व्यवहारांत चालविणें हा एक धंदाच होऊन बसला होता. सरकारनें कितीही प्रयत्न केले तरी या धंद्याचा समूळ नाश असा अद्याप पर्यंत कधींच झाला नाहीं. इतकेंच नव्हें तर खुद्द सरकारच देशाच्या अडीअडचणीच्या वेळीं असल्या मार्गाचा अवलंब करीत असल्याचीं कांहीं कांहीं देशांत उदाहरणें आहेत.

परंतु बहुजन समाज हा अडाणी व अंधश्रद्धाळू असला तरी समाजामध्यें असा एक वर्ग आहे कीं निरनिराळ्या नाण्यांची पूर्ण

माहिती करून घेणें व त्यापासून आपला सरळ मार्गानें कांहीं फायदा करून घेतां येत असल्यास तो करून घेणें हा त्यांचा धंदाच असतो. सराफ, सोनार, निरनिराळ्या देशाचे पैसे वटविणारे ( money changers ) वगैरे लोक त्यांपैकींच होत. नवीन नवीन चांगली (अधिक धातु असलेलीं) नाणीं दडपून ठेऊन, शक्यतों तीं वितळवून त्यांतील धातू विकणें व जुनी झिजलेली अशीं वाईट नाणीं प्रचारांत ठेवणें व अशारीतीनें आपला फायदा करून घेणें हा एक त्यांचा उद्योगच असतो. कदाचित् अशा कृत्यांना कायद्यानें बंदी केलेली असली तरी आपला फायदा होतो असें दिसून आलें कीं असले पुष्कळ लोक गुप्तपणें आपले उद्योग सुरू करतातच. ह्मणूनच या प्रकाराला कायमचा आळा कधींच बसत नाहीं.

**ग्रेशॅमचा सिध्दांतः—** ग्रेशॅमचा सुप्रसिद्ध सिद्धांत ही ह्याच प्रवृत्तीचा द्योतक आहे. सर टॉमस ग्रेशॅम हा इंग्लंडची राणी इलिझाबेथ हिच्या कारकिर्दींत होऊन गेला. तो तिचा अर्थिक सल्लागार होता व हल्लीची लंडनमधील रॉयल एक्सचेंज ( सराफकट्टा ) ही संस्थाही त्यानेंच स्थापन केली. ग्रेशॅमचा सिद्धांत अगदीं थोडक्यांत सांगावयाचा झाला तर असा आहे कीं **"वाईट पैसा चांगल्या पैशाला प्रचारांतून बाहेर घालवितो."** वास्तविक पहातां हा सिद्धांत ग्रेशॅमनें कांहीं नवीन शोधून काढला नाहीं. त्याच्याही पूर्वीं चौदाव्या शतकांतच कांहीं शास्त्रज्ञांना त्याबद्दल माहिती होती. पण हा सिद्धांत प्रथमतः विशेष प्रामुख्यानें ग्रेशॅमनें

प्रतिपादन केला व याला इतकी प्रसिद्धी दिली म्हणून यास ग्रेशॅमचा सिद्धांत हें नांव दिलें गेलें.

वर थोडक्यांत सांगितलेल्या ग्रेशॅमच्या सिद्धांताचें आतां थोडें विस्तारानें परीक्षण करूं. जेव्हां एकाच तऱ्हेचीं आणि कायद्यानें ठरविलेल्या प्रमाणबद्ध मोलाचीं, अपरिमित कायदेशीर फेडीचें चलन ( full legal tender ) म्हणून चालू असलेलीं, पण खरोखरीं कमीजास्त वजनाचीं व दर्जाचीं, नाणीं एखाद्या देशांत एकाचवेळीं प्रचारांत असतात तेव्हां त्यांपैकीं चांगली नाणीं ( म्ह. अधिक वजनाचीं व मोलाचीं ) प्रचारांतून नाहींशीं होऊं लागून कमी दर्जाचीं नाणीं त्यांच्या जागीं उपयोगांत येतात. पण हे अर्थातच एकाच देशांतील लोकांच्या आपापसांतील देवघेवीपुरतेच म्हणजे देशांतल्या देशांतच होय हे लक्षांत ठेविले पाहिजे. दुसऱ्या देशाचे लोक एका देशांतील नाण्यांना त्या देशांतील त्या नाण्यांची कायदेशीर किंमत न देतां त्यामधील धातूचीच किंमत त्यास देणार. अशा परदेशी व्यापाऱ्यांस देण्यासाटीं ' चांगला पैसा 'च वापरला पाहिजे. देशांतील व्यापारी अर्थातच आपापसांतील देवघेवीस शक्यतों हलका पैसाच वापरणार व चांगला पैसा परदेशी व्यापारास शिल्लक ठेवणार. अशा देण्याची जरूर पडली नाहीं तरीहि प्रत्येकजण हा पैसा जवळ सांठवून तो वितळवून त्याचा धातु म्हणूनच उपयोग करील. कारण धातुरूपांतच त्याचें मोल अधिक असणार. अशा रीतीनें चांगला पैसा प्रचारांतून नाहींसा होतो अगर परदेशीं जातो. याचें कारण एका उदाहरणानें स्पष्ट होईल.

समजा कीं ‘ अ ’ या नाण्याची किंमत कायद्यानें ५ ‘ ब ’ नाण्यांइतकी ठेविली असून दोन्हीही नाणीं अपरिमित कायदेशीर फेडीस चालतात पण ‘ अ ’ नाण्यांतील धातूची बाजारांत किंमत ६ ‘ ब ’ नाण्यांमधील धातु इतकी आहे. येथें ‘अ’ हें वरील अर्थानें चांगलें नाणें होय. आतां दुसऱ्यास देण्यासाठीं ‘ ब ’ नाणें वापरण्यांत व ‘ अ ’ नाणें स्वतःपाशीं ठेवण्यांतच प्रत्येकास फायदा आहे. ‘ अ ’ नाणें वितळवून त्याची धातु विकल्यास ६ ‘ ब ’ नाणीं मिळतील व त्यांनीं ६ ‘ ब ’ नाण्यांच्या किंमतीचा आपणास पाहिजे तो जिन्नस खरेदी करतां येईल पण ‘ अ ’ नाणेंच बाजारांत देऊं केल्यास आपणास ५ ‘ ब ’ नाण्यांच्या किंमतीचाच माल मिळेल.

हीच स्थिती झिजवट व अन्य तऱ्हेनें हलक्या झालेल्या नाण्यांची होय. आपणांस प्रत्यक्ष दिसून येतेच कीं प्रत्येक मनुष्य आपल्याजवळ शक्यतों नवीं चकचकींत नाणीं ठेऊन झिजवट नाणीं आधीं देण्याचा प्रयत्न करितो.

त्याचप्रमाणें एखाद्या देशांत दोन धातूंचीं नाणीं एकाचवेळीं अपरिमित कायदेशीर फेडीचें चलन ( Full legal tender ) म्हणून चालू असलीं व त्यांपैकीं एका धातूचें दुसऱ्या धातूशीं कायद्यानें ठरविलेलें विनिमय प्रमाण व त्यांचेमधील प्रत्यक्ष बाजारांत चालू असलेलें प्रमाण हीं निरनिराळीं असलीं तर ज्या धातूचें बाजारांतील प्रमाण तिच्या कायद्यानें ठरविलेल्या प्रमाणापेक्षां अधिक असेल त्या धातूचीं नाणीं प्रचारांतून कमी होऊन वितळविलीं जातात. कारण

या धातूचें नाण्याच्या रूपानें जें मोल असतें त्यापेक्षां शुद्ध धातूच्या रूपानें अधिक मोल होतें. उदाहरणार्थ सोनें व चांदी यांच्या नाण्यांचें कायदेशीर प्रमाण जर एकास दहा असें असेल व बाजारांतील सोन्याच्या व चांदीच्या किंमतींचें प्रमाण जर एकास पंधरा असेल तर सोन्याचें नाणें वितळवून तें बाजारांत शुद्ध सोनें ह्मणून विकण्यांतच फायदा आहे.

तसेंच जेव्हां अपरिवर्तनीय कागदी पैसा ( inconvertible paper money, प्र. ९ पहा ) व धात्वात्मक मुख्य पैसा हीं एकदमच प्रचारांत असतात व जेव्हां दोन्हींही अपरिमित कायदेशीर फेडीचीं चलनें असतात तेव्हां धात्वात्मक नाणें अधिक मोलवान असल्यानें प्रचारांतून कमी होतें व फक्त कागदी नोटा लोकांचे हातांत रहातात.

आजपर्यंतचा इतिहासही हेंच दाखवितो. गेल्या महायुद्धाचें वेळीं व नंतरही कांहीं दिवस युरोपांतील बऱ्याच देशांत अपरिवर्तनीय कागदी नोटांचा अतोनात अवास्तव प्रसार करण्यांत आला होता, व त्यामुळें त्यांची किंमतही फारच कमी झाली. अशा परिस्थितींत ग्रेशॅमच्या सिद्धांतानुसार या अपरिवर्तनीय नोटांच्या ह्मणजे वाईट पैशाच्या योगानें त्या देशांतील सोन्याचांदीचीं नाणीं प्रचारांतून कमी होऊन लोकांच्या हातांत कमीजास्त प्रमाणांत अशा कागदी नोटाच खेळत होत्या.

हिंदुस्थानांतील चलनांत सुद्धां सॉव्हारिन् हा रुपयाचे मानानें 'चांगला पैसा' आहे. कारण त्याची दर्शनी किंमत व अंगची

किंमत ह्या सारख्याच आहेत. त्यामुळें सॉव्हारिन् हा प्रचारांतून अगदीं कमी होऊन रुपया प्रचारांत राहिला. मुख्यतः तीन कार्यांकारितां सॉव्हरिन् रुपयापेक्षां अधिक सोइस्कर असल्यामुळें तो नेहमीच्या चलनांतून कमी होतो व फक्त या कार्यांकडेच त्याचा उपयोग केला जातो. हीं तीन कार्ये ह्मणजे ( १ ) परदेशीय देण्याची फेड करण्यास तिकडे पाठविणें, ( २ ) वितळवून सोनें करणें, व ( ३ ) सांठवून शिल्लक ठेवणें हीं होत. या तिन्हीं दृष्टींनीं विचार केला तर सॉव्हरिनच्या मानानें रुपया कमी दर्जाचाच ठरतो. परदेशांतील लोक रुपयाला त्याचें दर्शनी मोल देत नाहींत कारण त्याची अंगची धातुरूप किंमत ही त्या दर्शनी किंमतीपेक्षां बरीच कमी आहे. तसेंच पुढें उपयोगी पडतील ह्मणून ठेवावयाचीं झाल्यास सोन्याचीं नाणींच रुपयापेक्षां अधिक सोइस्कर होत. यामुळें सॉव्हरिन् हें सोन्याचें नाणें ( चांगला पैसा ) चलनांतून कमी होऊन रुपया ( वाईट पैसा ) मात्र चलनांत राहतो. ही गोष्ट हिंदुस्थानांत गेल्या ३०–४० वर्षांत सिद्ध झाली आहे.

**ग्रेशॅमच्या सिद्धांतास अपवादः**—हा सिद्धांतही इतर अर्थशास्त्रांतील सिद्धांताप्रमाणेंच एक अर्थिक जीवनांतील बळकट प्रवृत्ती असून निरपवाद व अगदीं ठाम असा मुळींच नाहीं म्हणजे तो कांहीं विशिष्ट परिस्थितींत व मर्यादेच्या आंतच लागूं पडतो. या संबंधीं पुढील दोन गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत.

१ देशांतील देवघेवीच्या व्यवहाराला सामान्यतः जितका

पैसा आवश्यक असतो त्यापेक्षां अधिक पैसा (चांगला व वाईट मिळून) प्रचारांत आलेला असला तरच हा नियम लागूं होईल. जरूरीपेक्षां अधिक चलन अस्तित्वांत असलें तरच कांहीं नाणीं त्यांतून काढून घेण्याला संधी मिळेल. तेंच जर प्रचारांत असलेला सर्व पैसा देखील व्यापाराच्या नेहमीच्या जरूरीपेक्षां कमी असेल तर चांगली व वाईट अशीं दोन्ही तऱ्हेचीं नाणीं (व्यापाराला त्यांची सर्वांचीच आवश्यकता असलेमुळें) प्रचारांत रहातील.

२ तसेंच देशांतील प्रचलित रूढी व लोकमत हीं विरुद्ध असतां ग्रेशॅमचा सिद्धांत अमलांत येऊं शकत नाहीं. ह्मणजे लोकमत व रूढी ही वाईट पैशाचे उपयोगाविरुद्ध असली तर चांगला पैसा ग्रेशॅमच्या सिद्धांताप्रमाणें प्रचारांतून कमी न होतां वाईट पैसाच कमी होईल. उदाहरणार्थ एखाद्या देशांतील अपरिवर्तनीय नोटांची किंमत फारच उतरल्यामुळें व लोकांचा त्यावरील विश्वास अजिबात उडून सोन्याची नाणीच हवी असल्यामुळें जर लोकमत अपरिवर्तनीय नोटांच्या चलनाविरुद्ध असेल तर चांगला पैसा प्रचारांतून न जातां वाईट पैसा ह्मणजे त्या नोटाच प्रचारांतून कमी व्हावयास लागतील. अर्थात् ही अपवादात्मक परिस्थिती होय.

सारांश कोणत्याही देशांत दोन तऱ्हेची, अपरिमित-कायदेशीर-फेडीचीं चलनें असल्यास त्यापैकीं हलकें चलन नेहमी चांगल्या चलनास प्रचारांतून घालवून देण्याची प्रवृत्ती दाखवितें.



## प्रकरण ९ वें.

# अधात्वात्मक पैसा.

पैसा ह्मटला ह्मणजे साधारणतः कोणाही मनुष्याच्या डोळ्यापुढें धात्वात्मक पैसा येतो. परंतु पैसा फक्त धातूंचाच असतो असें नाहीं, हें आपण मागें पाहिलेंच आहे. धातूमध्यें पैशाचे कांहीं गुण इतर वस्तूंपेक्षां अधिक प्रमाणांत असतात ह्मणून त्यांचा उपयोग प्राधान्यें करून पैसा ह्मणून होऊं लागला इतकेंच. पैशाचें मुख्य कार्य ह्म. विनिमय साधन हें जितकें सुलभतेनें, कमी त्रासांत व कमी खर्चांत होईल तितके करून घेण्याकडे मानवी बुद्धीचा सामान्यतः कल असतो.

**अधात्वात्मक पैशाची अवश्यकताः—** मनुष्यां मनुष्यां मधली देवधेव आरंभी ऐनजिनसी अतएव अडचणींची व गैरसोईची होती. पुढेंपुढें मनुष्याच्या कल्पकतेनें त्यांतील अडचणी नाहींशा करण्याचे मार्ग सांपडून ती सोपी होत गेली व त्याबरोबरच श्रमविभागाचें तत्वानें संपत्युत्पादनाची व व्यापाराची वृद्धी होत गेली ती इतकी कीं सध्यां जगाच्या एका टोंकास उत्पन्न केलेल्या जिनसाचा उपयोग दुसऱ्या टोंकास केला जातो व अशा तऱ्हेनें आंतरराष्ट्रीय व्यापाराचा एक अवाढव्य पसारा होऊन राहिला आहे. अशा तऱ्हेच्या या प्रत्यहीं वाढत्या व्यापाराला धात्वात्मक विनिमय साधन हें सुद्धां अडचणीचें व गैरसोईचें वाटूं लागल्यास त्यांत नवल काय? विस्तृत

प्रमाणावर व्यापार होऊं लागला कीं मोठमोठ्या रकमांच्या देवघेवी कराव्या लागतात. पण धात्वात्मक पैशाच्या रूपानें अशा रकमा नेण्याआणण्याचें एक मोठें ओझेंच असतें. तसेंच तो सुरक्षित ठेवणें वगैरे कामें फारच त्रासाची व जोखिमेची आहेत. धात्वात्मक पैसा फार मोठ्या प्रमाणांत जवळ बाळगून तो इकडे तिकडे नेणें हेंहि मनुष्याला शक्य नसते. एकंदरींत हीं सर्व कामें धात्वात्मक पैशापेक्षां कागदी पैशाच्या योगानेंच अधिक सुलभ रीतीनें पार पाडतां येतात. यामुळेंच अधात्वात्मक अगर कागदी पैसा अस्तित्वांत आला.

**वाढत्या व्यापाराच्या वाढत्या गरजाः**— पैशाची जीं निरनिराळीं चार पांच कार्यें आहेत. तीं सर्व एकसमयावच्छेदेंकरून एकाच वस्तूच्या सहाय्यानें उरकणें हें व्यापाराची फारशी वाढ झालेली नसते अशा परिस्थितींतच सोईचें असतें. परंतु सदा सर्वकाळ कोणत्याही परिस्थितीमध्यें हीच पद्धति सोईची होईल असें मात्र नाहीं. तर उलटपक्षीं निरनिराळ्या वस्तूंकडून निरनिराळीं कार्यें केलीं जाणें हेंच कांहीं कांहीं वेळां अधिक सोइस्कर असतें. व म्हणून व्यापाराची जसजशी वाढ होत जाते तसतसें मोलाचें सर्व-साधारण–परिमाण ( A common measure of value ) हें मात्र धात्वात्मक राहून गिऱ्हाईक व व्यापारी यांचे दरम्यान वारंवार दिलें घेतलें जाणारें प्रत्यक्ष विनिमय साधन हें निराळ्या तऱ्हेचें [ उदाहरणार्थ कागदी ] पण धात्वात्मक पाठिंब्यावर उभारिलेलें असें होऊं लागतें थोडक्यांत सांगावयाचे म्हणजे देवघेव धात्वात्मक पैशाचे

नांवावर पण प्रत्यक्ष कागदी पैशाचें स्वरूपानेंच होतें. उदाहरणार्थ ‘अ’ या व्यापाऱ्यास एकाकडून पन्नासहजार रुपये मिळावयाचें असले तर हिशेब अर्थात रुपयामध्यें झाला पण हा व्यापारी प्रत्यक्ष रक्कम घेतांना नोटा घेईल किंवा देणेकऱ्याकडून ‘चेक्’ घेईल, हुंडी घेईल अगर त्याची स्वतःची देणीं भागविण्यासाठीं ‘येण्या’च्या रकमेवरच हुंड्या देईल अगर इतर अन्य तऱ्हेनें हिशेब पुरा करील व शक्यतो इतक्या रुपयांची ने आण वांचवील. विशेषतः आंतरराष्ट्रीय व्यापारांत तर अशा तऱ्हेचा कागदी हिशेबांचा उपयोग जवळ जवळ पूर्णत्वास गेला आहे. अशा तऱ्हेनें व्यापाराच्या वाढत्या परिस्थितींत व अंतरराष्ट्रीय देवघेवींच्या कामीं धात्वात्मक विनिमय साधनांचा प्रत्येक खेपेस उपयोग करण्याची जरूर लागत नाहीं तर अशा तऱ्हेचे व्यवहार ‘कागदी घोडे’ नाचवूनच करण्यांत येतात.

**कागदी पैशास मोल कां येतें:—** या ठिकाणीं आपल्याला हें विसरतां कामा नये कीं कागदी पैशाचे जें महत्व असतें तें त्याच्या पाठीशीं असलेल्या धात्वात्मक पैशाच्या पाठिंब्यामुळें व पाहिजे तेव्हां कागदी पैशाच्या ऐवजीं **धात्वात्मक पैसा मिळेल ह्या लोकांच्या विश्वासामुळेंच** होय. ह्मणजे कागदी पैशाचें मोल हें अप्रत्यक्षपणें त्याच्या बदलीं धात्वात्मक पैसा मिळेल या खात्रीवर अवलंबून असतें किंवा थोड्या दुसऱ्या भाषेंत बोलावयाचें झालें तर कागदी पैसा ह्मणजे कागदावर दर्शविलेली रक्कम रोख चलनी नाण्यामध्यें केव्हांही मिळेल अशी खात्री देणारें एक प्रकारचें आश्वासनच असतें. तथापि कांहीं

वेळां लोकांना झालेल्या पुष्कळ दिवसांच्या संवयीमुळें या धात्वात्मक पैशाच्या पाठिंब्याची जरूरी कागदी पैशाला तितकीशी लागत नाहीं. पण हा एक विशिष्ट परिस्थितीचा परिणाम आहे. याला सर्वसाधारण नियम असें ह्मणतां येणार नाहीं. कारण पैशाच्या द्रव्यामध्यें असावा लागणारा एक मोठा गुण—अंगभूत मूल्य( Intrinsic value )— हा कागदामध्यें मुळींच नसतो. कागदी पैशाचें 'अंगभूत' मोल जवळ जवळ कांहींच नाहीं ह्मटलें तरी चालेल. कागदाचें मोल तें असें किती असणार? अर्थातच कागदी पैसा हा 'लाक्षणिक पैशा'चें ( token money ) उत्कृष्ट उदाहरण आहे. ज्याप्रमाणें लाक्षणिक पैशाचें मोल त्यामध्यें असलेल्या धातूच्या मोलावर मुळींच अवलंबून असत नाहीं तर कायद्याप्रमाणें त्याच्या मोबदला मिळणाऱ्या "प्रमाण निष्कांवर" ( Standard money ) अवलंबून असतें त्याचप्रमाणें कागदी पैशाचें मोल कागदाच्या छापील तुकड्यावर अवलंबून असत नाहीं तर त्याच्या मोबदला मिळणाऱ्या धात्वात्मक पैशावर—नाण्यांवर—अवलंबून असतें.

**कागदी पैशापासून फायदे:**— परंतु पैशाचें कार्य चांगल्या रीतीनें पार पाडण्यांत कागदी पैशाचा सोन्यारुप्याप्रमाणेंच किंबहुना त्यांच्यापेक्षांही अधिक उपयोग होतो. कारण कागदी नोटांच्या योगानें ( १ ) मोठमोठ्या रकमांची देवघेव करावयाला, ( २ ) त्या इकडे तिकडे नेण्याआणण्याला, सोन्यारुप्यांपेक्षां जास्त सोईचें पडतें. ( ३ ) त्या ठेवावयालाही फारसा त्रास व खर्च

लागत नाहीं. (४) त्यांच्या योगानें पुष्कळशा मालाचा सांठा अगदीं लहान जागेंतही करून ठेवतां येतो. धात्वात्मक पैशाचें तसें नाहीं. (५) कागदी पैसा वापरल्यामुळें नाण्यासाठीं सोनें चांदी या धातु कमी लागून त्यांचा समाजोपयोगीं इतर उत्पादन कार्यें करण्याकडे जास्त उपयोग करतां येतो. (६) धात्वात्मक पैशाच्या ऐवजीं कागदी पैसा वापरल्यानें नाण्यांची झीज झाल्यामुळें होणारें नुकसानही कमी होतें. (७) नोटा ह्या त्यांच्यावर छापलेली तारीख व नंबर यामुळें चटकन ओळखतांही येतात.

कागदी पैशापासून होणाऱ्या या सोईमुळें तो प्रचारांत यावयाला फारच सोपें पडतें. सध्यां बहुतेक सुधारलेल्या देशांत—विशेषतः इंग्लंड व अमेरिका या देशांत—लोकांचे बहुतेक देवघेवीचे व्यवहार कागदी पैशाचे योगानेंच चालतात. तेथें बँकांचा प्रसार पुष्कळच झालेला असल्यामुळें व लोकांना आपला पैसा बँकांतून ठेवण्याची संवय लागल्यामुळें मोठमोठ्या रकमा सहसा कोणी आपल्या जवळ ठेवीत नाहींत. किरकोळ व लहानसहान देवघेवीखेरीज इतर देण्याघेण्याचा व्यवहार चेकच्या योगानें बँकांमार्फत भागविला जातो. व चेक देणाऱ्या इसमाच्या सच्चेपणाबद्दल व पतीबद्दल खात्री असली ह्मणजे त्याचा चेक, त्यानें दिलेल्या रोख पैशाप्रमाणेंच, घ्यावयाला कोणीही नाखूष असत नाहींत.

**'पतीच्या' पायावर कागदी पैशाची उभारणीः—** आतां या कागदी पैशाचा लोक जो व्यवहारांत स्वीकार करतात

त्याच्या मुळाशीं आणखी एक गोष्ट आहे; ती ह्मणजे **पत** (credit). ही पत सरकारची असली ह्मणजे तिच्या आधारावर जें कागदीं चलन अस्तित्वांत येतें त्याला आपण **कायदेशीर कागदीं चलन ह्मणूं.** ह्या चलनाला सरकारनें केलेल्या कायद्याचा आधार असतो. आपल्या-कडील 'करन्सी नोटा' अगर इतर देशांतील सरकारी कायद्याच्या आधारावर बँकांनीं काढलेल्या नोटा ह्या अशा तऱ्हेच्या चलनाचीं उदाहरणें आहेत. खासगी व्यक्तींच्या पतीच्या आधारावर जें कागदीं चलन अस्तित्वांत येतें त्याला आपण **व्यावहारिक कागदी पैसा** असें ह्मणूं. या पैशाचें नेहमींच्या माहितीतलें उदाहरण ह्मणजे 'चेक' हें होय. एखाद्या मनुष्यानें आपल्यास चेक दिला तर तो घेतांना आपण काय विचार करतो? तो मनुष्य सच्चा आहे, तो आपणांस फसविणार नाहीं, त्याची सांपत्तिक स्थिति चांगली आहे, त्याची लोकांमध्यें पतही चांगली आहे, ज्या बँकेवर त्यानें चेक दिला असेल त्या बँकेंत त्याचे पैसे ठेवलेले असणारच व त्या बँकेकडून आपणास ते पैसे मिळतील अशी आपल्याला खात्री वाटते ह्मणून आपण चेक घेतों. असा विश्वास जर आपणाला वाटणार नाहीं तर आपण त्या मनुष्याकडून चेक घेणार नाहीं. अशा तऱ्हेनें 'पती'च्या पायावर कागदी पैशाची उभारणी केलेली आहे.

**'पत' ह्मणजे काय?**:— तेव्हां ही जी एखाद्याची 'पत' आहे असें आपण ह्मणतो त्याचा अर्थ काय? 'पती'च्या कल्पनेचें थोडेसें पृथक्करण केलें तर आपल्याला असें दिसून येईल

कीं 'पत' (credit) ह्मणजे आपलें देणें केव्हांही देतां येण्याची शक्ति. आपण एखादे वेळीं ह्मणतो कीं अमुक गृहस्थाची रु. १०००० ची पत आहे. ह्मणजे दहाहजार रुपयापर्यंत केव्हांही देणें देण्याची त्याची ऐपत आहे. यामुळें आज जरी त्यानें दहाहजार रुपयांचा माल आणला व ताबडतोब पैसे न देतां पुढें देतों ह्मटलें तरी लोक त्याचें ह्मणणें ऐकतील. तेंच दुसऱ्या एखाद्या इसमाला इतका माल उधार मिळत नाहीं. ह्मणजे पहिल्याची जेवढी पत आहे तेवढी दुसऱ्याची नाहीं. एखाद्याची पत असते ह्मणजे लोकांना त्याच्या बद्दल पूर्ण खात्री असते कीं त्याच्याकडील आपलें देणें बुडणार नाहीं. त्याला आपलें देणें देण्याची ऐपत आहे, व त्याची तशी इच्छाही आहे; व पुढें ठरल्यावेळीं तो मनुष्य आपल्याला पैसे देईल. तेव्हां त्याच्या शद्बांवर अगर लेखावर विश्वास ठेवावयास कांहींच हरकत नाहीं.

**मनुष्याला पत कशी प्राप्त होते**:— आतां मनुष्याला पत कशी प्राप्त होते तें पाहूंया. मनुष्याला पत प्राप्त होण्याला दोन गोष्टी मुख्यतः लागतातः (१) त्याला आपलीं **देणीं द्यावयाची इच्छा** आहे असा लोकांचा त्याचेवर विश्वास बसला पाहिजे, ह्मणजे त्याचे सद्धेतुबद्दल व प्रामाणिकपणाबद्दल लोकांची खात्री असली पाहिजे. व (२) आपलीं देणीं द्यावयाची त्याची **ऐपत** आहे अशाबद्दलही लोकांची खात्री असली पाहिजे. अर्थात ही ऐपत त्याचें अंगीं येण्यास त्याचेजवळ पैसा ह्मणजे सामर्थ्य असलें पाहिजें.

जो अगदीं निष्कांचन आहे अशा मनुष्याला पत कोठून असणार. तो खूप प्रामाणिक असेल. पण जगांत नुसता सद्धेतु असून नेहमीं थोडेच चालते? त्या हेतूच्या जोडीला, त्याची परिपूर्तता करण्याला लागणारें साधन ह्मणजे पैसा हाही पाहिजेच. या वरून असें दिसून येईल कीं "पत ह्मणजे जवळ असलेल्या संपत्तीच्या व लोकांच्या विश्वासाच्या जोरावर प्राप्त झालेली प्रत्यक्ष रोख पैसा न द्यावा लागतां देवघेव करण्याची शक्ति" होय. आतां इतर सर्व वस्तूंचें मोल व्यवहारांत ज्याप्रमाणें पैशानें मोजलें जातें तशीच पतही पैशानेंच मोजली जाते, व अमक्याची पत इतकी आहे, तमक्याची तितकी आहे असें आपण ह्मणतो; आणि या पतीचा उपयोग मनुष्याला व्यवहारामध्यें प्रत्यक्ष पैशाप्रमाणेंच होतो. उदाहरणार्थ एखाद्या चांगल्या पतीच्या व्यापाऱ्यानें दिलेला चेक अगर हुंडी रोख पैशाप्रमाणेंच मानली जातात. पतीच्या या गुणामुळें तिच्या योगानें देशांतील व्यापाराच्या व उद्योगधंद्याच्या वाढीला फारच मदत होते; व विस्तृत प्रमाणावर संपत्तीचें उत्पादन शक्य होतें. तसेंच पतीच्या व्यवहारामुळें धात्वात्मक पैशाची बचत करता येते. थोड्याशा धात्वात्मक पैशाच्या आधारावर मोठमोठे देवघेवीचे व्यवहार करता येतात. व उत्तरोत्तर वाढत्या व्यापाराला लागेल तेवढें चलन पुरविता येते. या गोष्टी निव्वळ धात्वात्मक पैशावर अवलंबून राहून झाल्या नसत्या.

**कागदी पैशाचे मुख्य प्रकारः-** कागदी चलनाचे

**कायदेशीर** व **व्यावहारीक** असे दोन भाग पाडतां येतात (प्र. ५ पहा). कायदेशीर कागदी पैशाचे तीन प्रकार असतात ते असे:—

१ प्रातिनिधिक कागदी पैसा ( Representative paper money )

२ विश्वासात्मक कागदी पैसा ( Fiduciary paper money )

३ अधिकारजन्य अगर फर्मानी स्वरूपाचा कागदी पैसा ( Fiat or conventional paper money ).

पहिल्या प्रकारचा कागदी पैसा नेहमीं परिवर्तनीय ( convertible ) असतो. दुसऱ्या प्रकारच्या पैशामध्यें परिवर्तनीय व अपरिवर्तनीय ( inconvertible ) अशा दोन्हीं तऱ्हा असूं शकतात. व तिसऱ्या प्रकारचा पैसा सर्वस्वीं अपरिवर्तनीय असतो.

१ **प्रातिनिधिक कागदी पैसा:**—जेव्हां देशांतील सरकार किंवा बँका आपल्या जवळ सोन्या चांदीचा सांठा ठेऊन त्याच्या तारणावर तेवढ्या किंमतीच्या नोटा काढतात, तेव्हां अशा प्रकारच्या नोटांना प्रातिनिधिक कागदी पैसा ह्मणतात, या नोटा ह्मणजे त्यांवर लिहिलेली रक्कम सरकारी तिजोरींत अगर बँकेच्या गंगाजळींत शिल्लक ठेविलेली आहे अशा अर्थाचे एक प्रकारचें दाखलेच ( certificates ) होत, ह्मणून अशा प्रकारच्या कागदी पैशाचा स्वीकार करणाऱ्या इसमास धोका येण्याचा मुळींच संभव नसतो. उलट त्याचे सहाय्यानें पैशाच्या देवघेवीची व वाहतुकीचीं कार्येंमात्र सुलभ होतात.

२ **विश्वासात्मक कागदी पैसाः—** ज्या नोटा अगर दर्शनी हुंड्या, आपल्याकडील सरकारी करन्सी नोटाप्रमाणें, त्या घेऊन येणारांस त्यांचेबद्दल त्यांवर लिहिलेली रक्कम ते मागतील तेव्हां धात्वात्मक पैशाच्या रूपानें रोख देण्याचीं लेखी वचनेंच होत; अशा नोटांस विश्वासात्मक कागदी पैसा ह्मणतात. प्रातिनिधिक कागदी पैशाप्रमाणें या प्रकारच्या कागदी पैशाबद्दल तितक्या किमतीचें सोनें चांदी तारण ह्मणून शिलकेंत ठेवावीं लागत नाहींत; तर त्या तारणापैकीं थोडासा भाग सोन्या चांदीच्या रूपानें ठेवून कांहीं भाग इतर स्वरूपांत [ उदाहरणार्थ निरनिराळ्या सिक्यूरिटीज वगैरेमध्ये ] ठेवला तरी भागते व तसा तो ठेवलेलाही असतो. कारण असा पैसा ह्मणजे कागदी नोटाबद्दल धात्वात्मक नाणीं देण्याचीं वचनेंच असल्यानें व अशा वचनांवर, तीं पाळली जातील असा लोकांचा दृढ विश्वास असल्यामुळें, प्रत्यक्ष व्यवहारांत सर्वच लोक कांहीं याबद्दल एकदम रोख नाणीं मागावयास येत नाहींत. ह्मणजे अशा पैशाला तो काढणारावर असलेल्या लोकांच्या विश्वासाचेंच अधिक पाठबळ असतें.

३ **अधिकारजन्य अथवा फर्मानी स्वरूपाचा कागदी पैसाः—** ज्या नोटा नांवाला मात्र प्रॉमिसरी नोटा सारख्या असतात पण ज्यांच्या बदलीं धात्वात्मक पैसा देण्याची नोटा काढणारांवर जबाबदारी नसते, ह्मणजे ज्या अपरिवर्तनीय असतात, व ज्या देशांतील सरकार अगर सरकारानें पाठिंबा व अखत्यार दिलेल्या एखाद्या बँकेच्या, केवळ सुलतानी फर्मानांच्या जोरावरच लोकांना घ्याव्या

लागतात अशा नोटांना अधिकारजन्य अगर फर्मानी कागदी पैसा ह्मणतात. हा पैसा अपरिवर्तनीय असल्यामुळें त्याच्याबदली तारण ठेवण्याची पैसा काढणारावर जबाबदारी नसते.

**परिवर्तनीय कागदी पैसा**:— कागदी पैसा काढणारावर अशा पैशाबद्दल धात्वात्मक पैशाची मागणी येईल त्यावेळीं तो द्यावयाची जबाबदारी असणें अगर नसणें या अन्वयें परिवर्तनीय अगर अपरिवर्तनीय असेंही कागदी पैशाचे दोन प्रकार पाडतां येतात. 'ज्या कागदी पैशाबद्दल आपल्याला पाहिजे त्या वेळीं तेवढ्या किंमतीचा रोख धात्वात्मक पैसा मिळूं शकतो त्याला परिवर्तनीय कागदी पैसा ( convertible paper money ) असें ह्मणतात.' परिवर्तनीय नोटा काढण्याचा अधिकार सरकारी, निमसरकारी, अगर खासगी बँकांनाही कायद्यानें दिलेला असतो व क्वचित् प्रसंगीं सरकारही असा पैसा काढते. परिवर्तनीय पैसा सरकारनें काढावा हें श्रेयस्कर कीं हा अधिकार बँकांच्याकडे असावा हें अधिक श्रेयस्कर याबद्दल एकेकाळीं मोठा वाद माजून राहिला होता. पण हल्लीं सर्व पुढारलेल्या देशांत बँकांनाच अशा तऱ्हेच्या नोटा काढण्याचा अधिकार देण्यांत आलेला आहे. तरीही हिंदुस्थानमध्यें अजून सरकारच नोटा काढण्याचें काम करीत आहे. हें काम बँकांकडे असावें हेंच अधिक श्रेयस्कर होय. कारण बँकांचा व्यापारी जगाशीं रोजच्यारोज संबंध येत असल्यामुळें व्यापारी देवघेवीला किती चलनाची जरूरी आहे वगैरे गोष्टी सरकारपेक्षां त्यांनाच अधिक चांगल्या

समजावयास मार्ग आहे. कोणत्याही वेळीं व्यापार व संपत्त्युत्पादन यांची वाढ होण्यास किंबहुना ही योग्यतऱ्हेनें चालण्यासच जरूर त्या पैशाचा सतत पुरवठा पाहिजे. हा पुरवठा जास्त झाला अगर कमी झाला तरी दोन्हीहि स्थितींत अडथळे उत्पन्न होतातच. तो जरूर तितकाच असला पाहिजे. ही गोष्ट लक्षांत आली कीं वरील कारणाचें महत्व समजून येईल. त्याचप्रमाणें आपली पत संभाळण्याकरितां बँकांना अत्यंत काळजी घ्यावी लागत असल्यामुळें त्यांच्या हांतून अवास्तव नोटा निघण्याचा संभव फारच कमी असतो. कारण नोटाबद्दल रोख पैशाची मागणी केव्हां किती येईल याचा कांहीं नक्की नियम नसतो; व योग्य तारण न ठेवतां अवास्तव नोटा काढल्यास त्यांच्यावर एखादेवेळीं दिवाळखोरीचा प्रसंग ओढवण्याची भीति असते. उलट पक्षीं सरकारचा व्यापारी जगाशीं तितका निकट संबंध तर नसतोच पण हातांत सत्ता असल्यामुळें एखादेवेळीं अवास्तव नोटा काढावयाचा मोह बँकांपेक्षां सरकारलाच अधिक होण्याचा संभव असतो.

**अपरिवर्तनीय कागदी पैसा व त्यापासून होणारे दुष्परिणामः**— ‘ मागणी केली असतांही ज्या कागदी पैशाबद्दल रोख धात्वात्मक पैसा देण्याची जबाबदारी पैसा काढणारावर नसते अशा कागदी पैशाला अपरिवर्तनीय कागदी पैसा असें ह्मणतात. ’ अपरिवर्तनीय कागदी पैसा दोन तऱ्हेनीं अस्तित्वांत येऊं शकतो. एक तर सरकार असा पैसा काढते तेव्हां पासूनच ह्मणजे सुरवाती-

पासूनच तो अपरिवर्तनीय ह्मणूनच सुरू केला जातो. अगर आरंभीं पैसा परिवर्तनीय ह्मणून सुरू केला जाऊन पुढें तो काढणाऱ्या संस्थेची सांपत्तिक स्थिति डबघाईस आल्यामुळें त्याला पुरेसें तारण न राहून तो अपरिवर्तनीय झालेला असतो. गेल्या महायुद्धाचे वेळीं व त्यानंतरही कांहीं वर्षेंपर्यंत जर्मनी, आस्ट्रिया वगैरे देशांतील पैसा जवळ जवळ याच प्रकारचा झाला होता.

तेव्हां अपरिवर्तनीय कागदी पैसा ह्मणजे सरकारनें कागदाच्या तुकड्याला आपल्या सत्तेच्या जोरावर दिलेलें पैशाचें स्वरूप. व त्याची किंमत ह्मणजे सरकारनें त्यास दिलेली कृत्रिम किंमत. त्याचें स्वतःचें असें अंगभूत मोल जवळ जवळ शून्यच. अशा तऱ्हेचा बिन-तारणाचा पैसा सरकारला अडीअडचणींच्या वेळीं, लढाई वगैरे सुरू असतांना केव्हां केव्हां काढावा लागतो. परंतु या तऱ्हेच्या पैशाचा प्रसार जोंपर्यंत योग्य मर्यादेंत असतो, व तो काढणारावर कांहींतरी विश्वास असतो अगर त्याच्या सत्तेची भीति असते तोंपर्यंत ठीक. तरीही जर कां एकदां प्रमाणाबाहेर त्याचा प्रसार झाला तर मात्र त्याचें दुष्परिणाम देशास चांगलेच भोंवतात व अशा पैशाचा नाश होतो. अशा पैशाला सरकारनें जरी अपरिमित कायदेशीर फेडीचें चलन ( unlimited legal tender ) ह्मणून ठरविलेले असले तरी तो ज्या त्या देशापुरताच चालतो. परदेशांत त्याला कोणी कवडीचीही किंमत देत नाहीं. व देशांतल्या देशांत पैशाची बहुतेक कार्यें जरी त्याचेकडून होत असलीं तरी तो मोलाचा सांठा मात्र

होऊं शकत नाहीं. त्याचें मोल बेभरवशाचें व अस्थिर असतें. व त्याची किंमत केव्हां कमी होईल याचा नेम नसतो. त्याचे मोबदला धात्वात्मक पैसा द्यावयाची जबाबदारी अंगावर नसल्यामुळें तो प्रमाणाबाहेर वाजवीपेक्षां जास्त काढण्याचा मोह सहसा सरकारास आवरत नाहीं. कारण जरूर लागली ह्मणजे व्याज देऊन राष्ट्राच्या पतीवर कर्ज उभारण्यापेक्षां अगर लोकांवर अधिक कर बसवून लागेल तो पैसा वसूल करण्याचा प्रयत्न करून देशांतील लोकांस नाराज करण्यापेक्षां आपल्या हातांतील नोटांच्या छापखान्याच्या कल्पवृक्षाखाली बसून यथेच्छ पैसा उत्पन्न करण्याचा मोह कोणत्या सरकारास फार वेळ आवरेल? गेल्या महायुद्धाचे वेळीं युद्धांत पडलेल्या कांहीं कांहीं राष्ट्रांनीं मनोवांच्छित संपत्ति उत्पन्न करावयाच्या या सोप्या व बिनखर्चाच्या युक्तीचा अवलंबही केला होता; व शेवटीं त्याबद्दल त्यांना चांगलेंच प्रायश्चित्तही घडलें. हा पैसा परदेशांत चालत नसल्यामुळें देशांतल्या देशांतच सांचून राहतो. व देशांत बेभरंवशाच्या व बिन मोलाच्या वाईट कागदी पैशाचा सुळसुळाट होऊन चांगला धात्वात्मक पैसा नाहींसा होत जातो. पैशाचा जरूरीपेक्षां अधिक पुरवठा झाल्यामुळें त्याची किंमत कमी होते व पदार्थांच्या किंमती वाढत जातात. वस्तूंच्या किंमती वाढल्यां ह्मणजे आयात व्यापाराला उत्तेजन मिळतें व निर्गत व्यापार कमी होत जातो. व शेवटीं सर्व राष्ट्र कर्जबाजारी होण्याची वेळ येते. आणि पैशाचें मोल उतरूं लागलें ह्मणजे लोकांचा त्याचेवरील व त्याबरोबरच सरकारवरील

विश्वासही कमी होऊं लागतो. यावरून अपरिवर्तनीय पैशाच्या फाजील प्रसाराचे दुष्परिणाम किती दूरवर पोंचतात हें लक्षांत येईल.

**व्यावहारिक कागदी पैसाः**— वर आपण कागदी पैशाचे कायदेशीर व व्यावहारीक असे दोन प्रकार कल्पिलें होतें. परंतु दुसऱ्या प्रकाराला ह्मणजे आपण ज्याला व्यावहारिक असें ह्मटलें आहे त्याला पैसा हें नांव खरें पाहिलें असतां देणें योग्य नाहीं. कारण पैसा ज्या प्रमाणें सर्वमान्य विनिमय साधन ( Universal medium of exchange ) असतो त्याप्रमाणें चेक अगर हुंडी ही नसतात. त्यांचा प्रसार फक्त विवक्षित व मर्यादित क्षेत्रांत होतो; ह्मणजे परस्परांची माहिती असलेल्या लोकांतच होतो. देशांतील पैशाचे—नोटांचे अगर नाण्यांचें-तसें नाहीं. तो कोणीही स्वीकारतो. परंतु चेक व हुंडी ही जरी वरील अर्थाप्रमाणें पैसा या संज्ञेखालीं अगदीं कांटेकोरपणें येत नाहींत तरी दररोजच्या व्यवहारांत त्यांचा देवघेवींच्या कामीं बराच विस्तृत उपयोग केला जातो. ह्मणून चलनाचा एक प्रकार या दृष्टीनें त्यांचा येथें विचार करावयास कांहीं हरकत नाहीं.

**चेक** ह्मणजे आपण आपल्या बँकेला दिलेला पैसे देण्याबद्दलचा हुकूम होय. आपले पैसे बँकेमध्यें असतात. ते आपल्या स्वतःला न्यावयाचे अगर दुसऱ्या कोणाला द्यावयाचे झाले ह्मणजे आपण चेक लिहून देतो. ह्मणजे त्यांत लिहिलेली रक्कम त्यांत लिहिलेल्या इसमास अगर तो इसम ज्याचें नांव लिहून देईल त्या इसमास अगर तो चेक घेऊन जाईल त्या इसमास देण्याबद्दल आपण

बँकेला हुकूम करतो; व त्याप्रमाणें बँक पैसे देऊन ते आपल्या खात्याला खर्ची घालते. याचवेळीं या बँकेकडून या चेकचे पैसे घेणारा इसम बहुधा प्रत्यक्ष पैसे न घेतां या बँकेस आपल्या खात्यावर जमा करण्यास सांगतो अगर याचें खातें दुसऱ्या बँकेंत असल्यास तेथेंच चेक नेऊन देतो व ती बँक पहिल्या बँकेकडून पैसा जमा करिते; व याहि देवघेवींत बहुधा पैशाची प्रत्यक्ष हलवाहलव करावी लागत नाहीं. अशा रीतीनें चेकच्या योगानें मोठमोठ्या रकमांच्या देव-घेवी अगदीं थोड्या आयासानें व बहुधा कागदी हिशेबानेंच करितां येतात.

**हुंडी** हा चेकचाच एक प्रकार आहे असें ह्मटलें तरी चालेल. आपल्याकडील व्यापारी लोकांत हुंड्यांचा व्यवहार पुष्कळच चालतो. हुंडी ह्मणजे एका पेढीनें दुसऱ्या पेढीला अमुक एक रक्कम अमुक एका इसमाला द्यावी अशा अर्थाचा काढलेला हुकूम. यालाच इंग्लिशमध्यें ड्राफ्ट ( draft ) असें ह्मणतात. ही रक्कम जर हुंडी पोंचतांच ताबडतोब द्यावी असें लिहिले असेल तर तिला दर्शनी हुंडी असें ह्मणतात; जर कांहीं मुदतीनंतर ( उदाहरणार्थ २ महिने इ. ) द्यावी असें असेल तर तिला मुदतीची हुंडी असें ह्मणतात. दर्शनी हुंडीचे पैसे हुंडी मिळाल्याबरोबर ताबडतोब द्यावे लागतात. नाहींतर त्या पेढीची पत जाते. मुदतीच्या हुंडीचे पैसे मात्र ती मुदत भरे-पर्यंत देण्याला पेढी जबाबदार नसते. आपण पोस्ट ऑफिसांतून जी मनिऑर्डर करतो तीही एक प्रकारची हुंडीच होय असें ह्मटलें तरी चालेल. आपण ज्या ऑफिसांत पैसे भरतो ती एक पेढी; ज्या

ऑफिसांतून पैसे दिले जातात ती दुसरी पेढी व मनिऑर्डरीचा कागद ही हुंडी.

खासगी व्यक्तींच्या पतीच्या जोरावर व्यवहारांत प्रचारात येणारे वर सांगितल्याप्रमाणें पैशाचे दोन प्रकार झाले. तसाच तिसराही एक प्रकार आहे. त्याला **विनिमयपत्र** (Bill of Exchange) असें ह्मणतात. याचा उपयोग आंतरराष्ट्रीय व्यापारामध्यें फार होतो. ज्याप्रमाणें चेक व हुंड्या यांचे योगानें देशांतील अंतस्थ ( Internal ) देवघेवीचे व्यवहार सोपे व सोईचे होतात व व्यापाराची वाढ होण्याला मदत होते त्याचप्रमाणें विनिमयपत्रांचे योगानें देशाच्या बहिर्व्यापाराची ( External trade ) देवघेव सोपी व सोईची होते व आंतरराष्ट्रीय व्यापाराची वृद्धि होण्याला मदत होते. या विनिमयपत्रांचा विचार आपणास पुढें एका स्वतंत्र प्रकरणांत करावयाचा आहे.

सारांश कागदी पैसा हा धात्वात्मक पैशाच्या ऐवजीं ह्मणून चालू करण्या इतका योग्य व चांगला पैसा नसला तरी तो कांहीं अगदींच टाकाऊ नाहीं. इतकेंच नव्हे तर कांहीं बाबतींत तो धात्वात्मक पैशापेक्षां सरस ठरेल. विनाकारण पैशाची अवास्तव वाढ झाली तर चलनाची किंमत कमी होऊन वस्तूंच्या किंमती वाढतात व त्यामुळें व्यापार धंद्यामध्यें अनिश्चितता उत्पन्न होते ही गोष्ट जरी खरी आहे तरी योग्य खबरदारी घेतली असतां अशातऱ्हेच्या संकटांची सूचना अगाऊ मिळण्यासारखी असते व वेळींच जरूर ते

उपाय योजून तीं दूर करतां येण्यासारखीं असतात. ह्मणून गैर-वाजवी रीतीनें कागदी पैशाची अवास्तव फाजील वाढ करण्याला जर आळा घातला तर त्याच्या योगानें व्यापार व उद्योगधंद्यांची वाढ होण्याला पुष्कळच मदत होईल.



## प्रकरण १० वें.

# पैशाचें मोल.

**पैशाचें मोल ह्मणजे काय ?** :—पैसा हें मोलाचें परिमाण आहे. ह्मणजे सर्व वस्तूंच्या किंमती पैशानें मोजल्या जातात. पण इतर सर्व वस्तूंप्रमाणें पैसा हीही एक वस्तु असल्यामुळें इतर वस्तूंना जसें मोल असतें तसें पैशालाही मोल असलें पाहिजे. परंतु सामान्य मनुष्याला पैशाचें मोल ही कल्पना बरीच चमत्कारिक वाटते पण यांत चमत्कारिकपणा खरोखरच नाहीं हें दिसून येईल. आतां इतर सर्व वस्तूंचें मोल आपण पैशानें मोजतो, पण खुद्द पैशाचें मोल कसें मोजावयाचें ?

मागें सांगितल्याप्रमाणें एखाद्या वस्तूचें विनिमयांतील मोल ह्मणजे त्या वस्तूच्या मोबदला मिळणारें इतर सर्व वस्तूंचें

प्रमाण ( प्र. २ पहा ). यावरून असें दिसून येईल कीं पैशाचें मोल ह्मणजे **सामान्यतः त्याच्या मोबदला मिळणाऱ्या इतर वस्तूंचें प्रमाण;** किंवा थोड्या निराळ्या शद्बांत सांगावयाचें ह्मणजे त्याची इतर वस्तु मोबदला मिळविण्याची शक्ति अगर **क्रयशक्ति** ( purchasing power ) होय. आतां थोडा विचार केला असतां असें दिसून येईल कीं " एकंदरींत सर्वसाधारणपणें वस्तूंच्या किंमती कमी असल्या तर पैशाची क्रयशक्ति जास्त असते; व सर्वसाधारणपणें वस्तूंच्या किंमतीचें मान जास्त असलें तर पैशाची क्रयशक्ति कमी असते. " उदाहरणार्थ एक रुपयाला पूर्वीं साधारणपणें एखादी वस्तु जेवढी मिळत असे त्यापेक्षां हल्लीं ती कमी मिळूं लागली तर रुपयाची क्रयशक्ति कमी झाली असें ह्मणावें लागेल कारण पूर्वीं इतकींच ती वस्तु आपल्यास घ्यावयाची झाली तर पूर्वींपेक्षां अधिक पैसे द्यावें लागतात. ह्मणजे **इतर वतूंचें मोल वाढलें व त्याबरोबरच पैशाचें मोल कमी झालें.** सध्यां आपल्याकडे सर्वसाधारणपणें सगळ्याच वस्तु स्वस्त झाल्या आहेत. ह्मणजे पूर्वीं एखाद्या वस्तूला जितकी किंमत पडत असे त्यापेक्षां हल्लीं कमी पडते. यावरून असें दिसून येईल कीं सध्यां पैशाचें मोल वाढलें आहे व इतर सर्व वस्तूंचें मोल कमी झालें आहे.

**पैशाचें मोल ठरविण्याच्या मार्गांतील अडचणीः—** कोणत्याही वस्तूचा पुरवठा कमी अधिक झाल्यास तिची किंमत जास्त कमी होते हा जो ठोकळ नियम आपण मागें पाहिला (पा. ४ पहा)

तो पैशाचे बाबतींतही लागूं पडतो. पण अशा रीतीनें पैशाच्या मोलाचें निदान करणें ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं. बाजारांत सर्वच वस्तूंच्या किंमती सारख्या प्रमाणांत चढल्या अगर उतरल्या असत्या तर पैशाचें मोल अगर त्याची क्रयशक्ति ठरविणें फारसें कठीण नव्हतें. कारण सर्वच जिनसांच्या किंमती पूर्वीपेक्षां दुप्पट वाढल्या तर पैशाची क्रयशक्ति निम्मी झाली असें ह्मणतां येईल. तिप्पट वाढल्या तर एकतृतियांश, चौपट वाढल्या तर एकचतुर्थांश अशा तऱ्हेनें ज्या प्रमाणांत वस्तूंच्या किंमती वाढतील त्याप्रमाणांत पैशाची किंमत कमी झाली असें ह्मणतां येईल. त्याचप्रमाणें आज जी जी वस्तु बाजारांत एक रुपयास मिळूं शकते ती ती उद्या निम्म्या किंमतीस मिळूं लागली तर पैशाची किंमत दुप्पट वाढली असें ह्मटलें पाहिजे. कारण आतां एक रुपयास कोणतीही वस्तु पूर्वीच्या दुप्पट मिळूं लागणार, परंतु अगणित वस्तूंनीं भरलेल्या जगाच्या प्रत्यक्ष व्यवहारांत असें कधींच होत नाहीं. बाजारांत कोणत्याही वस्तूची किंमत एकाच कारणपरंपरेनें ठरत नाहीं. तर तिला अनेक गोष्टी कारणीभूत होतात. एक तर तिची किंमत तिच्या पुरवठ्याच्या कमीजास्तपणावर अवलंबून असते. तसेंच तिला असणाऱ्या मागणीच्या कमीअधिकपणाचाही तिच्या किंमतविर परिणाम होतो. तसेंच लोकांची आवड, पुनरुत्पादनाची सोय, फॅशन वगैरे कित्येक गोष्टींचा मागणीवर ह्मणजे शेवटीं किंमतीवर परिणाम होतो. याशिवाय तिसऱ्याही एका कारणानें वस्तूंच्या किंमती बदलूं शकतात. व हें

कारण मात्र प्रत्येक वस्तूबरोबर बदलणारें नसून सर्व वस्तूंच्या बाबतींत सारखेंच लागूं असतें. हें तिसरें सर्वसामान्य कारण ह्मणजे पैशाचा पुरवठा हें होय. या शिवाय इतरही कांहीं कारणांमुळें वस्तूंच्या किंमतींत फेरबदल होणें शक्य आहे. सारांश बाजारांतील वस्तूंच्या किंमतींचें सर्वसाधारण मान हें नुसतें पैशाच्या कमीजास्तपणावर अवलंबून नसल्यामुळें पैशाच्या मोलाचें अचूक निदान करणें ही कांहीं दिसते तितकी सोपी गोष्ट नाहीं.

**पैशाच्या मोलाचा परिमाणवाचक सिद्धांत** (The quantity theory of money) :— तथापि विवेचनाचे सोई करितां प्रत्यक्ष व्यवहारांत वस्तूंच्या सर्वसाधारण किंमतीच्या मानांत फेरबदल करणारीं हीं इतर अनेक कारणें विचारांत न घेतां फक्त पैशाच्या पुरवठ्या (quantity) बद्दलचा तूर्त येथें विचार करूं. पैशाचा पुरवठा व त्याचें मोल यांमधील अन्योन्य संबंध काय आहे हें पाहूं गेलें असतां आपणास असें दिसून येईल कीं मूलतः हा संबंध अगदीं साधा व सहज समजण्यासारखा आहे. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे **पैशाचा पुरवठा ज्याप्रमाणांत कमी अगर जास्त होतो त्याचप्रमाणांत. पैशाचें मोल जास्त अगर कमी होतें,** मात्र इतर सर्व परिस्थिति होती तशीच राहून तींत कोणताही फरक झालेला नसला पाहिजे. उदाहरणार्थ पैशाचा पुरवठा दुप्पट झाला तर इतर सर्व परिस्थितींत कांहीं फरक झालेला नसल्यास वस्तूंच्या किंमतीही पूर्वीच्या दुप्पट वाढतील. ह्मणजेच पैशाचें मोल

पूर्वीच्या निम्मे होईल. तेंच पैशाचा पुरवठा निम्मा झाला तर इतर सर्व परिस्थितींत कांहीं फरक झालेला नसल्यास वस्तूंच्या किंमती पूर्वीच्या निम्म्या होतील ह्मणजे पैशाचें मोल पूर्वीच्या दुप्पट होईल. पुरवठ्यांत वाढ झाली तर किंमती कमी होतात हें तत्व सर्वच वस्तूंना लागू पडतें पण पैशाच्या बाबतींत विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ह्मणजे ही कीं ज्या प्रमाणांत पैशाच्या पुरवठ्यांत वाढ होते त्याचप्रमाणांत वस्तूंच्या किंमतीही कमी होतात. हा प्रमाणबद्ध संबंध इतर वस्तूंच्या बाबतींत मात्र दिसून येत नाहीं. उदाहरणार्थ गहूं किंवा तांदूळ यांच्या पुरवठ्यांत जर दुपटीची वाढ झाली तर त्यांच्या किंमती कमी होतील ही गोष्ट खरी, पण त्या निम्म्यानेंच कमी होतील असें मात्र नाहीं. कारण गहूं, तांदूळ, यांच्या किंमतीमधील फरक हा त्या त्या वस्तूंच्या मागणीच्या **लवचीकपणावरही** अवलंबून असतो. परंतु पैशाच्या बाबतींत मागणीच्या लवचीकपणाचा प्रश्नच उद्भवत नाहीं. त्यामुळें त्याचें मोल किती कमी अगर अधिक होईल हें ठरविण्याला या दृष्टीनें अडचणही पडणार नाहीं. सारांश वर सांगितल्याप्रमाणें ज्या प्रमाणांत पैशाचा पुरवठा कमी अगर जास्त होतो त्याचप्रमाणांत पैशाचें मोलही जास्त अगर कमी होतें.

यालाच पैशाचा **परिमाणवाचक सिद्धांत** असें ह्मणतात. या सिद्धांताबद्दल निरनिराळ्या अर्थशास्त्रज्ञांमध्यें बराच वाद माजून राहिला आहे. कांहीं जण तो चुकीचा आहे असें प्रतिपादन करतात तर कांहीं जण तो शद्बशः खरा आहे असें जोरानें सांगत

असतात. वस्तुतः जितक्या सूक्ष्मपणें व काळजीपूर्वक ह्या सिद्धांताची मांडणी करावयास पाहिजे तितकी ती बऱ्याच वेळां केली जात नाहीं ह्मणूनच त्याच्याबद्दल एवढा वाद माजून राहिला आहे. बरोबर रीतीनें मांडणी केली व योग्य तऱ्हेनें समजाऊन घेतला तर तो प्रत्यक्ष वस्तुस्थितीशीं विसंगत नाहीं हें दिसून येईल. ह्या सिद्धांतांतील मुख्य तत्व काय आहे हें चटकन लक्षांत यावें ह्मणूनच प्रत्यक्ष व्यवहारांतील यासंबंधी विशेष गुंतागुंतीच्या भानगडी न दाखवितां तो अगदीं साध्या स्वरूपांत व सोप्या भाषेंत वर मांडून दाखविला आहे. ही गोष्ट " इतर सर्व परिस्थिति होती तशीच राहून तींत कोणताही फरक झालेला नसला पाहिजे " हें वाक्य वाचतांच सहज लक्षांत येण्यासारखी आहे.

**या सिद्धांतांतील मूलभूत तत्वः—** आतां हा अगदीं साध्या स्वरूपांत व विशेष गुंतागुंतीच्या भानगडी विचारांत न घेतां प्रतिपादन केलेला सिद्धांत, प्रत्यक्ष दररोजच्या व्यवहारांतील अनेक भानगडीनीं युक्त असलेल्या गुंतागुंतीच्या परिस्थितीसही लागू पडण्यास ज्या इतर अनेक गोष्टी विचारांत घ्यावयास पाहिजेत त्यांजकडे वळण्यापूर्वीं, ह्या सिद्धांताची मांडणी ज्या मूलतत्वाच्या पायावर करण्यांत आलेली आहे त्या तत्वाबद्दल थोडासा विचार करणें आवश्यक आहे.

पैशाबद्दल असणाऱ्या मागणीचें जें एक विशिष्ट स्वरूप आहे त्या स्वरूपामध्येंच या तत्वाचा उगम आहे. तेंव्हां पैशाबद्दच्या मागणीचा हा विशेष काय आहे तें आतां आपण पाहूंया. प्रथम या

ठिकाणीं मागणी या शद्बाचा बरोबर अर्थ काय हें पूर्णपणें समजून घेतलें पाहिजे. एखाद्या साधारण मनुष्याला विचारलें तर तो असें उत्तर देईल कीं पैशाबद्दलची मागणी ह्मणजे 'लोकांचा त्याच्याबद्दल असणारा हव्यास' या दृष्टीनें पहातां पैशाला अमर्याद मागणी आहे असें वाटेल. कारण प्रत्येकजण मिळेल तितका पैसा पाहिजे असेंच ह्मणतो. पैसा कोणास कधीं नको झाला आहे? परंतु विचार केल्यास दिसून येईल कीं हें उत्तर आभासात्मक आहे. कोणीही झाला तरी त्याला पैसा कशाकरितां हवा असतो? इतर खाद्यपेय वस्तूसारखा पैसा कांहीं खातां अगर पितां येत नाहीं. ह्मणजे त्याचा मनुष्याच्या गरजा भागविण्याकडे प्रत्यक्ष असा उपयोग होत नाहीं; तर त्याच्या योगानें वाटेल ती वस्तु विकत घेतां येते. ह्मणजे मानवी गरजा भागविणाऱ्या उपयुक्त वस्तु प्राप्तकरून घेण्याचें एक साधन ह्मणून त्याचा उपयोग होतो. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे खर्च करण्याकरितांच प्रत्येकास पैसा पाहिजे असतो. आतां केवळ पैसा जवळ आहे एवढ्या समाधानाखातरच पैशाच्या थैल्याच्या थैल्या भरून ठेवून अगर जमिनींत पुरुन ठेवून त्याकडे पाहून दिवस काढणारा एखादा कंजुष कवडीचुंबक आढळणार नाहीं असें नाहीं. पण असें लोक निव्वळ अपवादादाखलच होत. आंपल्याला जगांतील सर्वसाधारण लोकांबद्दल विचार करावयाचा असल्यामुळें असले अपवाद प्रस्तुत विवेचनाचे सोईकरितां दृष्टीआड केले तरी बिघडावयाचे नाहीं. तेव्हां या ठिकाणीं एवढेंच लक्षांत ठेवलें ह्मणजे पुरें कीं सर्वसाधारण

इसम खर्च करण्या करितांच पैशाचा हव्यास करतो व कोणाही इसमाकडे कितीही पैसा असला तरी आजना उद्या केव्हां तरी तो खर्च केला जातोच.

परंतु मागणी हा शब्द प्रस्तुत विवेचनांत निराळ्या अर्थानें योजिला आहे. या ठिकाणीं **पैशाबद्दलची मागणी ह्मणजे पैशाबद्दलचा लोकांचा हव्यास असा अर्थ नाहीं. थोडक्यांत सांगावयाचे झाल्यास पैशाबद्दलची मागणी ह्मणजे त्याचे मोबदला विनिमय होण्यासाठीं बाजारांत विक्रीस असलेल्या सर्व वस्तूंचा समूह होय असें ह्मणतां येईल.*** या ठिकाणीं एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं मनुष्यानें उत्पादन केलेल्या वस्तूंपैकीं, ज्या वस्तु बाजारांत पैशाचे मोबदला विनिमय होण्याकारितां येतात त्यांचाच मागणीमध्यें अंतर्भाव होतो. ज्या वस्तु

---

* पैशाबद्दलच्या मागणीचें स्वरूप हें इतर वस्तूंच्या मागणीच्या स्वरूपापेक्षां निराळें आहे. पैशाबद्दलची मागणी ह्मणजे त्याचे मोबदला बाजारांतील वस्तूचें देऊं केलेलें परिमाण. इतर कोणत्याही वस्तूबद्दलची मागणी ह्मणजे त्या वस्तूचें गिऱ्हाइकानें घेऊं केलेलें परिमाण. ( The demand for money means the quantity of *commodities* of all sorts which, being put *on sale* are *offered* for money. Ordinarily, when speaking of a particular commodity, and of the demand for it, economists mean by " demand " the quantity of that commodity wich is *demanded*, not the quantity of another thing ( money ) which is offered for it. -Taussig: Principles of Economics 1929. vol 1. p, 233. ) Italics ours.

उत्पादक स्वतःच उपभोगितो अगर ज्यांचा ऐनजिनसी ह्मणजे पैशाचें सहाय्याशिवाय विनिमय होतो किंवा ज्या कांहीं विशेष कारणांमुळें बाजारांतच येत नाहींत अशा वस्तूंचा पैशास असणाऱ्या मागणीमध्यें समावेश होत नाहीं. यामुळें अशा वस्तूंच्या साठ्यांत कितीही वाढ अगर कमतरता झाली तरी त्याचा पैशास असणाऱ्या मागणीवर परिणाम होणार नाहीं. पैशाच्या मागणीसंबंधानें लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ह्मणजे ही कीं '**कोणत्याही विविक्षित समाजांत एखाद्या विविक्षितवेळीं पैशाबद्दलची मागणी नेहमी स्थिर** (Constant) **असते.** वस्तूंच्या किंमतींत फेरबदल झाला तरी या मागणीमध्यें फेरबदल होत नाहीं. पैशाबद्दलची मागणी म्हणजे त्याचेबद्दल विनिमय होण्याकरितां आलेल्या बाजारांतील सर्व वस्तूंचा समूह हें लक्षांत घेतलें असतां ही मागणी अशा तऱ्हेनें स्थिर कां असते हें सहज लक्षांत येईल. कारण वस्तूंच्या किंमती कमी झाल्या काय अगर जास्त झाल्या काय, विशिष्ट वेळीं विक्रीस आलेला माल हा **विशिष्ट किंमतीला** विकला जावयाचाच, ह्मणजे त्याचा बाजारांत असलेल्या पैशाबरोबर विनिमय हा व्हावयाचाच; ह्मणूनच पैशाची संख्या दुप्पट वाढली तरी वस्तु तेवढ्याच असल्यामुळें फक्त किंमती तेवढ्या दुप्पट होतात. हीच वरील विशिष्ट किंमत होय.

पैशाच्या मागणी संबंधाची विशेष गोष्ट ती हीच होय. इतर वस्तूंच्या बाबतींत मात्र असें नाहीं. उदाहरणार्थ आंब्यांच्या पुरवठ्यांत वाढ झाली तर मागणीमध्येंही कांहीं तरी वाढ होईल. कारण आंबे

स्वस्त झाले तर लोक थोडेंबहुत अधिक आंबे घेऊं लागतील. पण पैशाच्या बाबतींत मात्र तसें नाहीं. पैशाच्या पुरवठ्यांत वाढ झाली तरी यापासून त्याच्या मागणीमध्यें ह्मणजे त्याच्याबद्दल विनिमयाकरितां आलेल्या बाजारांतील वस्तूंमध्यें वाढ होत नाहीं. आतां एखादे वेळीं अधिक वस्तू उत्पन्न केल्या गेल्यामुळें अधिक वस्तु बाजारांत विक्री-करितां येऊं शकतील व अशातऱ्हेनें बाजारांत विक्रीस असलेल्या वस्तूंच्या संख्येंत वाढ होऊं शकेल. पण ही वाढ कांहीं पैशाच्या पुरवठ्यांत वाढ झाली ह्मणून झालेली नाहीं. तर या वाढीची कारणें निराळीं आहेत. या वाढीमुळें कांहीं या विशिष्ट वेळेच्या पैशाच्या एकंदर मागणीवर परिणाम होऊं शकत नाहीं. पैशास एकंदर मागणी तेवढीच असते; पण ही एकंदर मागणी जास्ती वस्तूंनी मिळून केलेली असते व याचा परिणाम या वस्तूंच्या किंमती कमी होण्यांत होतो. तात्पर्य लोकसंख्येमध्यें, अगर लोकांच्या विक्रीच्या पद्धतीमध्यें वगैरे इतर परिस्थितींत कांहीं एक फरक झाला नसेल तर पैशाबद्दच्या मागणीमध्येंही कांहीं फरक होत नाहीं; ती स्थिरच रहाते.

**परिमाणवाचक सिद्धांत व व्यावहारिक परिस्थितिः—** ज्या एका विशिष्ट तत्वाच्या पायावर या सिद्धांताची उभारणी करण्यांत आली आहे त्याचेबद्दल आंतांपर्यंत विवेचन झालें. आतां हा तात्विक सिद्धांत दररोजच्या व्यवहारांस कितीसा लागू पडतो व त्याची आणि प्रत्यक्ष व्यावहारिक गुंतागुंतींची सांगड कशी काय घालतां येते तें आपण पाहूंया. सुरवातीला परिमाणवाचक सिद्धांत ह्मणजे काय हें

सांगत असतांना आपण दोन गोष्टी गृहीत धरल्या होत्या हें लक्षांत असेलच. एक ह्मणजे व्यावहारिक परिस्थिति अगदीं साधी असून तींत इतर कसल्याही गुंतागुंतींचा संबंध नसला पाहिजे. व दुसरी ह्मणजे पैशाखेरीज इतर कोणत्याही गोष्टींमध्यें कांहींएक फरक झालेला नसला पाहिजे. परंतु थोडासा जरी विचार केला तरी आपणांस असें दिसून येईल कीं आपले रोजचे व्यवहार इतके साधे कधींच नसतात, व पैशाखेरीजसुद्धां इतर गोष्टींमध्येंही फरक झाल्याशिवाय रहात नाहीं. तेव्हां हा सिद्धांत दररोजच्या व्यावहारिक परिस्थितीस लागू करतांना ह्या इतर गोष्टीही अवश्य लक्षांत घेतल्या पाहिजेत.

**पैशाचा अभिसरण वेगः**— पण नुसत्या पैशाबद्दल विचार करतांना देखील त्याचेसंबंधीं एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. व ती ह्मणजे पैशाचा अभिसरण वेग ( rapidity of circulation ). एकाकडून दुसऱ्याकडे, दुसऱ्याकडून तिसऱ्याकडे अशा रीतीनें निरनिराळ्या लोकांच्या हातांतून फिरत रहाण्याच्या पैशाच्या वेगाला त्याचा अभिसरण वेग असें ह्मणतां येईल. पैसा जितका अधिक जलदीनें निरनिराळ्या लोकांच्या हातांतून खेळत राहील तितकी त्याच्या योगानें विनिमयाची क्रिया अधिक होईल. उदाहरणार्थ चार निरनिराळ्या लोकांनीं चार निरनिराळे रुपये देऊन विनिमय करणें काय अगर एकच रुपया त्या चार लोकांचे हातांत जलद फिरत राहून त्याचेयोगानें त्यांनीं तोच विनिमय करणें काय सारखेंच. समजा कीं ‘अ’ नें ‘ब’ कडून आपल्यास जरूर असलेला जिन्नस घेऊन

त्यास रुपया दिला. तोच रुपया लगेच ‘क’ ला देऊन ‘ब’ नें स्वतःस पाहिजे असलेला जिन्नस घेतला. पुढें लगेच ‘क’ नें, ‘ड’ नें वगैरे आपली गरज अशीच भागविली तर एकाच नाण्यानें विनिमयसाधन ह्मणून आपल्या जलद हालचालीमुळें–अभिसरणामुळें–चारजणांस अगदीं थोड्या वेळांत मदत केली हें स्पष्ट दिसेल. ह्मणजे चौघांच्याही हातांत नाणीं असल्याप्रमाणेंच एका नाण्याचा उपयोग झाला. या तऱ्हेनें एका रुपयानें चार रुपयांचें कार्य केल्याप्रमाणें होते. अशा प्रकारें जितका पैशाचा अभिसरण वेग अधिक असेल तितका पैशाचा प्रत्येक घटक अनेक घटकांचीं कार्यें करीत असतो. ह्मणजे प्रत्यक्ष चलनांत थोडा पैसा असूनसुद्धां त्याचे योगानें त्याच्या संख्येपेक्षां अनेकपट पैशाचें कार्य होते; ह्मणूनच पैशाच्या अभिसरण वेगाचाही त्याच्या मोलावर परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. हें अभिसरण कशावर अवलंबून असतें या प्रश्नामध्यें प्रस्तुत आपणांस खोल शिरण्याची जरूर नाहीं. लोकांच्या संवयी, समाज सुधारणा, लोकसंख्येचें दाढर्य (Density), कागदी व पतीच्या पैशावरील विश्वासाची परिस्थिती, बँकासारख्या संस्था इत्यादि अनेक गोष्टीवर हें अभिसरण अवलंबून असतें; फक्त इतकेंच लक्षांत ठेविले ह्मणजे झाले.

व्यावहारिक परिस्थिती व पैशाव्यतिरिक्त इतर वस्तु, बाजार, लोकसंख्या वगैरेंच्या स्थितींतील स्थैर्य इत्यादि गोष्टी हा सिद्धांत मांडताना आपण गृहीत धरिल्या होत्या. आतां या सिद्धांतास

जरूर ती पैशाचे परिस्थितीसंबंधी विशेषतः अभिसरणासंबंधी माहिती घेतली असल्यानें आपण या इतर गोष्टीकडे वळण्यास कांहींच हरकत नाहीं. यापैकीं मुख्य तीन गोष्टी पुढील प्रमाणें आहेतः—

१. वस्तूंची देवघेव पैशाच्या मध्यस्थीनेंच होत असून ऐन-जिनसी अगर पतीचे व्यवहार होत नसले पाहिजेत.

२. देवघेवीचें साधन एवढाच पैशाचा उपयोग होत असून इतर कोणात्याही कारणाकरितां त्याचा उपयोग होत नसला पाहिजे.

३. प्रचारांतील सर्व पैसा व बाजारांतील सर्व वस्तु परस्पर विनिमयाकरतां असल्या पाहिजेत.

पण प्रत्यक्ष व्यवहारांकडे पाहिलें असतां मात्र निराळाच प्रकार दिसून येतो. नेहमींच्या देवघेवीपैकीं बऱ्याच देवघेवी पैशाच्या सहाय्याशिवाय पतीच्या आधारावर होत असतात तर केव्हांकेव्हां ऐनजिनसी व्यवहारही होत असतात. तसेंच पैशाचा उपयोगही निव्वळ विनिमय साधन एवढाच होत नसून संपत्ति यादृष्टीनें सांठ-वून ठेवण्याकडेही होतो. व अशा सांठवून ठेवलेल्या पैशाचा वस्तूंच्या किंमतीवर परिणाम होणें शक्य नसतें. त्याचप्रमाणें प्रचारांतील सर्वच पैसा अगर सर्वच वस्तु कांहीं एकदमच विनिमया-करिता आलेल्या नसतात. तर एकीकडून खरेदी करणारांच्या बाजूनें पैशाचा व दुसरीकडून विक्री करणारांच्या बांजूनें वस्तूंचा, असा दोन्हीं बाजूंनीं एकप्रकारें अविरत ओघच चाललेला असतो.

तात्पर्य प्रथमतः अगदीं साध्या स्वरूपांत मांडल्याबरोबर सोपा दिसणारा हा सिद्धांत, प्रत्यक्ष दररोजच्या व्यवहाराला लागूं करतांना अशा कांहीं बिकट व गुंतागुंतीच्या प्रश्नांचा विचार करावा लागतो कीं हा सिद्धांत दिसतो तितक्या साध्या स्वरूपाचा नाहीं ही गोष्ट कोणासही चटकन कळून येईल. विनिमयसाधन जो पैसा त्यामध्यें सुद्धां धात्वात्मक, व निरानिराळ्या प्रकारचा कागदी पैसा यांचा समावेश होत असल्यामुळें प्रत्यक्ष पैशाच्याच पुरवठ्यांत (Quantity) एखाद्या विवक्षित वेळीं किती वाढ झालेली आहे हें बिनचूक ठरविणें मोठ्या मुष्किलीचें काम आहे. मग वर दर्शविलेल्या इतर प्रश्नांचा समाधानकारक निकाल करणें तर दूरच राहो. तरी पण हा परिमाणवाचक सिद्धांत ह्मणजे अगदींच कांहीं थोतांड नव्हें एवढें मात्र खास. सुरुवातीला सांगितल्याप्रमाणें तो तत्वतः बरोबर आहे यांत शंकाच नाहीं. मात्र प्रत्यक्ष व्यवहाराशीं त्याची सांगड घालतांना नुकत्याच दर्शविलेल्या पैशाच्या अभिसरणासारख्या गोष्टींकडे डोळेझांक करून चालावयाचें नाहीं, हें विसरतां कामा नये. अशा तऱ्हेनें व्यावहारिक मर्यादांनीं मर्यादित झालेल्या स्वरूपांत त्याचेकडे पाहिलें ह्मणजे त्याचें खरें स्वरूप काय आहे याचा विसर पडणार नाहीं व त्याच्या सत्यासत्यतेबद्दल शंकाही राहणार नाहीं.



## प्रकरण ११ वें.

# चलन-पद्धति.

**देशांतील चलनाचें स्वरूपः**—कोणत्याही सुधारलेल्या देशांतील प्रचलित विनिमय साधनांकडे पाहिलें असतां आपणांस असें दिसून येईल कीं तेथील चलनांत पुढील तीन तऱ्हेच्या साधनांचा समावेश होतो. तीं तीन साधनें ह्मणजे (१) धात्वात्मक पैसा, (२) कागदी पैसा, व (३) व्यवहार करणाऱ्या व्यक्तीच्या 'पती'च्या आधारावर चालणाऱ्या पत-पत्रिका ( instruments of credit). आतां या तीन तऱ्हेच्या विनिमय-साधनांपैकीं कोणतें एखाद्या देशाच्या चलन पद्धतींत जास्त प्रमाणांत प्रचलित असेल व कोणतें कमीं प्रमाणांत असेल हें ज्या त्या देशाच्या परिस्थितीवर अवलंबून राहील. देशांतील लोकांना कोणत्याही वेळीं त्यांच्या देवघेवींमध्यें लहान अगर मोठ्या व्यवहारांच्या कामीं देण्याघेण्याला सहज व ताबडतोब उपयोगी पडतील अशीं निरनिराळ्या तऱ्हेचीं साधनें पुरविणें हेंच कोणत्याही देशांतील चलन पद्धतीचें मुख्य ध्येय असतें. या दृष्टीनें पहातां जी पद्धति लोकांमध्यें सहजासहजीं प्रसृत होऊन त्यांच्या व्यावहारिक गैरसोई शक्य तितक्या अधिक प्रमाणांत दूर करूं शकते ती उत्तम चलन पद्धति होय.

लोकांना लागणाऱ्या चलनाचें स्वरूप हें त्यांच्या आर्थिक व औद्योगिक प्रगतीवर अवलंबून असतें. उदाहरणार्थ इंग्लंड व हिंदु-

स्थान हे दोन देश घेतले तर आपल्याला असें दिसून येईल कीं इंग्लंड देश हा आर्थिक व औद्योगिक अशा दोन्हीं दृष्टींनीं फार पुढारलेला आहे. तेथे व्यापार, उद्योगधंदे, बँका वगैरेंची पुष्कळच प्रगति झालेली आहे. लोकांना बँकांचें महत्व व उपयोग पटून त्यांना आपले बहुतेक व्यापार बँकांच्या मध्यस्थीनें करण्याची संवय झाली आहे व त्यांच्या एकंदर व्यवहारांपैकीं शेंकडा ९९ व्यवहार कागदी चलनाच्या सहाय्यानें होत आहेत यामुळेंच तेथील लोकांना हातांत धात्वात्मक नाणीं फारशी नसलीं तरी चालतें. उलटपक्षीं हिंदुस्थानांतील लोक तितकेसे पुढारलेले नाहींत. येथील फारच थोड्या लोकांचीं बँकांमध्यें खातीं असतात व कित्येकांनीं तर चेक हा कसा असतो हें पाहिलेलेंही नसते; यामुळें येथें धात्वात्मक नाणें अधिक लागतें. सारांश प्रत्येक देशांतील चलनाचें स्वरूप तेथील परिस्थित्यनुरूप थोडेंबहूत वेगवेगळें असतें.

**चलन पद्धतिः**— आतां देशांतील चलनांत धात्वात्मक व कागदी अशा दोन्ही तऱ्हेच्या चलनांचा समावेश होत असला तरी कोणत्याही देशांतील मुख्य नाणें व मोलाचें परिमाण ( Standard of Value ) हें मात्र धात्वात्मकच असतें. निदान अद्यापपर्यंत तरी तें तसें आहे. हें मुख्य नाणें जसें असेल तदनुरूप त्या देशांतील चलन पद्धतीचें स्वरूप ठरतें. या चलन पद्धतीपैकीं मुख्य तीन पद्धतीबद्दल येथें थोडीशी माहिती देण्याचा विचार आहे. या तीन पद्धती पुढील प्रमाणें आहेत.

१ एक धात्वात्मक परिमाण पद्धति ( Monometallism ),

२ द्विधात्वात्मक परिमाण पद्धति ( Bimetallism ),

३ सुवर्ण–परिवर्तन परिमाण पद्धति ( Gold Exchange standard ).

**एक धात्वात्मक पारिमाण पद्धतिः**— ह्या पद्धतीमध्यें ( १ ) **मुख्य पैसा** हा एकाच धातूचा (सोन्याचा अगर चांदीचा ) असतो. ( २ ) तो अमर्याद प्रमाणांत कायदेशीर फेडीचें चलन ( unlimited legal tender ) ह्मणून ठरविलेला असतो. चीनखेरीज बहुतेक सर्व प्रमुख देशांत ही धातु सोनें हींच असल्यामुळें आपण हिला ‘ सुवर्ण विनिमय-परिमाण पद्धति ’( Gold standard ) किंवा थोडक्यांत ‘ सुवर्ण चलन पद्धति ’ असें ह्मटल्यास व्यावहारिक दृष्टया फारशी चूक होणार नाहीं. या पद्धतीमध्यें सोनें हें सर्व वस्तूंच्या मोलाचें परिमाण ह्मणून ठरविलेलें असतें. ह्मणजे सर्व वस्तूंचें मोल सोन्याच्या नाण्यांनीं मोजावयाचें. सोन्याचें नाणें हें मुख्य नाणें ह्मणून, व अमर्याद प्रमाणांत कायदेशीर फेडीचे चलन ह्मणून कायद्यानें ठरविलेलें असतें. ( ३ ) अर्थात लहान सहान देवघेवींना उपयोगी पडण्यासाठीं इतरही धातूंचीं नाणीं प्रचारांत असतातच; पण तीं **उपनाणीं** ह्मणून चालतात. ( ४ ) त्याचप्रमाणें कागदी पैसाही चालू असतोच. पण तोही मुख्य नाणें ह्मणून ठरविलेल्या सोन्याच्या नाण्यांत केव्हांही परिवर्तनीय असतो.

ह्या पद्धतींतील मुख्य गोष्ट ह्मणजे देशांत सोन्याचें नाणें हें

मुख्य नाणें मानलें जाऊन (५) **इतर सर्व चलनें या मुख्य नाण्यांत केव्हांही परिवर्तनीय असतात.** उदाहरणार्थ इंग्लंड-मध्यें पौंड हें मुख्य नाणें ठरविलेलें आहे. जर कोणी इसम एखादी दहा पौंडाची नोट घेऊन तेथील खजिन्यांत गेला तर त्याला त्याबद्दल दहा सुवर्णाचें पौंड मिळतील. (६) तसेंच सोन्याच्या नाण्याचें वजन व कस हीही कायद्यानें ठरविलेली असतात; (७) व कोणी इसम टांकसाळींत सोनें घेऊन गेला तर त्याला फारच थोड्या खर्चांत अगर मोफतही त्या सोन्याचीं ठराविक दराप्रमाणें ठराविक वजनाचीं व कसाचीं नाणीं पाडून मिळतात. यालाच **सोन्याची टांकसाळींतील किंमत** ( mint price of gold ) असें ह्मणतात. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे **सोन्याची टांकसाळींतील किंमत ही फक्त कायद्यानें ठरविलेल्या सोन्याच्या नाण्याच्या वजनावर व कसावर अवलंबून असते;** व त्याची बाजारांतील किंमत ( Market value ) ही त्याबद्दल बाजारांत इतर जिन्नस किती मिळतात यावर ह्मणजे त्याच्या मोलावर अवलंबून असते. जेव्हां सोन्याचें नाण्यांत व नाण्यांचें सोन्यांत रूपांतर करावयास पूर्ण मुभा असते तेव्हां सोन्याचा टांकसाळींतील दर व बाजारांतील दर यामध्यें फरक नसतो; व क्वचित थोडासा असलाच तरी तो फार वेळ टिकत नाहीं. कारण जर एखादेवेळीं देशांतील चलनाची संख्या जरूरीपेक्षां जास्त वाढली तर सोन्याचीं नाणीं वितळवून तीं कमी करतां येतात. नाण्यांची संख्या जास्त झाल्यास त्यांची किंमत उतरूं लागेल व

लोकांस तीं वितळवून त्यांचा धातूप्रमाणें उपयोग करण्यांतच फायदा मिळेल. लगेच व्यापारी वगैरे आपली कांहीं नाणीं वितळवितील ह्मणजेच कायदेशीर वर्तन होण्यास ती टांकसाळींत देऊन त्यांबद्दल सोनें घेतील. लवकरच या तऱ्हेनें नाण्यांची संख्या जरूर तितकी कमी होऊन त्यांची किंमत वाढावयास लागून सोन्याच्या बाजारभावाबरोबर येईल. याच्या उलट जर ती संख्या कमी झाली तर नाण्यांचा भाववाढेल व यावेळीं व्यापारी वर्ग सोनें देऊन नाणीं पाडवून घेईल. अशा रीतीनें या पद्धतींत चलनाची संख्या वाढविणें अगर कमी करणें याची आपोआपच सोय असते. इतकेंच नव्हे तर या सोईमुळें चलनाचा साठा व्यापारास–विनिमयास–योग्य तितकाच राहील अशी व्यवस्थाही आपोआपच होतें व अशातऱ्हेनें चलनाचें मुख्य कार्य उत्कृष्ट रीतीनें बजाविलें जातें. तसेंच या पद्धतींत ( ९ ) सोनें बाहेर पाठवावयास अगर बाहेरून देशांत आणावयास पूर्ण मोकळीक असते. व ( १० ) परदेशाशी हुंडणावळीचें दरही कृत्रिमपणें ठरवावे लागत नाहींत. ( ११ ) त्याचप्रमाणें देशांतील कागदी चलन वाटेल तेव्हां सोन्याच्या नाण्यामध्यें परिवर्तनीय असल्यामुळें अशा कागदी चलनाचा वाजवीपेक्षां अधिक अवास्तव्य फैलाव केला जाईल अशी भीतीही बाळगण्याचें फारसें कारण नसतें. व यामुळें कागदी चलनाचें फायदे फार मोठ्याप्रमाणांत मिळविता येतात. या सर्व कारणामुळें योग्य प्रकारें चालू असलेली सुवर्ण परिमाण पद्धति हीच व्यापाराचे दृष्टीनें, लवचीकपणामुळें, व अंतरराष्ट्रीय देवघेवींच्या दृष्टीनेंही सध्यांच्या काळांत अधिक उपयुक्त ठरेल यांत शंका नाहीं.

**द्विधात्वात्मक परिमाण पद्धतिः—**

**१ या पद्धतीचें वर्णनः** आतां दुसऱ्या प्रकारचीपद्धति ह्मणजे द्विधात्वात्मक चलन पद्धति. हिच्यामध्यें दोन धातूंचीं (सोनें व चांदी) नाणीं मुख्यपैसा ह्मणून चालू असतात; व दोहोंचाही दर्जा सारखाच असतो ह्मणजे त्यापैकीं एक मुख्य व एक दुय्यम असा भेद नसतो. दोन्ही धातूंचीं नाणीं अमर्याद प्रमाणांत कायदे-शीर फेडीचीं चलनें ह्मणून चालतात. पहिल्या पद्धतिप्रमाणेंच याहि पद्धतींत इतर धातूंचीं निरनिराळ्या किंमतीचीं उपनाणीं असतातच. फक्त पहिल्या पद्धतींत जेथें एकच धातु मोलाचें परिमाण मानलें जातें त्या ऐवजीं या पद्धतींत दोन धातु मोलाचें परिमाण ह्मणून मानल्या जातात. व कोणीही सोनें अगर चांदी टांकसाळींत आणून दिली तर त्याला ठराविक दराप्रमाणें त्यांचीं नाणीं पाडून मिळतात. तसेंच दोन्ही धातूंचीं नाणीं कायदेशीर फेडीचीं चलनें असल्यामुळें त्यांचें आपा-पसांतील परस्पर विनिमयाचें प्रमाण हेंही कायद्यानेंच ठरविलें जातें. पण इथेंच या पद्धतीतील गोम आहे.

**२ या पद्धतीतील अडचणीः** ही पद्धत यशस्वी रीतीनें चालू राहण्यास एक गोष्ट मुख्यत्वेंकरून आवश्यक आहे ती ही कीं कायद्यानें ठरविलेलें दोन धातूंमधील विनिमय-प्रमाण व प्रत्यक्ष बाजारभावाप्रमाणें असलेलें त्यांचेमधील विनिमय-प्रमाण हीं नेहमीं सारखीं असलीं पाहिजेत. जोंपर्यंत हीं दोन प्रमाणें सारखीं असतील तोंपर्यंत दोन्ही धातु बरोबरीनें चलन ह्मणून चालू शकतील. परंतु

या दोन प्रमाणांत थोडासा जरी फरक पडला तरी या चलन पद्धतीचा डोलारा खालीं येईल. उदाहरणार्थ असें समजूं कीं कायद्यानें सोनें व चांदी यांमधील विनिमय प्रमाण १:१५ असें ठरविलें आहे. आतां याच धातूंच्या विनिमयाचें बाजारांतील प्रमाण जर १:१८ झालें तर स्वाभाविकपणेंच सोन्याचीं नाणीं जवळ असणारा इसम तीं बाजारांत देऊन चांदी घेईल कारण असें केल्यानें त्याला कायदेशीर दरापेक्षां अधिक चांदी मिळेल. टांकसाळींत या चांदीचीं नाणीं पाडून घेऊन त्यांचें सहाय्यानें तो आपलें देणें देईल अगर आपल्यास जरूर ते जिन्नस घेईल. याचवेळीं लोक हीं सोन्याचीं नाणीं वितळवूं लागतील व तीं फक्त परदेशीय व्यापारांतच वापरतील. ह्मणजेच ग्रेशॅमच्या नियमाप्रमाणें महाग धातूचीं ( सोन्याचीं ) नाणीं प्रचारांतून कमी होऊन हलक्या दराच्या धातूचीं नाणीं प्रचारांत रहातील व अधिकाधिक येत जातील; आणि महाग झालेली धातु बहुधा देशाबाहेर जाऊन नाहींशी होईल. कारण अशा परिस्थितींत महाग धातु बाहेर पाठवून स्वस्त धातु देशांत आणिली जाते व तिचें नाणें पाडून घेतलें जातें.

**३ या अडचणींचें निराकरणः** तेव्हां अशा परिस्थितींत द्विचलन पद्धति जर सुरू ठेवावयाची असेल तर सरकारास जे प्रयत्न करावें लागतील ते पुढील प्रमाणें आहेतः—

१ दोन धातूमधील विनिमयाचा कायदेशीर दर बाजार परिस्थितीप्रमाणें सारखा बदलीत रहाणें हा मार्ग अवलंबिल्यास

लोकांचा सरकारवर विश्वास स्थिर रहाणार नाहीं. बाजारांतील देवघेवींत पुढील धोरण ठरविणें धोक्याचे होईल व एकंदरींत विनिमय साधन ह्मणून होणारें पैशाचें कार्य असमाधानकारक होईल.

२ टांकसाळींत नाणीं सररहा पाडून देण्याचे बंद केले पाहिजे. हा मार्ग स्वीकारिल्यास व्यवहारांतील देवघेवीस जरूर तितक्याच पैशाचा पुरवठा होणें कठीण पडेल व मागें सांगितलेल्या 'पैशाच्या परिमाण वाचक' सिद्धांताप्रमाणें वस्तूंच्या किंमतींत वरचेवर चलबिचल होत राहून व्यवहारांत स्थाइकपणा रहाणार नाहीं.

३ या दोन्हीं धातूंच्या आयातनिर्यातीवर निर्बंध घालणें. हाहि मार्ग फारसा हितावह नाहीं.

४ किंवा लागेल तें नुकसान सोसून बाजारांतील या धातूंचे दर कायद्यानें ठरविलेल्या प्रमाणांतच रहातील असा प्रयत्न करणें. या प्रमाणें ज्या वस्तूचा दर कायद्याच्या दराखालीं उतरूं लागेल त्या धातूचा जरूर तो सांठा कायद्यानें ठरविलेल्या दराप्रमाणेंच घेऊन त्याची खालावलेली किंमत चढविण्याचा प्रयत्न करावयाचा आणि दुसरी महाग होऊं लागलेली धातु आपल्या साठ्यांतून काढून कायद्यानें ठरविलेल्या दरानें जरूर तितकी विकावयाची व अशातऱ्हेनें या धातूचा बाजारभाव कमी करण्याचा प्रयत्न करावयाचा. पण या मार्गांत सरकारास किती नुकसान सोसावें लागेल! व असें नुकसान सोसणें किती दिवस शक्य होईल? यादृष्टीनें युरोपमधील राष्ट्रांचा

१९ वें शतकांतील व हिंदुस्थानचा ब्रिटिश अमलाचा आतांपर्यंतचा आर्थिक इतिहास हें उत्कृष्ट डोळे उघडणारे आहेत.

एकंदरींत द्विधात्वात्मक पद्धतीचा डोलारा संभाळणें अत्यंत अडचणीचे आहे यांत शंकाच नाहीं. पण या पद्धतीचे पक्षपाती या अडचणीचें निराकरण पुढील प्रमाणें करूं पहातात. ते ह्मणतात कीं एखादी धातु महाग होऊन चलनांतून निघून बाहेर देशीं जाऊं लागली व दुसरी स्वस्त धातु अधिकाधिक चलनांत येऊं लागली ह्मणजे असें होईल कीं स्वस्त धातूला मागणी फार येऊं लागल्यामुळें तिची किंमत वाढूं लागेल व महाग धातूचा नाण्याकरितां उपयोग कमी होऊन तीं वितळविली गेल्यामुळें तिचा धातुरूपांतील बाजारांतील पुरवठा वाढून तिची किंमत उतरूं लागेल व अशा रीतीनें दोन्ही धातूंचे भाव पुन्हां पूर्वपदावर ह्मणजे कायद्यानें ठरलेल्या प्रमाणावर येऊन बसतील. आतां तात्विकदृष्ट्या व पुष्कळअंशीं ही विचारसरणी बरोबर आहे ही गोष्ट एका अर्थीं खरी. परंतु ही विचारसरणी प्रत्यक्ष व्यवहारांत पटण्यास एक महत्वाची गोष्ट प्रचलित असली पाहिजे; ती ही कीं द्विचलनपद्धति सर्व राष्ट्रांमध्यें सुरूं असली पाहिजे. असे असेल तर महाग धातूचा ओघ दुसऱ्या देशाकडे वळण्यास मोठीच अडचण उत्पन्न होईल कारण त्या देशांतील देणींही स्वस्त धातूच्या नाण्यांनीच दिलीं जातील व एकंदरींत या स्वस्त धातूस मागणी वाढून तिची किंमत लवकरच चढूं लागून कायद्यानें ठरविलेल्या प्रमाणांत येईल. ह्मणून जगांतील सर्व किंवा

निदान प्रमुख औद्योगिक देशांनीं जर एकमेकांच्या संगनमतानें ही पद्धति स्वीकारिली तर ती चांगल्या तऱ्हेनें चालण्याचा पुष्कळच संभव आहे. परंतु जर ती एखाद्याच देशांत मात्र चालूं राहील तर ती ढांसळल्याशिवाय कधींही रहाणार नाहीं.

इतकेही असून या द्विचलनामधील अडचणी संपल्या असें मुळींच नाहीं. कारण या दोन्ही धातु बाजारांतील वस्तू असल्यामुळें यांच्या किंमती ' पुरवठा व मागणी ' यांच्या समीकरणावरच अवलंबून असणार. यापैकीं प्रत्येक धातूचा पुरवठा त्यांच्या खाणींवर अवलंबून असतो व अशा खाणीं केव्हां सांपडतील हे कोण सांगणार ? त्याचप्रमाणें या दोन्ही धातूंचा नाण्याव्यतिरिक्त इतर पुष्कळ कारणास उपयोग होत असल्यामुळें या सर्व गोष्टींचा ' मागणी ' वर कसा परिणाम होईल हें एकदमच कसें ठरवितां येणार ?

**४ या पद्धतींतील फायदे**:— आतां या द्विचलनाचे पद्धतींत कांहीं फायदेही आहेत. उदाहरणार्थ जगाच्या वाढत्या देवघेवींच्या व्यवहारास एकच धातूचा पैसा अपुरा पडण्याचा फारच संभव आहे. तसेंच एकाच धातूच्या पुरवठ्यामध्यें एकाएकीं बराच फरक होणें शक्य आहे कारण एकाएकीं नवीन खाणीं सांपडूं शकतील अगर उलट नवीन नं सांपडतां चालू असलेल्या कांहीं मोकळ्या होतील अगर इतर कांहीं कारणास या धातूचा उपयोग करण्याचा शोध लागल्यामुळें तीस फार मागणी येईल. अशा परिस्थितींत द्विधात्वात्मक पैसा अधिक उपयोगी पडतो कारण वाढत्या व्यापारास

यामुळें जास्त पैसा मिळूं शकतो अगर एकाच धातूच्या नाण्यामधें होणाऱ्या किंमतीच्या फरकामुळें व्यापारास बसणारा धक्का सहन करण्यास दुसऱ्या धातूचा स्प्रिंग सारखा उपयोग होतो. पण या सर्व फायद्यास सार्वत्रिक द्विचलन ही जबरदस्त अट आहे.

**५ या पद्धतीचा शेवटः—** ही पद्धति युरोप व अमेरिका खंडातील पुष्कळशा देशांत एकोणिसावें शतकाच्या सुरवातीपासून ते इ. स. १८७३ पर्यंत बरीच जोरांत प्रचारांत होती. पण आज ती फक्त नांवानेंच शिल्लक राहिली आहे. कारण वरील जबरदस्त अट, विशेषतः इंग्लंडसारख्या श्रीमान् देशाच्या नकारामुळें, कधींच व्यवहार्य न होऊन आज सर्व राष्ट्रें एक धात्वात्मक चलन स्वीकारिलेलीच दिसतात. हिंदुस्थानानें मात्र या चलनाच्या सुधारणेंत एक प्रकारें नवीनच मार्ग हुडकून काढिला ह्मटल्यास हरकत नाहीं. तो ह्मणजे ‘ सुवर्ण परिवर्तन परिमाण ’ पद्धति हा होय.

**सुवर्ण-परिवर्तन परिमाण पद्धति** ( Gold-Exchange Standard ):—

**१ या पद्धतीचा इतिहास** इ. स. १८७० पर्यंत इंग्लंड ह्या एकाच प्रमुख राष्ट्रामध्यें सुवर्णचलन पद्धति चालू होती. बाकीच्या सर्व महत्वाच्या देशांतून कोठें रौप्य एक धात्वात्मक चलन पद्धति तर कोठें द्विधात्वात्मक-चलन पद्धति चालू होती. पण इ. स. १८७१ ते इ. स. १८९३ चे दरम्यान युरोपांतील बहुतेक मोठमोठ्या राष्ट्रांनी सुवर्ण चलन पद्धतीचें अवलंबन केल्यामुळें व पुष्कळशी चांदी चल-

नांतून मुक्त ( demonetize ) झाल्यामुळें चांदीच्या सुवर्णरूपांतील मूल्यांमध्यें फारच क्रांतिकारक फरक घडून आले. एकामागून एक राष्ट्रांनीं सुवर्ण चलनाचें अवलंबन केल्यामुळें चांदीचें चलन या दृष्टीनें महत्व नाहींसे झालें व बाजारांतील इतर वस्तूप्रमाणें चांदी ही एक फक्त व्यापाराची वस्तु होऊन तिची किंमत निव्वळ मागणी व पुरवठा या नियमाप्रमाणें ठरूं लागली. याच सुमारास चांदीची पैदासही अकल्पित रीतीनें वाढल्यानें चांदीचें सुवर्ण रूपांतील मूल्य बरेंच कमी झालें. यामुळें ज्या देशांमध्यें रौप्य एक धात्वात्मक चलनपद्धति ( silver monometallism ) अगर द्विधात्वात्मक चलन पद्धति अमलांत होती असे देश व सुवर्ण चलन पद्धति चालूं असणारे देश यांचेमधील परस्पर देवघेवींच्या व्यवहारांत फारच अनिश्चितपणा व घोटाळें उत्पन्न होऊं लागले. चांदीच्या मोलांतील या अकल्पित क्रांतीमुळें ज्या अडचणी उत्पन्न झाल्या त्या दुहेरी स्वरूपाच्या होत्या. एकतर देशांतील अंतर्गत किंमतीच्या मानांत अस्थिरता उत्पन्न झाली व दुसरें निरनिराळ्या चलनपद्धति चालूं असलेल्या देशांतील परस्पर हुंडणावळीच्या दरांतही चलबिचल होऊं लागली. आणि अशारीतीनें उत्पन्न झालेल्या ह्या दुहेरी बिकट परिस्थितीशीं टक्कर देण्याचा खडतर प्रसंग बऱ्याच देशावर ओढवला

या बिकट परिस्थितींतून मार्ग काढण्याचा प्रयत्न बऱ्याच राष्ट्रांकडून मोठ्या जारीनें करण्यांत आला. या अडचणीतून सुरक्षित बाहेर

पडण्यास फक्त दोनच योग्य उपाय होते. एकतर द्विधात्वात्मक चलन पद्धतीचें सर्व राष्ट्रांनीं अवलंबन करणें अगर सर्वच राष्ट्रांनीं सुवर्णचलन पद्धतीचा स्वीकार करणें. इ. स. १८७१ ते १८९३ च्या दरम्यान मुख्य मुख्य देशांच्या प्रतिनिधींच्या ज्या अनेक अर्थिक परिषदा भरल्या त्यांमध्यें पहिल्या उपायासंबंधानें एक-वाक्यता झाली नाहीं. यामुळें इ. स. १८९३ नंतर सुवर्ण–चलन पद्धति अमलांत आणण्याकडेच सर्व देशांची तीव्रतर प्रवृत्ति होऊं लागली. अर्थातच सोन्याकरितां सुरू झालेल्या या झगड्यामुळें व इतरही कांहीं कारणांमुळें सोन्याला अतोनात मागणी उत्पन्न झाली. आतां जगांतील सोन्याचा सांठा व दरसालची उत्पत्ति ही बेताचीच असल्यामुळें व सर्वच राष्ट्रांना चलनाकरितां सोनें पाहिजे झाल्यास प्रत्येकाला पाहिजे तितकें तें मिळणें शक्य नसल्यानें, शक्य तितक्या कमी सोन्याचा उपयोग करून आपलें काम चांगल्या तऱ्हेनें कसें पार पाडतां येईल इकडे कांहीं देशांची दृष्टि वळली. व ह्या प्रयत्नां-तूनच सध्यां आपल्यास सुवर्ण-परिवर्तन परिमाण पद्धति या नांवानें माहीत असलेल्या पद्धतीचा उगम झाला.

या पद्धतीचे एक मोठे पुरस्कर्ते मि. जे. एम्. केन्स (J. M. Keynes) यांनीं आपल्या ‘Indian currency and Finance’ या पुस्तकांत या सुवर्ण–परिवर्तन परिमाण पद्धतीचें सविस्तर तात्विक निरूपण केलें आहे. प्रथमतः सर्व साधकबाधक प्रमाणांचा विचार करून एखादा तात्विक सिद्धांत बसवून नंतर प्रचारांत चालू केलेली

अशी ही पद्धति नसून चेंबरलेन कमिशननें ह्मटल्या प्रमाणें निरनिराळ्या वेळीं केलेल्या अनेक प्रयोग मालिकांतून या पद्धतीचा बहुतांशी उगम झालेला आहे (" To a great extent the system is a result of a series of experiments. "). ही पद्धति सोइस्कर आहे असें अनुभवानें दिसून आले व या अनुभवावर तात्विक आधाराचा शिक्का मोर्तब करण्यासाठीं मागाहून तिचा हा तात्विक सिद्धांत बसविण्यांत आला. मि. केन्स यांनीं आपल्या उपरिनिर्दिष्ट पुस्तकांत ह्मटल्याप्रमाणें ' अंतरराष्ट्रीय देण्याकरितां जोंपर्यंत देशांतील चलनाऐवजीं ठराविक दरानें सोनें मिळूं शकतें तोंपर्यंत देशांत प्रत्यक्ष सुवर्ण-चलन चालू असणें अगर नसणें ही कांहीं विशेष महत्वाची गोष्ट नव्हे; असा जो शोध लागला त्यांतच सुवर्ण–परिवर्तन परिमाण पद्धतीचा उगम आहे. " The Gold-Exchange standard arises out of the discovery that so long as gold is available for payments of international indebtedness at an approximately constant rate in terms of the national currency, it is a matter of comparative indifference whether it actually forms the national currency." (Indian currency and finance).

**२ या पद्धतीचें विशेषः—** मि. केन्स यांच्याच शद्बांत सांगावयाचे ह्मणजें ज्यावेळीं एखाद्या देशांत अंतर्गत चलनांत फारसें सोन्याचें नाणें नसतें, जेव्हां देशांतील सुवर्णेतर चलन सोन्यामध्येंच परिवर्तनीय असलें पाहिजें असें बंधन नसतें, पण देशांतील सरकार अगर

मध्यवर्ति बँक केव्हांही परदेशीय देणीं देण्यांकारितां देशातील चलनाबद्दल ठराविक कायदेशीर दराप्रमाणें सोनें द्यावयास तयार असतात, व ज्या निधींमधून अशातऱ्हेनें बाहेरील देणीं भागवावयाचीं असतात ते निधि बहुतांशानें देशाबाहेर ठेविलेले असतात त्यावेळीं त्या देशांत सुवर्णपरिवर्तन परिमाण पद्धति अमलांत आहे असें ह्मणतां येईल. थोडक्यांत ह्मणजे पुढील तीन गोष्टी या पद्धतीच्या विशेष आहेत.

१ देशांत सुवर्णेतर चलनच बहुतांशानें चालू असतें;

२ देशांतल्या देशांतच देवघेव करण्यासाठीं सुवर्णेतर चलनाचें सुवर्णचलनांत परिवर्तन करण्याला सरकारची बरीच नाखुषी असतें.

३ पण परदेशीय देणीं देण्याकरितां पाठविण्यासाठीं मात्र देशांतील सुवर्णेतर चलनाऐवजीं ठराविक दराप्रमाणें सुवर्णाचा पुरवटा करण्याला याच सरकारची तत्परता असते.

यावरून परदेशीय देणीं देण्याकरितांच फक्त देशांतील चलनाचें परिवर्तन करण्यांत येतें, ह्मणूनच हिला सुवर्ण-परिवर्तन परिमाण पद्धति असें ह्मणतात हें दिसून येईल.

**३ या पद्धतीचें वर्णनः**— या पद्धतीचें थोडक्यांत पुढील प्रमाणें वर्णन करतां येईल. द्विधात्वात्मक चलन पद्धतीप्रमाणें य पद्धतींतही सोन्याचीं नाणीं व चांदीचीं नाणीं मुख्य पैसा ह्मणून ठरविलेलीं असतातां; व दोन्हीं तऱ्हेचीं नाणीं अमर्याद प्रमाणांत कायदेशीर फेडीचें चलन ह्मणून चालतात. पण या पद्धतींतील

विशेष हा आहे कीं देशांतील अंतर्गत चलन बव्हंशीं सुवर्णेतर असून प्रत्यक्ष व्यवहारांत फक्त परदेशांतील देणीं भागविण्यासाठींच तेवढें सोनें मिळूं शकतें. देशांतील चांदीच्या अगर कागदाच्या चलनाचें सुवर्ण चलनाशीं विनिमय प्रमाण कायद्यानें ठरविलेलें असतें; व या दराप्रमाणें देशांतील **चांदीचें अगर कागदी चलन हें सुवर्ण चलनामध्यें परिवर्तन करून परदेशीय देणीं भागवितां येतात. पण देशांतल्या देशांत अंतर्गत देवघेवीसाठीं सोनें फारसें मिळूं शकत नाहीं.** तसेंच या पद्धतीमध्यें द्विचलन पद्धतीप्रमाणें सोन्याचीं व चांदीचीं अशी दोन्हीं धातूंचीं नाणीं लोकांना हवी असतील तेव्हां ती ती धातु त्यांनीं आणून दिली असतां टांकसाळींतून पाडून मिळत नाहींत. चांदीचीं नाणीं हीं अमर्याद प्रमाणांत कायदेशीर फेडीचें चलन ह्मणून जरी ठरविलेलीं असलीं तरी इतर उपनाण्यांप्रमाणें त्यांचा पुरवठा पूर्णपणें सरकारच्या ताब्यांत असून तीं लोकांना टांकसाळींतून पाडून मिळत नाहींत. तसेंच हीं लाक्षणिक नाणीं ( token coins ) असतात, ह्मणजे यांना कायद्यानें एक प्रकारचें कृत्रिम मोल दिलेलें असतें व तें यांच्या खऱ्या धात्वात्मक मोलापेक्षां अधिक असतें. ह्मणजे त्यांचा सोन्याशीं ठरवून दिलेला कायदेशीर मूल्यसंबंध हा यांच्या धात्वात्मक मूल्यसंबंधापेक्षां अधिक ठेवण्यांत येतो. अशा रीतीनें या चांदीच्या नाण्यांचें मोल कृत्रिम असल्यामुळें त्यांच्या पुरवठ्यावर कडक नियंत्रण ठेवून तें स्थिर राखावें लागतें.

**४ या पद्धतीपासून फायदे व तोटे:—** या पद्धतीमुळें मुख्य फायदा होतो तो असा कीं एखाद्या देशाची चलन पद्धति जरी सुवर्ण--परिमाण पद्धतीच्या स्वरूपाची नसली तरी देशांतल्या व्यवहारांकरितां चांदीच्या चलनाचा उपयोग करून परदेशीय देणीं भागविण्याच्या बाबतींत मात्र सुवर्णचलनाची सोय असल्यामुळें त्यांना परदेशीय व्यवहारांमध्यें सूवर्ण परिमाण पद्धति असल्या प्रमाणेंच फायदा होतो. व सुवर्ण चलन फक्त परदेशीय व्यवहारांपुरतेंच उपयोगांत आणल्यामुळें सोन्याच्या उपयोगांत पुष्कळच बचत होते. व अशा रीतीनें लहानशा सोन्याच्या सांठ्याच्या पायावरही भक्कमशा चलन पद्धतीची उभारणी करतां येते. एकंदरींत गरीब देशांना अगर ज्या देशांतील लोकांच्या व्यवहारांच्या लहान किंमतीमुळें सोन्याचें परिमाण बरेच अडचणीचें होईल अशा देशांना ही पद्धति बरीच उपयुक्त होईल. या पद्धतींत जसे फायदे आहेत तसेच तोटेही आहेत. त्यांतील मुख्य तोटा ह्मणचे परदेशीय हुंडणावळीचीं (foreign exchanges) सूत्रें व दोन्हीं धातूंचीं नाणीं पाडण्याची अनियंत्रित सत्ता सरकारच्या हातांत असते. व त्यामुळें देशाचें एखादेवेळीं कसें नुकसान होण्याचा संभव असतो व देशांतील व्यापारावर कसे उलट सुलट परिणाम होतात हें पुढील प्रकरणांत आपल्या देशांतील चलन पद्धतीचें जें विवेचन केलें आहे तें वाचून ध्यानांत येईल.



## प्रकरण १२ वें.

# हिंदी चलन पद्धति.

**हिंदुस्थानमधील प्रचलित चलनांतील घटकः—** हल्लीं हिंदुस्थानांतील धात्वात्मक चलनामध्यें पुढील प्रमाणें नाणीं आहेतः रुपया, अधेली अगर अर्धरुपया, पावली अगर एक चतुर्थांश रुपया, चवली अगर एक अष्टमांश रुपया, आणेली अगर एक सोळांश रुपया, ढब्बू अगर अर्धा आणा, पैसा अगर पाव आणा, अर्ध पैसा व पै अगर एक तृतियांश पैसा. **हीं सर्वच नाणीं लाक्षणिक आहेत.** ह्मणजे त्यांचें धात्वात्मक मूल्य हें त्यांच्या कायदेशीर दर्शनीं मूल्यापेक्षां कमी आहे. यांपैकीं रुपया व अधेली हीं नाणीं चांदीचीं आहेत. पावली व चघली हीं चांदी व निकल् या दोहोंचीही आहेत. आणेली हें निकल्चें नाणें आहे. अर्ध्या आण्याचें नाणें तांब्याचें आहे. व बाकीचीं तांब्याचीं व ब्रॉंझ धातूचीं अशा दोन्ही तऱ्हांचीं आहेत. यापैकीं रुपया हें मुख्य नाणें (principal coin) असून, अनियमित प्रमाणांत कायदेशीर फेडीचें चलन ह्मणून ठरविलें गेलें आहें. बाकीचीं नाणीं हीं उप-नाणीं (subsidiary coins) आहेत व तीं अनियमित प्रमाणांत कायदेशीर फेडीचीं चलनें नसून बारीकसारीक देवघेवींना ह्मणजे लहानशा ठराविक रकमेपर्यंतच उपयोगी पडण्यासाठीं केलेलीं आहेत.

पुढील कोष्टकांवरून निरनिराळ्या नाण्यांचीं वजनें व त्यांतील धातूंचें प्रमाण हें लक्षांत येईल:—

## चांदीचीं नाणीं

| नाण्याचें नांव | शुद्ध चांदी ग्रेन. | हीण ग्रेन. | एकूण ग्रेन. |
|---|---|---|---|
| रुपया | १६५ | १५ | १८० |
| अधेली | ८२$\frac{1}{2}$ | ७$\frac{1}{2}$ | ९० |
| पावली | ४१$\frac{1}{4}$ | ३$\frac{3}{4}$ | ४५ |
| चवली | २०$\frac{5}{8}$ | १$\frac{7}{8}$ | २२$\frac{1}{2}$ |

## तांब्याचीं नाणीं. ब्रॉझचीं नाणीं.

| नाणें. | वजन ग्रेन ट्रॉय. | नाणें. | वजन ग्रेन ट्रॉय. |
|---|---|---|---|
| ढब्बू अगर अर्धा आणा, | २०० | — | — |
| पैसा अगर पाव आणा, | १०० | पैसा | ७५ |
| सापिका अगर अर्ध पैसा, | ५० | सापिका | ३७$\frac{1}{2}$ |
| पै. | ३३$\frac{1}{3}$ | पै. | २५ |

हिंदुस्थान सरकारनें इ. स. १९०६ सालीं जो नाण्यां बाबतचा कायदा पास केला त्यामध्यें निकल्चीं नाणीं पाडण्याबद्दल तरतूद केली होती, व त्याप्रमाणें प्रथम निकल्चें एक आणा हें नाणें पाडण्यांत आलें. त्याचा आकार वगैरेसुद्धां सरकारनें ठरवून दिला

होता. पुढें सन १९०९ सालीं अर्धाआणा किंमतीचेंही नाणें निकल्चें काढण्याबद्दल सरकार विचार करीत होते परंतु तो विचार नंतर त्यांनीं सोडून दिला. निकल्ची चवली ही सन १९१७-१८ मध्यें सुरूं करण्यांत आली, व निकल्ची पावली व अधेली हीं नाणीं सन १९१९ मध्यें सुरूं करण्यांत आलीं. परंतु पुढें लौकरच यापैकीं अधेली हें नाणें बंद करण्यांत येऊन प्रचारांतून काढून घेण्यांत आलें व आतां फक्त पावली, चवली व आणेली अशीं तीन प्रकारचींच निकल्चीं नाणीं प्रचारांत आहेत.

सन १९२७ पर्यंत सोन्याचें नाणें ह्मणजे इंग्लिश पौंड हें हिंदुस्थानांतही अनियमित कायदेशीर फेडीचें चलन ह्मणून समजलें जात असे. परंतु सन १९२७ च्या करन्सी ॲक्टनें तें बंद करण्यांत आलें; व सध्यां हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें अंतर्गत चलन ह्मणून चालत नाहीं.

आतां अधात्वात्मक चलन ह्मणजे सरकारी **करन्सी नोटा** ह्याही अनियमित प्रमाणांत कायदेशीर फेडीचें चलन ह्मणून ठरविल्या गेल्या आहेत; व त्या केव्हांही रुपयांत परिवर्तनीय आहेत. ह्या नोटा काढण्याचा अधिकार फक्त हिंदुस्थान सरकारच्याच हातांत आहे. हिंदुस्थानांत इतर सुधारलेल्या देशांप्रमाणें नोटा काढण्याचा हक्क बँकांना देण्यांत आलेला नाहीं. याप्रमाणें आपल्या चलनांतील निरनिराळ्या घटकांची थोडक्यांत हकीकत आहे.

**ऐतिहासिक सिंहावलोकनः—** आतां आपल्या सध्यांच्या चलनपद्धतीबद्दल अधिक विस्तृत विवेचन करण्यापूर्वीं तिचा थोडासा

र्वेतिहास सांगितला असतां विषयाचें विवेचनाचें दृष्टीनें व तो योग्य ऱ्हेनें समजण्याचे दृष्टीनेंही पुष्कळच मदत होईल.

**इंग्रजांपूर्वींचें चलनः**— इंग्रज लोकांनीं आपल्या देशांत ाज्य करण्यास सुरवात करण्यापूर्वी येथें सोन्याचीं व चांदीचीं अशीं ोन्हीं तऱ्हेचीं मुख्यनाणीं प्रचारांत असत. अर्थातच याशिवाय ांब्याचीं हलकीं नाणीं उप–नाणीं ह्मणून असत तीं निराळींच. ाधारणतः हिंदु राजेलोकांचा सुवर्ण चलनाकडे जास्त ओढा होता मुसलमानांचा रौप्य चलनाकडे अधिक ओढा होता असें ह्मटल्यास ांहीं हरकत नाहीं. अकबर बादशहाच्या वेळेपासून उत्तर हिंदुस्थानांत री निदान सोन्याची मोहोर व चांदीचा रुपया हीं दोन्हीं नाणीं चारांत होतीं. व दोहोंचेंही वजन प्रत्येकीं १७५ ग्रेन ( ट्रॉय ) सें. जरी त्यांचें परस्पर विनिमय प्रमाण असें नक्की ठरविलेलें व्हतें तरी राज्यांतील दुसरे जें हलकें नाणें–दाम-त्याच्याशीं या प्रत्ये-ाचें विनिमय प्रमाण ठरलेलें होतें. दक्षिण हिंदुस्थानांत मुख्यतः गोडा नांवाचें सोन्याचें नाणेंच विशेष प्रचारांत होतें.

मोगल साम्राज्याच्या विलयानंतर हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं नेक लहान लहान राज्यें स्थापन झालीं. व प्रत्येक राजानें ापापल्या राज्यांत आपापलें स्वतंत्र नाणें चालू करण्यास सुरवात ली. अशा रीतीनें शेवटीं निरनिराळ्या प्रकारच्या नाण्यांचा एवढा ंधळ माजला कीं, प्रत्येक प्रांतांत निरनिराळी चलन पध्दति व शामध्यें अगणित प्रकारचीं दोन्हीं धातुंचीं नाणीं अशी परिस्थिति

प्राप्त झाली. जवळ जवळ १७२ निरनिराळ्या तऱ्हेचीं सोन्याचीं नाणीं व ३४३ चांदीचीं नाणीं त्यावेळीं अस्तित्वांत होतीं असें दिसून आलें आहे. मॅक्लिऑड यानें आपल्या Indian Currency या पुस्तकांत तर असें ह्मटलें आहे कीं त्या काळीं दोन्हीं धातूंचीं मिळून ९९४ निरनिराळ्या तऱ्हेचीं नाणीं प्रचारांत होतीं. या सांवळ्या गोंधळामुळें ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापारालाही चांगलेंच नुकसान पोंचूं लागलें; ह्मणून या गोंधळाला आळा घालावा व देशांतील चलनाला कांहीं तरी व्यवस्थित स्वरूप द्यावें ह्मणून त्यांनीं प्रयत्न सुरू केला.

**ईस्ट इंडिया कंपनीचें आरंभीचें प्रयत्न. रौप्य एक धात्वात्मक चलन पद्धति.** (Silver monometallism.):— प्रथमतः त्यांनीं मुख्य मुख्य सोन्याच्या व चांदीच्या नाण्यांमधील परस्पर विनिमय–प्रमाणें ठरवून टाकलीं. परंतु हीं प्रमाणें निरनिराळ्या इलाख्यांत निरनिराळीं असल्यामुळें त्यांच्यामध्यें एकवाक्यता नव्हती. व बाजारांत सोन्या चांदीचें जें प्रमाण होतें त्याच्यापेक्षां हीं प्रमाणें निराळीं होतीं. यामुळें असें झालें कीं एका इलाख्यांतून सोन्याचीं नाणीं ग्रेशॅमच्या नियमाप्रमाणें प्रचारांतून जाऊं लागलीं तर दुसऱ्या इलाख्यांतून चांदीचीं जाऊं लागलीं. अशा रीतीनें या दोन धातूंच्या बाजारभावामधील नेहमीं होणाऱ्या चलबिचलीमुळें त्यांच्या नाण्यांमधील परस्पर विनिमय प्रमाणें कायम राखणें अत्यंत कठीण होऊं लागलें. शेवटीं एकंदरींत सर्व गोष्टींचा विचार करून विलायतेंत कंपनीच्या कोर्ट ऑफ् डायरेक्टर्सनीं असें ठरविलें कीं

हिंदुस्थानांतील कंपनी–सरकारच्या ताब्यांतील सर्व प्रांतांत एक धात्वात्मक चलन पद्धति असावी; व ती धातु चांदी ही असावी. पुढें हळूं हळू जसजसें कंपनीचे निरनिराळे प्रांत एकतंत्री अमला-खालीं येऊं लागले तसतसें सगळीकडे एक नाणें सुरूं करण्यांत आलें.

इ. स. १८०६ सालीं ईस्ट इंडिया कंपनीच्या हिंदुस्थानांतील सर्व प्रदेशांत रौप्य एक–धात्वात्मक चलन पद्धति असावी असें प्रथम ठरविण्यांत आलें. तरी पण सन १८३५ पर्यंत सोन्याचीं व चांदीचीं अशीं दोन्हीं तऱ्हेचीं नाणीं प्रचारांत होतीच सरतेशेवटीं त्या वर्षी फक्त रुपया हेंच अनियमित प्रमाणांत कायदेशीर फेडीचें चलन ह्मणून कंपनीनें ठरविलें. व सन १८९३ पर्यंत ही पद्धति चालूं राहिली.

आतां इंग्रज लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वीपासून सुद्धां इकडे सुवर्ण चलन चालूं असतांना, खुद्द इंग्लंडमध्येंही सुवर्ण चलन नुकतेंच सुरूं केलें असतांना, व हिंदुस्थानांतील लोकांना सुवर्ण चलनाची चांगलीच संवय असतांना देखील कंपनीनें रौप्य एक धात्वात्मक पद्धतीच कां सुरूं केली हें मात्र एक अजब कोडें आहे व तें एक या पद्धतीचे प्रवर्तकच सोडवूं जाणोत. सुवर्ण चलनापेक्षां या पध्दतींत त्यांना कोणते फायदे अधिक दिसून आले हें आह्मांस तरी कळत नाहीं. हिंदुस्थान ही एक उत्तम मोठी प्रयोग शाळा आहे व या प्रयोग शाळेंत वाटेल ते बरे वाईट प्रयोग करून पहावयास कांहीं हरकत नाहीं. नफा नुकसान कांहीं झालें तरी तें बिचाऱ्या हिंदस्थानच्या लोकांचें, या भावनेनें कंपनीनें हा रौप्य एक

धात्वात्मक पद्धतीचा येथें प्रयोग आरंभिला असावा ! असो. कोणत्याही दृष्टीनें कां होईना पण येथें रौप्य एक धात्वात्मक पद्धति सुरू झाली खरी. रुपया हेंच अनियमित प्रमाणांत कायदेशीर फेडीचें चलन ठरविण्यांत येऊन त्याचें वजन १८० ग्रेन (ट्रॉय) व त्यांमधील शुद्ध चांदीचें प्रमाण १६५ ग्रेन असें ठरविण्यांत आलें. सध्यांदेखील रुपयाचें वजन व त्यांतील शुद्ध चांदी यांचें हेंच प्रमाण कायम आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस अमेरिकेंत मोठमोठ्या चांदीच्या खाणीं सांपडल्यामुळें व पुष्कळशा देशांनीं सुवर्ण चलन पद्धतीचा अंगिकार करून चांदीचीं नाणीं पाडणें बंद केल्यामुळें चांदीचा पुरवठा अतोनात वाढूं लागला व चांदीचें सुवर्णमोल कमी होऊं लागून शेवटीं तें निम्यावर येऊन ठेंपलें. यामुळें व्यापारधंद्याचें अतिशय नुकसान होऊं लागलें, आाणि त्यांतल्यात्यांत ही आंच हिंदुस्थान सरकारला अधिक तीव्रतेनें भासूं लागली. कारण त्यांना दरसाल विलायतेला होम चार्जेस ( Home charges ) ह्मणून बरीच मोठी रक्कम पाठवावी लागते. तिकडून कर्जाऊ काढलेल्या पैशावर व्याज, रिटायर्ड युरोपीयन अधिकाऱ्यांचीं पेन्शनें, रजेवरील अधिकाऱ्यांचे पगार, तिकडे खरेदी करावयाच्या सरकारी मालाबद्दल द्याव्या लागणाऱ्या मोठमोठ्या रकमा इ० मिळून सरकारचे कित्येक कोटी रुपये दरसाल इंग्लंडला जात असतात. अशा स्थितींत रुपयाची किंमत निम्यानें उतरली ह्मणजे नेहमीपेक्षां दुप्पट रुपये पाठवावे लागणार; व यासाठीं लोकांवरील करांमध्येंही वाढ करावी लागणार; अशी

स्थिती प्राप्त झाली. सारांश चांदीचें सुवर्ण रूपांतील मोल फारच उतरून अनिश्चित झाल्यामुळें हिंदुस्थानच्या व्यापारी वातावरणांत व सरकारी अंदाज पत्रकांतही अनिश्चितपणा व घोंटाळे उत्पन्न होऊं लागले. या सर्व अडचणींतून बाहेर पडण्याकरितां धात्वात्मक चलन पध्दतीचें सर्वच राष्ट्रांनीं अवलंबन करावें ह्मणून हिंदुस्थान सरकारनें सन १८७२ ते १८९२ चे दरम्यान कसून प्रयत्न केले, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. इ. स. १८९२ मध्यें या बाबतींत जेव्हां पूर्ण निराशा झाली तेव्हां त्यांनीं सेक्रेटरी ऑफ् स्टेटकडे एक निर्वाणीचा संदेश पाठवून आपली परिस्थिति व तीवर योजण्याचें उपाय हे त्याजपुढें मांडले. या सर्व गोष्टींचा विचार करून योग्य त्या सूचना करण्याकरितां सेक्रेटरी ऑफ् स्टेटनें **हर्शेल कमेटीची** योजना केली. हिंदुस्थान सरकारनें सेक्रेटरी ऑफ स्टेटकडे पाठविलेल्या संदेशामध्यें त्यांनीं जे उपाय सुचविले होते त्यांचा इत्यर्थ्य असा होता कीं टांकसाळींत चांदीचीं नाणीं पाडून घेण्याला लोकांना जी पूर्ण मोकळीक होती ती बंद करावी व हिंदुस्थानांत सुवर्णचलन सुरू करावें. सारांश इ. स. १८९३ मध्यें हर्शेल कमिटीच्या नेमणुकीच्या वेळीं सुद्धां हिंदुस्थानांत सुवर्ण चलन सुरू करावें अशा मताचेंच अधिक प्राबल्य होतें.

**हर्शेल कमिटीच्या सूचनाः**— परंतु हर्शेल कमिटीनें ज्या सूचना केल्या त्यामध्यें सुवर्ण चलन चालू करण्याबद्दल मात्र कांहींच स्पष्ट तरतूद केलेली नव्हती. या कमिटीच्या शिफारशींना अनुसरून

सन १८९३ सालीं जो नाण्यांचा कायदा पास करण्यांत आला, त्या अन्वयें टांकसाळींतून चांदीचीं नाणीं पाडून घेण्याला जी मोकळीक होती ती बंद करण्यांत आली. सरकाला मात्र जरूर तेव्हां जरूर तेवढीं चांदीचीं नाणीं पाडण्याची सवलत ठेवण्यांत आली. तसेंच एक जाहीरनामा काढून सरकारनें असें प्रसिद्ध केलें कीं ( १ ) सोन्याचें नाणें अगर सोनें यांबद्दल १६ पेन्सांना एक रुपया या दराप्रमाणें रुपये देण्यांत येतील, ( २ ) सोन्याच्या नाण्यांच्या रूपानें कोणीं आपलें सरकार देणें दिलें तर तें वरील दराप्रमाणें स्वीकारलें जाईल, ( ३ ) व सदर दरानें ज्यांना पाहिजे असतील त्यांना सोन्याच्या नाण्यांबद्दल करन्सी नोटा दिल्या जातील. अर्थातच रुपया हें अमर्याद प्रमाणांत कायदेशीर फेडीचें चलन होतें. पण हळूं हळूं त्याचें धात्वात्मक मोल व विनिमय–मोल यांमध्यें फरक पडत जाऊन त्याचें विनिमय-मोल हें धात्वात्मक मोलापेक्षां अधिक झालें.

या सर्व प्रयत्नांतील मुख्य हेतु असे होते कीं प्रथमतः रुपयाचें विनिमय मोल वाढविणें अगर निदान तें कमी तरी होऊं न देणें; दुसरा परदेशांतील भांडवल आपल्या देशांत आकर्षण करून आणणें तिसरा ह्मणजे लोकांना सोन्याचे सॉव्हरिन वगैरेंचा उपयोग करण्याची संवय लावणें व चवथा ह्मणजे चांदीच्या आयातीला आळा घालणें. याचा थोडक्यांत इत्यर्थ असा कीं, हिंदुस्थानला सुवर्ण–चलन पद्धतीकडे नेण्याकरितां हें पहिलें पाऊल टाकलें होतें. ह्मणजे ही परिस्थिती ही कायमचें सुवर्ण परिमाण स्थापन करण्यापूर्वीची तात्पुरती

"मधली स्थिति" होती असें ह्मणावयास कांहीं हरकत नाहीं.

**फौलर कमिटीची नेमणूकः**— या सर्व प्रयत्नांचा परिणाम हवा होता तसाच झाला. सरकारनें अधिक रुपये पाडण्याचें बंद केल्यामुळें रुपयाची किंमत वाढूं लागली; ती इतकी कीं १८९८ मध्यें ती १ शि. ४ पे. वर येऊन ठेपली. व वर सांगितल्याप्रमाणें जाहिरनाम्यांच्या द्वारें सरकारनें कबूल केल्याप्रमाणें रुपये अगर चलनी नोटा घेऊन सोनें अगर सोन्याचें नाणें लोक सरकारकडे आणून देऊं लागले व सरकार जवळ सोनें बरेंच साठूं लागलें. अशा रीतीनें पूर्णपणें सुवर्णचलन हिंदुस्थानांत सुरूं करण्याची वेळ जवळ येत चालली असें दिसूं लागलें. शिवाय नवीन रुपये पाडणें बंद झाल्यानें व्यापाऱ्यांना देवघेवीसाठीं पैशाची टंचाई भासूं लागली होती ह्मणून त्यानीही गिल्ला करावयास सुरवात केली. तेव्हां या सर्व गोष्टींचा विचार करण्याकरितां १८९८ सालीं फौलर कामिटी नेमिली गेली.

**फौलर कमिटीच्या सूचनाः**— या कमिटीपुढें बऱ्याच निरनिराळ्या तऱ्हेच्या योजना निरनिराळ्या लोकांकडून ठेवण्यांत आल्या होत्या. त्यांतच रौप्य परिमाण ( Silver Standard ) पुन्हां सुरूं करावें अशीही एक योजना होती. एकंदरीत सर्व बाजूनी विचार करून ही रौप्य परिमाणाची योजना तर कमिटीनें फेटाळून लाविलीच. परंतु इतर सर्व योजनांनाही वाटाण्याच्या अक्षता लावून पुढें आलेल्या पुराव्यावरून त्यांनीं पुढीलप्रमाणें आपलें मत दिलें. The ideal to be aimed at was the "effective

establishment in India of a gold standard and currency based on the Principles of the free inflow and outflow of gold." ह्मणजे या कमिटीचें मत थोडक्यांत असें होतें कीं एक स्थिर व कायम असा हुंडणावळीचा दर टिकावयास पाहिजे असेल तर देशामध्यें परिणाम कारक असें पूर्ण सुवर्ण परिमाणच पाहिजें. व मुख्यत्वें या दृष्टीनें त्यांनीं पुढील प्रमाणें शिफारशी केल्या. (१) रुपयाचा हुंडणावळीचा दर १ शि. ४ पे. ह्मणजे १५ रु. स १ पौंड असावा. (२) हिंदुस्थानांतील टांकसाळींत सोन्याचें नाणें अप्रतिबंध पाडलें जावें. व जोंपर्यंत चलनामधील सोन्याचीं नाणीं लोकांच्या जरूरीपेक्षां अधिक होणार नाहींत तोपर्यंत चांदीचें नाणें अप्रतिबंधपणें पाडण्यांत येऊं नये. ब्रिटिश सॉव्हरिन हें चालू नाणें करण्यांत येऊन त्यालाही कायदेशीर फेडीचें चलन समजण्यांत यावें. व ऑस्ट्रेलियामध्यें ज्या अटींवर सॉव्हरिन् व अर्ध सॉव्हरिन् पाडले जातात त्याच अटींवर तें हिंदी टांकसाळींतूनही पाडले जावेत. (३) रुपया हें अमर्याद कायदेशीर फेडचें चलन ह्मणून चालू रहाण्यास कांहीं हरकत नाहीं. (४) सरकारनें सोनें घेऊन रुपये द्यावयाला कांहीं हरकत नाहीं परंतु रुपयांबदली सोनें द्यावयास मात्र स्वतःस बांधून घेऊं नये. (५) यापुढें पाडल्या जाणाऱ्या चांदीच्या नाण्यांपासून जो फायदा होईल तो एका निराळ्या सुवर्ण निधीच्या रूपानें ठेवावा व तो निधि, अगदीं खास निराळा राखून ठेवलेला आणि पेपर करन्सी रिझर्व्ह व

तिजोरींतील शिलकी यांपासून अगदीं वेगळा, असा ठेवावा. या निधीचा उपयोग फक्त आणीबाणीच्या वेळीं हुंडणावळीच्या दराला सांवरून धरण्याकरितांच करण्यांत यावयाचा होता. एक रुपया पाडण्यास अदमासें ११ आणे खर्च येतो व रुपयाची कायदेशीर किंमत १६ आणे आहे; तेव्हां अशा रीतीनें चांदीचीं नाणीं पाडून होणारा नफा कांहीं लहान सहान नव्हता हें लक्षांत येईल.

**या शिफारशींची प्रत्यक्ष अंमल बजावणी:**—हिंदुस्थान सरकारनें फौलर कमिटीच्या या सर्व सूचना मान्य केल्या असें जरी दाखविलें तरी प्रत्यक्ष अमलांत मात्र सर्व आणल्या नाहींत. हुंडणावळीचा दर १ रु. स १६ पे. हा ठरविला व कमिटीनें सुचविलेल्या दरानें सॉव्हरिन व अर्ध सॉव्हरिन हे हिंदुस्थानांत कायदेशीर फेडीचें चलन ह्मणून स. १८९९ सालीं सुरू केलें. परंतु एकदां हीं नाणीं प्रचारांतून परत खजिन्यांत आल्यानंतर लागेल तसें सुवर्ण चलन काढून या सुवर्ण परिमाणाला हात भार लावावयाचें काम मात्र करण्यांत आलें नाहीं. सोन्याचीं नाणीं पाडण्याकरितां टांकसाळ उघडली नाहीं. तसेंच सुवर्ण--परिमाण निधि (Gold Standard Reserve) हा सन १९०० सालीं स्थापन केला परंतु कमिटीनें शिफारस केल्याप्रमाणें तो सुवर्णरूपानें न ठेवतां ब्रिटिश रोख्यांच्या ( Securities ) रूपानें व तोहि इंग्लंडमध्यें ठेविला. अशा तऱ्हेच्या सरकारच्या कृत्यांमुळें फौलर कमिटीच्या कधीं ध्यानींमनींहीं नव्हती अशी परिस्थिति मात्र उत्पन्न झाली.

हिंदुस्थान सरकारला दरसाल विलायतेस होम चार्जेस ह्मणून बरीचशी रक्कम पाठवावी लागते हें मागें एके ठिकाणीं सांगितलेंच आहे. आतां या एवढ्या मोठ्या रकमेची पोंच इंग्लडमध्यें हजारों मैलावर, ज्यांना आपण "कौन्सिल बिलें" ह्मणतो त्यांच्या सहाय्यानें केली जाते. ह्मणजे स्टेट सेक्रेटरी हा हिंदुस्थान सरकारचे वतीनें लंडनमध्यें बँक ऑफ् इंग्लंडमध्यें टेविलेल्या सोन्याच्या आधारावर हीं बिलें काढतो व तेथें आयात व्यापार करणारे वगैरे ज्या लोकांना तीं पाहिजे असतील अशांना विकून स्वतःला जरूर तो पैसा तो लंडनमधेंच उभारितो. पुढें तीं बिलें या लोकांनीं हिंदुस्थानांत पाठवून दिलीं व सरकारच्या खजिन्यांत नेऊन दाखल केलीं ह्मणजे त्यांमध्यें दर्शविलेली रक्कम येथें रुपयांमध्यें अगर नोटांमध्यें दिली जाते. आतां स्टेट सेक्रेटरी हा आपल्या खर्चाच्या जरूरी पुरतीच जर हीं बिलें काढून विकता तर इतर देशांदेशांतील व्यवहारांप्रमाणें हिंदुस्थानचें परदेशीय देणें भागून त्यांजकडून त्याचें जें येणें असेल त्यांतून ही कौन्सिल बिलाची रक्कम तेवढी वजा जातां बाकीची रक्कम तरी सोन्याच्या रूपानें हिंदुस्थानांत आली पाहिजे होती. परंतु इ. स. १९०४ मध्यें हीं कौन्सिल बिलें आपल्यास वाटेल तेवढी अमर्याद प्रमाणांत आपण काढणार असें स्टेट सेक्रेटरीनें जाहीर केलें. याचा परिणाम असा झाला कीं हिंदुस्थानांतील सोन्याच्या आयातीला आळा बसला. कारण कोणासही बाहेर देशांतून येथील देणीं भागविण्यास सोनें पाठविण्याऐवजीं हीं बिलें खरेदी करून पाठविणें हें जास्त सोईचें

होणार. ह्मणजे कोणाही व्यापाऱ्यास लंडनहुन येथें पैसे पाठवावयाचे झाल्यास तो तिथेंच पैसे भरून असे “ बिल ” घेईल व हिंदुस्थानास पाठवील. पण यामुळें हें हिंदुस्थानचें सोनें मात्र लंडन मधील बँकांत व खजिन्यांत रहाणार.

याप्रमाणें जवळ जवळ १९०७।८ सालापर्यंत चालले; परंतु त्यावर्षी हिंदुस्थानांत कांहीं कांहीं ठिकाणीं दुष्काळ पडल्यामुळें निर्गत व्यापार कमी होऊन रुपयाचा हुंडणावळीचा भाव उतरूं लागला. फौलर कमिटीनें गोल्ड स्टँडर्ड रिझर्वची जी सूचना केली होती ती अशा तऱ्हेच्या अडचणी केव्हां तरी येतील व त्यावेळीं त्यांतील सुवर्ण निधीचा बाहेर देशीं पाठविण्याला उपयोग होईल या हेतूनेच केली होती. फौलर कमिटीच्या शिफारशी अमलांत आणल्यानंतर हिंदुस्थान सरकारला विशेषतः वरील प्रकारच्या ‘ बिलांचे ’ पैसे देण्यासाठीं नवीन रुपये पाडावयाची ( व तेही कमिटीच्या शिफारशी विरुद्ध ) अत्यंत जरूर लागली होती; व तसे ते त्यांनीं पाडलेही. पण या रुपये पाडण्यापासून फायदाही चांगलाच झाला असून गोल्ड स्टँडर्ड रिझर्वमध्यें रक्कमही पुष्कळच सांचली होती. परंतु सरकारनें हा निधि मुळीं सुवर्ण रूपानें ठेवला असेल तर ना ? स्टेट सेक्रेटरीनें हा सर्व निधि लंडनमध्यें व तोही रोख्यांच्या रूपानें ठेविलेला ! हा निधि अशा आणीबाणीच्याच वेळीं उपयोगांत आणण्यासाठीं स्थापन केला याची जणूं काय त्यांना जाणीवच नव्हती. सरकारची व स्टेट सेक्रेटरीची अशी एक वृथा कल्पना होती कीं

हुंडणावळीचा भाव उतरूं लागला तर कौन्सिल बिलांची विक्री बंद केली कीं तो आपोआप ताळ्यावर येईल. पण याचा फोलपणा त्यांना लौकरच प्रत्ययास आला, व लोकांची तर सोनें बाहेर पाठविण्यास पाहिजे ह्मणून सारखी ओरड सुरूं झाली. तरी सरकारनें तिकडे कानाडोळाच करण्याचा प्रयत्न केला. परंतु हुंडणावळीचा भाव सारखा उतरू लागला, तो इतका कीं शेवटीं हुंड्यांनीं ( exchange bills ) पैसा लंडनला पाठविण्याऐवजीं तो प्रत्यक्ष जहाजांतूनच पाठविणें स्वस्ताईचें अतएव सोईचें वाटूं लागले; ह्मणजेच तो भाव ' सुवर्ण निर्गत मर्यादे'च्याही खालीं उतरूं लागला. शेवटीं सरकारला हातपाय हालविणें भागच पडले. अखेरीस सरकारनें असें ठरविलें कीं हिंदुस्थानांत १ रु. स १ शि. ३$\frac{२९}{३२}$ पे. या दरानें ( ह्म. सुवर्ण-निर्गत मर्यादेच्या दरानें ) " स्टर्लिंग बिलें " ( यानांच " रिव्हर्स कौन्सिल बिलें " ह्मणतात ) विकावयाची व लंडनमध्यें त्यांची गोल्ड स्टँडर्ड रिझर्व्ह मधील रकमेंतून फेड करावयाची. थोडक्यांत ह्मणजे लंडन येथें वर सांगितलेलीं कौन्सिल बिलें विकण्याऐवजीं हिंदुस्थानांत बिलें, रुपये घेऊन विकावयाची. अशीं बिलें अर्थातच ज्याना हिंदुस्थानांतून परदेशास पैसा पाठवावयाचा असतो ते घेणार. ह्या बिलांची रक्कम लंडनमध्यें स्टेट सेक्रेटरीनीं सुवर्ण चलनामध्यें द्यावयाची. यासालीं ( १९०७-०८ ) हिंदुस्थानांतील दुष्काळामुळें येथें पैसे पाठविणारेच जास्त असणार हे लक्षांत आणिले ह्मणजे या मार्गाची जरूरी पटेल. अशा रीतीनें जवळ जवळ ८०।९० लाख पौंड

ंमतीचीं बिलें विकली तेव्हां कोठें हुंडणावळीचा दर ताळ्यावर ाला व हिंदुस्थानच्या निर्गत व्यापाराची स्थिरस्थावर झाली.

**तात्कालीन चलन पद्धतीचें स्वरूपः**—अशा रीतीनें हिंदी लनपद्धतींतील मुख्य मुख्य तत्वें हळूं हळूं अस्तित्वांत आलीं. या द्धतींचें स्वरूप थोडक्यांत असें होतें:— हिंदुस्थानांत चांदीचे पये व नोटा चालू रहावयाच्या. रुपयांचा व सॉव्हरिनचा भाव १५:१ गर १ रु. स. १ शि. ४ पे. हा असून सॉव्हरिन व अर्ध सॉव्ह-न हे अमर्याद कायदेशीर फेडीचें चलन होते. हुंडणावळीचा दर वर्ण आयात मर्यादेच्या ( Gold import point ) आंत ठेवण्या-ाठीं लंडनमध्यें सुवर्ण आयात मर्यादेच्या दरानें अमर्याद प्रमाणांत ान्सिल बिलांची विक्री करावयाची ह्मणजे परदेशाहून विशेषतः लंडमधून हिंदुस्थानांतील लोकांचें व्यापार संबंधीं देणें देण्यास ून हुंड्या ( ह्म. वरील कौन्सिल बिलें ) घेऊन त्या पाठवून देणें त्याचे रुपये हिंदुस्थानांत घेणें हा मार्ग, (हें देणें देण्यास) प्रत्यक्ष हाजांतून सोनें पाठवून देण्याचा खर्च करण्याच्या मार्गापेक्षां ाइस्कर रहावा ह्मणून वरील प्रमाणें अमर्याद प्रमाणांत कौन्सिल लांची लंडनमधें तेथील व्यापारी वर्गांत वगैरे विक्री करावयाची; तो सुवर्ण निर्गत मर्यादेच्या खालीं न जाऊं देण्याकरितां त्या निर्गत र्यादेच्या दरानें हिंदुस्थानांत "रिव्हर्स कौन्सिल" ह्म. "स्टार्लिंग लांची" विक्री करावयाची. परंतु कसेंही झालें तरी फौलर कमिटीनें ाफारस केलेली पद्धत मात्र ही नव्हे. कारण सोन्याचीं नाणीं

पाडण्याकारितां टांकसाळ नव्हती व सोन्याचीं नाणीं पाडलीं जात नव्हतीं. सुवर्ण चलनही अगदीं मर्यादित प्रमाणांत सुरू केलें होतें. या पद्धतीला कांहीं लोकांनीं "लंगडी-चलन-पद्धती" असें व कांहींनीं सुवर्ण-परिवर्तन परिमाण-पद्धती ( gold-exchange standard ) हें नांव दिलेलें आहे. याप्रमाणें सरकारी चलन पद्धतीच्या धोरणाचें हें तारूं सुवर्ण परिमाण हें ध्येय गांठावयाचें ह्मणून प्रथम दर्शनीं जरी सोडण्यांत आलें तरी प्रत्यक्ष परिस्थितीच्या तुफान दर्यांत सांपल्यावर तें असें कांहीं हांकारलें गेलें कीं ज्या ठिकाणीं जावयाचें नाहीं असें हिंदुस्थान सरकार व फौलर कमिटी या दोघांनींही नक्की ठरविलें होतें त्याच सुवर्ण-परिवर्तन परिमाण-पद्धतीच्या खडकावर तें जाऊन लागलें.

**चेंबरलेन कमिशनची नेमणूकः**— सर विठ्ठलदास ठाकरसी यांच्या प्रयत्नानीं पुन्हां एकदां स. १९११ मध्यें सुवर्ण चलन व सुवर्ण टांकसाळ सुरू करण्याची योजना पुढें आली व त्याबद्दल जवळजवळ वर्षभर वाटाघाट होऊन हा प्रश्न पुन्हां एका कमिशनकडे सोंपवावा असें ठरलें. त्याचप्रमाणें इतरही कांहीं वादग्रस्त प्रश्न होते. मुख्यतः सरकारी चलनी धोरणावर लोकांकडून कडक टीकेचा भडिमार केला जात होता: विशेषतः लंडनमधील इंडिया ऑफिसनें जो हिंदी पैशाच्या बाबतींत खेळखंडोबा चालविला होता त्यावर सर्वांचा फारच कटाक्ष होता. त्यांतील इत्यर्थ थोडक्यांत असा होता कीं गोल्ड स्टँडर्ड रिझर्व हा सोन्याच्या रूपानें हिंदुस्थानांत ठेवण्या

ऐवजीं रोख्यांच्या रूपानें इंग्लंडमध्यें ठेविला होता. सरकारला रेलवेवर खर्च करावयास जो तात्पुरता पैसा लागत होता तोही या सुवर्ण निधिमधून घेतला जात होता. तसेंच हिंदुस्थानांत असलेल्या पेपर करन्सी रिझर्वपैकीं बराच भाग इंग्लंडमध्यें नेला होता. रुपये पाडण्याला सोईचें पडावें ह्मणून सुवर्णनिधींतील कांहीं भाग चांदीच्या रूपानें ठेविला; आणि "कौन्सिल बिलांची" अमर्याद विक्री करून हिंदुस्थानांत वास्तविकपणें येणाऱ्या सोन्याच्या प्रवाहाला अडथळा करून देशाच्या योग्य जरूरीपेक्षां फाजील रुपयांचा देशांत सुळसुळाट केला. या सर्व कृत्यांचा परिणाम असा झाला कीं हिंदुस्थानांतील बराचसा पैसा इंग्लडमध्यें वाहून नेला गेला व तेथें लंडनमधील व्यापाऱ्यांना तो कमी व्याजाचें दरानें देण्यांत आला. उलट इकडे खुद्द हिंदुस्थानांत मात्र पैशाचा इतका दुष्काळ भासूं लागला कीं अगदीं पहिल्या प्रतीच्या सरकारी रोख्यांच्या तारणावर देखील कर्ज मिळण्याची येथील धंदेवाल्यांस वेळ प्रसंगीं मारामार पडूं लागली व साहजिकपणें व्याजाचा दर वाढला. लोकांची तक्रार अशी होती कीं या सर्व गोष्टींच्या मुळाशीं इंडिया ऑफिसमधील एका छोट्याशा फायनॅन्स कमिटीची यावरील अनियंत्रित सत्ता होती व या कमिटीमध्यें हिंदुस्थानचें हिताहित पाहणाऱ्या लोकांना स्थान न देतां लंडनमधील बँकवाल्यांचें हित पहाणाऱ्या लोकांचेंच वर्चस्व होतें. या सर्व तक्रारींचा विचार करण्यासाठीं शेवटीं एकदाचें १९१३ मध्यें चेंबरलेन कमिशन नेमण्यांत आलें.

**चेंबरलेन कमिशनच्या शिफारशीः—** या कमिशननें एका वर्षाचे आंतच आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला; व सरकारनें अमलांत आणलेल्या व प्रचारांत असलेल्या पद्धतीला पूर्णपणें दुजोरा दिला. खुद्द हिंदुस्थान सरकारला सुद्धां ही आपद्धर्म ह्मणून आकस्मिकपणें प्राप्त झालेली सुवर्ण-परिवर्तन परिमाण पद्धति पूर्णपणें अशी पसंत व सुरक्षित वाटत नव्हती व त्यांनीं स्टेट सेक्रेटरीला सुवर्ण चलन स्थापन करण्याबद्दल लिहून लोकांच्या या मागणीकडे कानाडोळा न करण्याबद्दल आर्जवानें विनंती केली होती. परंतु या चेंबरलेन साहेबांच्या कमिशननें उलट त्या "लंगड्या" पद्धतीचीच तळी उचलून धरून अशी उत्तम पद्धति, आकस्मिकपणें ध्यानीं मनीं नसतांना कां होईना, अमलांत आणल्याबद्दल सरकारची पाठ थोपटून वाहवाच केली! या कमिटीच्या शिफारशी थोडक्यांत पुढील प्रमाणें होत्याः १ सुवर्ण चलनाच्या आधारावर सुवर्ण परिमाण चालू करण्याची आवश्यकता नाहीं. २ अंतर्गत व्यापाराकरितां व चलनाकरितां सोन्याचें नाणें सुरू करणें हें हिंदुस्थानच्या फायद्याचें नाहीं, फक्त अंतर्गत चलनाला सोन्याचा आधार असला ह्मणजे झालें. ३ गोल्ड स्टँडर्ड रिझर्व किती असावा याबद्दल निर्बंध नसावा, फक्त त्यांतील निम्मा भाग सोन्याच्या रूपानें ठेवण्यांत यावा. ४ या रिझर्व पैकीं जो भाग चांदीच्या रूपानें ठेवण्यांत आला होता तो कमी करावा. ५ लोकांची मागणी येईल त्याप्रमाणें "रिव्हर्स कौन्सिल" बिलांची विक्री करावी. ६ कागदी चलन हें स्थिति स्थापक (elastic)

करावें, व ७ इंडिया ऑफिस मधील फिनॅन्स कमिटीमध्यें असणाऱ्या तीन प्रतिनिधीपैकीं दोन हिंदी असावेत. लंनडमध्यें वाहून नेलेल्या व तेथें सांचलेल्या अवास्तव हिंदी पैशाबद्दल या कमिटीनें कांहींच निश्चित सुधारणा सुचविल्या नाहींत. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे या कमिटीनें रामायस्वस्ति रावणायस्वास्ति अशा तऱ्हेच्या शिफारशी केल्या. त्यांच्या रिपोर्टाचा एकंदरीत इत्यर्थ ह्मणजे इतकाच कीं त्यांनीं सरकारला असें सुचविलें कीं, "तुह्मीं आजपर्यंत केलें यांत गैर कांहीं नाहीं; यांत तुमचा अपराध नाहीं, पण पुन्हां मात्र असें करूं नका." ("Not guilty, but do not do it again")

सर जेम्स बेग्बी यांनीं मात्र या रिपोर्टाला एक भिन्नमत पत्रिका जोडून असें ठासून प्रतिपादन केलें कीं हिंदी चलनाची खरी सुधारणा व प्रगति करावयाची असेल तर रुपयांचा अधिक प्रसार कमी करून ज्या ज्या वेळीं चलनांत भर घालावयाची वेळ येईल त्या त्या वेळीं सुवर्ण नाण्यांचा प्रसार केला पाहिजे व सॉव्हरिन अगर अर्ध सॉव्हरिन यापेक्षां अधिक सोइस्कर असें एक निराळें हिंदी सोन्याचें नाणें पाडलें पाहिजें.

हा रिपोर्ट हिंदुस्थान सरकारच्या हातांत आल्यावर थोड्याच दिवसांत महायुद्धास सुरवात झाली. कमिटीनें केलेल्या कांहीं कांहीं शिफारशी उदाहरणार्थ सुवर्ण निधीतील चांदीच्या रूपांत असलेला भाग कमी करणें वगैरे सरकारनें अमलांत आणल्या होत्या परंतु बाकीच्या शिफारशीकडे लक्ष देण्यापूर्वींच लढाई उपस्थित झाली.

**महायुद्धाचा काल व हिंदी चलनः—** लढाई सुरू झाल्याबरोबर इतर सर्व देशांप्रमाणें इथेंही गडबड उडाली. इंग्लंडमध्यें पैसे पाठविण्यासाठीं सोन्याच्या नाण्यांना फार मागणी येऊं लागली व थोडक्याच दिवसांत ह्मणजे जानेवारी १९१५ पर्यंत जवळ जवळ ८७ लक्ष पौंड किंमतीचीं स्टर्लिंग बिलें सरकारनें विकलीं. पोस्ट ऑफिस सेव्हिंग्ज बँकांवर पैसे काढण्यासाठीं लोकांच्या उड्या पडूं लागल्या व अशा रीतीनें लोकांनीं जवळ जवळ आठ कोटि रुपये परत घेतले. तसेंच नोटांवरचा लोकांचा भरंवसा थोडासा डळमळला व लोकांनीं सोन्यासाठीं मागणी सुरू केली. सुमारें १० कोट रु. किंमतीच्या नोटा सरकारकडे रोकड मिळण्याकरितां आल्या व सरकारला अखेरीस सोनें देणें बंद करणें भाग पडलें. परंतु हा लढाई सुरू झाल्याबरोबर उडालेला सुरवातीचा गोंधळ लौकरच कमी झाला व पुन्हां स्थिरस्थावर झालें. यानंतर मात्र हिंदी चलन व्यवहारांत ज्या आश्चर्य कारक घडामोडी झाल्या त्यांची पूर्वी कोणाला स्वप्नांतही कल्पना आली नसेल. या घडामोडी घडण्याचीं कारणें मुख्यतः तीन आहेत तीं अशीं:-( १ ) हिंदुस्थानच्या मालाला ब्रिटिश सरकार व दोस्त राष्ट्रें यांचेकडून अतोनात मागणी आली; पण त्या बरोबरच त्या देशांतून हिंदुस्थानांत परत फारच कमी माल आला. यामुळें हिंदुस्थानला इतर राष्ट्रांकडून पुष्कळच पैसा येणें झाला. ( २ ) हिंदुस्थानांत सरकारनें ब्रिटिश सरकारतर्फे ह्मणून अतोनात खर्च केला. ( ३ ) व चांदीच्या किंमतीमध्यें असामान्य वाढ झाली.

सन १९१६ ते १९१९ ह्या तीन वर्षांचे मुदतींत पूर्वीपेक्षां दरसाल साठ लक्ष पौंड इतकी रक्कम हिंदुस्थानला परदेशांकडून अधिक येणें होत होती. तसेंच हिंदुस्थान सरकारनें तेथें इंग्लंड व दोस्त राष्ट्रें यांचेसाठीं सन १९१९ चे अखेरपर्यंत सुमारें चोवीस कोटी पौंड खर्च केले होते. एवढे सर्व पैसे हिंदुस्थानांत सोन्याच्या रूपानें आयात करणें हें समुद्रावरील व्यापाराची नाकेबंदी झाली असल्यामुळें शक्य नव्हतें. हिंदुस्थानांतील लोकांना हे पैसे देण्याचा एकच मार्ग होता व तो ह्मणजे ब्रिटिश राज्यांतील स्टर्लिंग रोख्यांच्या तारणावर तेवढ्या नोटांचा प्रसार करणें व रुपये पाडून पुरविणें हाच होता. अशा रीतीनें एकीकडे चांदीला मागणी वाढली तर त्याच वेळीं दुसरीकडे जगांतील चांदीची पैदास कमी झाली. यामुळें १९१५ सालीं चांदीची किंमत औंसाला २७$\frac{१}{२}$ पेन्स होती ती १९१९ च्या डिसेंबर पर्यंत औंसाला ७८ पेन्सांवर जाऊन कहर झाला. तेव्हां यावेळीं हिंदुस्थान सरकारास मुख्य अडचण रुपयाची किंमत १ शि. ४ पे. च्या खालीं उतरूं न देणें ही नसून ती मर्यादेबाहेर कशी वाढूं न द्यावी व मागणीला पुरे पडेल इतका रुपयांचा पुरवठा कसा करावा ही होती.

या अडचणींतून पार पडण्याकरितां सरकारनें हुंडणावळीच्या व्यवहारावर कडक ताबा ठेविला. व तिकडे कौन्सिल बिलांचा दर वाढविला. पुढील कोष्टकावरून हुंडणावळीचा दर कसकसा वाढविला गेला हें दिसून येईल.

| सुरूं केल्याची ता. | तारेच्या हुंडीचा कमीत कमी दर. | सुरूं केल्याची ता. | तारेच्या हुंडीचा कमीत कमी दर. |
|---|---|---|---|
| ३ जा. १९१७ | शि. १ पे. ४ १/४ | १२ ऑगष्ट १९१९ | शि. १ पे. १० |
| २८ आगष्ट १९१७ | १—५ | १५ सप्टेंबर १९१९ | २—० |
| १२ एप्रिल १९१८ | १—६ | २२ नोव्हें. १९१९ | २—२ |
| १३ मे १९१९ | १—८ | १२ डिसें. १९१९ | २—४ |

तसेंच वाढत्या मागणीप्रमाणें रुपये पुरविण्यासाठीं नवीन रुपये पाडण्याला १९१५ ते १९२० या पांच वर्षांत सरकारनें एकंदर अदमासें ५४ कोटी औंस चांदीची खरेदी केली; व सोनें आणि चांदी यांवर कडक नियंत्रण ठेवून त्यांची निर्गत होऊं नये व नाणीं वितळविलीं जाऊं नयेत ह्मणून प्रतिबंधक उपाय अमलांत आणिलें. तसेंच चलनी नोटांच्या संख्येंत बेसुमार वाढ केली व एक रुपयाच्या व अडीच रुपयांच्या नोटा रुपयांचा उपयोग कमी व्हावा ह्मणून सुरूं केल्या. ता. ३१ मार्च १९१४ ला पुरे होणाऱ्या वर्षांत एकंदर चलनांतील नोटा ६६ कोटी, १२ लक्ष रु. किंमतीच्या होत्या व त्यांच्याबद्दल ठेवलेल्या धात्वात्मक निधी ( Reserve ) चें प्रमाण शें. ७८·९ होतें. परंतु ह्या नोटांची संख्या वाढत वाढत जाऊन ३० नोव्हेंबर १९१९ ला एकंदर चलनांतील नोटा एक अब्ज, एकुणऐशी कोटी, सदुसष्टलक्ष रु. इतक्या किंमतीच्या झाल्या; व यांच्याबद्दल धात्वात्मक निधीचें प्रमाण कमी कमी होत जाऊन तें ४४·६ वर येऊन ठेंपलें. यावेळीं नोटा मोडून रोख पैसे करण्याच्या सवलतीही शक्य तितक्या कमी करण्यांत आल्या होत्या. अशा नानाविध

उपायांनीं हिंदुस्थान सरकारनें हिंदी चलन पद्धतीला लढाईच्या या आणीबाणीच्या वेळांतून कशीबशी निभाऊन नेली.

**बॅबिंग्टन-स्मिथ कमिटी व तिच्या शिफारशीः**— परंतु या सर्व उपायांचा परिणाम असा झाला कीं सन १८९३ पासून तें १९१५ पर्यंत जें सरकारचें चलन विषयक धोरण होतें व ज्याचा उद्देश रुपयाची किंमत १ शि. ४ पे. ही नक्की करण्याचा होता, त्या धोरणाला पूर्णपणें हरताळ फांसला गेला. तेव्हां १९१९ मध्यें लढाई बंद झाल्यावर हिंदी हुंडणावळ व चलन या बाबतींत पुढें कोणतें धोरण ठरवावयाचें याबद्दल सल्ला देण्याला एक कमिटी नेमण्यांत आली. हीच बॅबिंग्टन्-स्मिथ् कमिटी होय. या कमिटीनें पुढील एक वर्षांत आपला रिपोर्ट सादर केला. यांतील मुख्य सूचनाः—

(१) रुपया हेंच अमर्याद कायदेशीर फेडीचें चलन असावें. त्याचें वजन व त्यांतील शुद्ध चांदीचें प्रमाण हीं पूर्वींप्रमाणेंच असावीत. (२) रुपयाचें एक ठराविक असें विनिमय मोल असावें व तें सोन्याच्या स्वरूपांत ठरलेलें असावें. तें एक रुपयास ११·३००१६ ग्रेन शुद्ध सोनें ह्मणजे एका सॉव्हरिन्मधील शुद्ध सोन्याच्या एक दशांश सोन्याइतकें असावें. (३) ह्या नवीन दराप्रमाणें (ह्म० १ सॉव्हरिन् : १० रु.) हिंदुस्थानांत सॉव्हरिन् कायदेशीर फेडीचें चलन ह्मणून समजला जावा. (४) वरील दर कायद्यानें प्रस्थापित केल्यानंतर हिंदुस्थानांत सोन्याची आयात अगर हिंदुस्थानांतून सोन्याची निर्गत यावर सरकारचें नियंत्रण असूं नयें; व मुंबई

येथें सॉव्हरिन पाडण्याकरितां टांकसाळ स्थापन करावी. (५) सॉव्हरिन्‌बद्दल रुपये देण्याचा जो सरकारचा जाहीरनामा होता तो परत घ्यावा. (६) खासगी व्यक्तींनीं चांदीची निर्गत अगर आयात करण्यावर असलेले सर्व निर्बंध दूर करावेत व शक्य असेल तर चांदीवर बसविलेला आयात कर उठवावा. (७) सुवर्ण-परिमाण-निधी (Gold Standard Reserve) पैकीं बराचसा भाग सोन्याच्या रूपानें ठेवावा व बाकीचा भाग ब्रिटिश साम्राज्यांतील हिंदुस्थानेतर कोणत्याही सरकारच्या एक वर्षाच्या आंतील मुदतीच्या कर्जरोख्यांच्या रूपानें ठेवावा. या निधीमध्यें जें सोनें ठेविलें असेल त्यापैकीं फारतर निम्मा भाग हिंदुस्थानांत ठेवावा.

यावरून या कमिटीचा मुख्य उद्देश हुंडणावळीचा दर स्थिर व ठराविक असा कायम करावयाचा हा होता हें दिसून येईल. याचप्रमाणें त्यांना देशांतील नोटा अपरिवर्तनीय न करितां परिवर्त-नीयच ठेवावयाच्या होत्या. तसेंच यांच्या शिफारशींतील मुख्य तत्व हें कीं रुपयाचें मोल पौंडांत न ठरवितां प्रत्यक्ष सोन्याच्या रूपानें ठरवावयाचें व तें रुपयास १ शि. ४ पे. हें न ठरवितां १ रु. ला २ शि. असें ठरवावयाचें. या उद्देशास व तत्वांस अनुलक्षूनच त्यांच्या सर्व शिफारशी होत्या.

**दोन शिलिंगाचा रुपया व त्याचे परिणामः**—सरकारनें हा रिपोर्ट १९२० सालीं मान्य केला व रुपयाची किंमत २ शिलिंग ठरवून इतरही कित्येक शिफारशी अमलांत आणल्या. पण पहिली

सुधारणाच फार महत्वाची असल्यामुळें आपण तिच्याकडेच लक्ष पुरवूं. त्यामुळें झालेले परिणाम पाहूं गेले असतां असें दिसून येईल कीं जें धोरण निव्वळ हुंडणावळीच्या व्यवहाराला स्थिरता आणण्याकरितांच ह्मणून स्वीकारलें गेलें त्याचें योगानें अपेक्षित स्थिरता येणें तर दूरच राहिलें, पण हुंडणावळींच्या दरांत अतोनात चढ उतर मात्र होऊं लागून व्यापारामध्यें भयंकर घोटाळें उत्पन्न झाले; सरकारला सडकून नुकसान सोसावें लागलें व कित्येक मोठमोठ्या व्यापारांना दिवाळीं काढावीं लागलीं.

अर्थातच याला पुष्कळ इतर कारणेंही जबाबदार होतीं. कमिशननें शिफारशी केल्या त्यावेळीं हुंडणावळीचा दर २ शि. च्या आसपास होता ही गोष्ट खरी पण त्या शिफारशी सरकारनें अमलांत आणीपर्यंत तो दर आणखी बराच उतरला होता. अशावेळीं सरकारनें २ शि. चा दर ठरविल्यामुळें या चढलेल्या दराचा फायदा घेण्यासाठीं रिव्हर्स कौन्सिल बिलांना (ह्म. पैसे बाहेर पाठविण्याकरितां) अतोनात मागणी आली व यामुळें आयात व्यापारही वाढूं लागला. कारण हुंडणावळीचा दर वाढूं लागल्यास आयात व्यापार वाढूं लागतो व हा दर उतरूं लागल्यास निर्गत व्यापार वाढूं लागतो. सरकारनें २ शि. हा दर जाहीर केला त्यावेळीं हिंदुस्थानचा निर्गत व्यापार आधींच अगदीं मंदावला होता, कारण इंग्लंड व अमेरिका या देशांत हिंदुस्थानचा माल भरपूर पडून होता आणि युरोपांतील इतर देशांना हिंदुस्थानचा माल पाहिजे होता परंतु तो घेण्याला त्यांचेजवळ

पैशाची टंचाई होती. तसेंच जास्त मागणी असलेला हिंदुस्थानचा माल ह्मणजें धान्यें वगैरे जिन्नस, परंतु गहूं खेरीज बाकीच्या मालाचे निर्गतीवरील नियंत्रण सरकारनें कमी केलें नाहीं, कारण १९२० मध्यें हिंदुस्थानांत आवर्षणामुळें दुष्काळ पडला होता.

उलटपक्षीं आयात व्यापार मात्र फार जोराचा होता. कारण मोठमोठ्या कंपन्या वगैरे नुकतीच लढाई संपून गेली असल्यामुळें निघत होत्या. त्यांचेसाठीं यंत्रसामुग्री वगैरेची मागणी केलेली होती. व लढाईचे दिवसांत मागणी केलेला व तह झाल्यानंतर येणें असलेला मालही आतां येऊं लागला होता. सरकारनें अशा वेळीं हुंडणावळीचा दर वाढविल्यामुळें जो कांहीं थोडा बहुत निर्गत व्यापार होता तोही बसावयाच्या मार्गास लागला; आणि आयात व्यापार वाढूं लागला. परदेशांतील मालाला ( मुख्यतः कापडाला ) अतोनात मागण्या जाऊं लागल्या त्या इतक्या कीं लोक कांहीं कांहीं वेळां अगाऊ पैसे पाठवूं लागले. याच वेळीं जपाननेंही हिंदुस्थानांतील कापूस विकत घेण्याचें बंद केलें. या सर्व कारणांमुळें हिंदुस्थानांतील बाजारांत माल तुंबून राहिला व युरोपमधील राष्ट्रांना हिंदी मालाला मागणी पाठविण्यास आर्थिक सामर्थ्य येण्याचें तर चिन्ह दिसेना. एकंदरीत २ शि. हा चढता दर स्थिर ठेवणें अशक्य होऊं लागलें. कारण हिंदुस्थानची आयात वाढल्यामुळें त्याला परदेशांचें अतिशय देणें झालें. सरकारनें या सर्व संकटांशीं तोंड देऊन हा दर कायम राखण्याकारितां खूप धडपड केली पण शेवटीं त्यांना त्यांत यश

येण्याचें चिन्ह दिसेना. व शेवटीं २ शि. चा दर स्थिर राखण्याच्या सरकारच्या या सर्व उपद्यापाचा परिणाम हिंदी व्यापारावर व खुद्द सरकारच्या तिजोरीवरही अनिष्ट झाला.

अशारीतीनें कृत्रिम तऱ्हेनें हुंडणावळीचा भाव ठरवून तो कायम राखण्याच्या प्रयत्नांत चांगलेंच अपयश येऊन मोठी चाट बसल्यामुळें तो प्रयत्न सोडून देऊन सरकारनें हुंडणावळीचा दर नैसर्गिक रीतीनेंच जसा राहील त्याप्रमाणें राहूं देण्याचें ठरविलें व त्यानंतर मात्र हा दर पूर्वीच्या १ शि. ४ पे. या दराच्या आसपास येऊन तेथेंच राहूं लागला. याच सुमारास हिंदुस्थानांतील बँकाच्या वगैरे धंद्यांमध्येंही जरा शिस्तवार सुधारणा झाली. इम्पीरीयल बँकेची स्थापना झाली. पेपर करन्सी रिझर्वमधील धात्वात्मक भाग बराच अधिक वाढविला व सरकारनें आणीबाणीच्यावेळीं अधिक चलन काढण्याचा अधिकार घेऊन चलन पद्धतिमध्यें अधिक लवचीकपणा आणिला. या सुमारास विशेष लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ह्मणजे हुंडणावळीचा दर आपोआप १ शि. ६. पे. वर चढला व तेथें तो थोडासा स्थिर झाला, व यावेळीं सरकारनेंही तो याच दरावर ठेवण्याचें ठरविलें.

**हिल्टनयंग कमिशन (१९२५) व त्याच्या शिफारशीः**— पुन्हां एकदां रुपयाचें मोल सोन्यामध्यें ठरवावयाचें कीं पौंडामध्यें ठरवावयाचें व तें कोणत्या दरानें ठरवावयाचें वगैरे प्रश्नांबद्दल विचार करण्याकरितां १९२५ सालीं आणखी एक कमिशन

नेमिलें गेलें, तें हिल्टन-यंग कमिशन या नांवानें प्रसिद्ध आहे. या कमिशननें आपला रिपोर्ट १९२६ मध्यें प्रसिद्ध केला. त्यांनीं केलेल्या मुख्य शिफारशींचे तीन विभाग पाडतां येतील, ते ( १ ) परिमाणाची ( Standard ) निवड, ( २ ) हुंडणावळीचा दर व रुपया यांचें स्थैर्यीकरण, व (३) रिझर्व्ह म्ह. मध्यवर्ति बँकेची स्थापना.

**गोल्ड बुलिअन स्टँडर्ड**:— या कमिशननें शिफारस केलेलें परिमाण पूर्वींच्यापेक्षां निराळेंच आहे. त्याला त्यांनीं गोल्ड बुलियन स्टँडर्ड असें नांव दिलें आहे. त्यांच्या शिफारशींचें सार असें कीं हिंदुस्थानांतील नेहमींचें चलन सध्याप्रमाणें रुपया व नोटा हेंच असावें. आणि चलनामध्यें स्थैर्य राखण्याकरितां चलन हें केव्हांही कोणत्याही कारणासाठीं सोन्यांत परिवर्तनीय असावें, परंतु सोनें मात्र चलन म्हणून ( नाण्यांच्या रूपानें ) चालूं नयें. व्यवहारांत प्रत्यक्ष सोन्याचें नाणें चालू न ठेवितां व्यवहारांतील चलन हें सोन्याशीं निगडित करून ठेवावयाचें व परिमाण सोन्याचें ठेवावयाचें. म्हणजे 'सुवर्ण चलनाशिवाय सुवर्ण परिमाण चालू करणें शक्य आहे' असें त्यांचें मत होतें.

**१ शि. ६ पे. विरुद्ध १ शि. ४ पे.**:— हुंडणावळीचा दर १ शि. ६ पे. असावा अशी कमेटीनें बहुमतानें शिफारस केली पण सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास यांनीं एक भिन्नमत पत्रिका जोडून १ शि. ४ पे. हा दर असावा असें आपलें मत प्रदर्शित केलें. रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर या दरासंबंधानें हिंदुस्थानांत फारच वाद माजून

राहिला आहे. कमिशनच्या पक्षपात्यांचें असें ह्मणणें होते कीं, १ शि. ६ पे. हाच भाव सध्यां देशांत गेली दोन वर्षें प्रचलित आहे, व वस्तूंच्या किंमतीही याच दराप्रमाणें निश्चित झाल्या आहेत. मजुरांची मजुरी, मोठमोठी कंत्राटें वगैरे व्यवहारही याच भावास अनुसरून ठरले जात आहेत. आतां शेतकऱ्यांबद्दल ह्मटले तर यांचा शेतसारा जरी जुन्याच १ शि. ४ पे. या भावाप्रमाणें ठरविलेला असला तरी त्या वेळेपेक्षां हल्लीचा बाजारभाव चढलेला असल्यामूळें त्यांना वास्तविक तक्रार करावयास जागा नाहीं; कारण त्यांच्या वस्तूंची त्यांना जास्त किंमत आतां मिळत आहे. उलटपक्षीं १ शि. ४ पे. हा भाव जर ठरविला तर सर्व वस्तूंच्या किंमती १२॥ टक्यानें वाढतील. तसेच होमचार्जेस, स्टोअर्स खरेदी, पेन्शने वगैरे करितां इंग्लंडांत द्याव्या लागणाऱ्या रकमेच्या भरपाईकरितां हिंदुस्थानाला अधिक रुपये द्यावे लागतील. परंतु १ शि. ६ पे. हा दर ठरविला तर होमचार्जेसची रक्कम वाढणार नाहीं. बाजारांत १२॥ टक्के स्वस्ताई होईल व हिंदुस्थानचा व्यापार वाढेल. एकंदरीत १ शि. ६ पे. हाच भाव हिंदुस्थानास श्रेयस्कर आहे.

परंतु या दराचे आक्षेपक व १ शि. ४ पे. या दराचे पक्षपाती यांची विचारसरणी पुढील प्रमाणें आहे. १ शि. ६ पे. हाच खरा स्थिर झालेला दर आहे हें ह्मणणें खरें नसून आभासात्मक आहे.

इ. स. १८९३ पासून ते १९१४ पर्यंत ह्मणजे जवळ जवळ २० वर्षेपर्यंत हुंडणावळीचा दर १ शि. ४ पे. हाच होता व युद्धसमाप्तीनंतरही हुंडणावळीच्या दराची १ शि. ४ पे. कडे वळण्याचीच प्रवृति होती व एकंदरीत पहातां हाच अधिक नैसर्गिक दर असून तेच रुपयाचे खरे मोल आहे. शेतकऱ्याचेही १ शि. ६ पे. दरानें सारा भरताना नुकसान आहे, तसेच परदेशांत माल पाठवावयाचा तो १२॥ टक्के नुकसानीनें पाठवावा लागेल. १ शि. ६ पे. वाल्यांचे जे म्हणणें आहे कीं, या दरानें स्वस्ताई होईल, तें पूर्ण सत्य नसून अर्धवट सत्य आहे; म्हणजे फक्त आयात मालाच्या म्हणजे परदेशांतून येणाऱ्या मालाच्या किंमती स्वस्त होतील व अशारीतीनें परदेशी माल स्वदेशी मालास अधिक चढाओढ करूं लागून देशी कारखानदार व व्यापारी यांचें शेवटीं अतोनात नुकसानच होईल. व परदेशाच्या मालावर जी जकात बसविलेली असेल ती या नवीन दरामुळें असून नसून सारखीच होईल. आणखीही एक मोठें नुकसान या नवीन दरानें होणार आहे. ते म्हणजे हिंदुस्थानचें सोनें (Gold Reserves) इंग्लंडमध्यें १ शि. ४ पे. या दराप्रमाणें ठेविलेले होतें तें १ शि. ६ पे. या दरानें परत आणावे लागेल व यामुळें देशाचा भलताच तोटा होईल.

तात्पर्य १ शि. ६ पे. हा दर देशांतील आयात व्यापाऱ्यांच्या व परदेशीय व्यापाऱ्यांच्या जरी फायद्याचा असला

तरी देशांतील निर्गत व्यापाऱ्यांच्या, बहुजन समाजाच्या, उद्योगधंदे व कारखानदार यांच्या वगैरे सर्वांच्याच दृष्टीनें अनिष्ट आहे, आणि ह्मणूनच हे सर्व लोक या दराच्या उलट आहेत. आयात करणारे व्यापारी व सरकार हे त्याच्या बाजूचे आहेत; कारण त्यांत त्यांचें हित आहे. आतां सरकारकडून असें सांगण्यांत येते कीं, कोणताही दर घेतला तरी, १ शि. ६ पे. काय किंवा १ शि. ४ पे. काय, कोणत्यातरी एका पक्षाचा फायदा व दुसऱ्याचा तोटा होणार. तेव्हां कोणताही दर ठरविला तर त्यांत मोठासा प्रश्न नाहीं. परंतु हिंदुस्थानची आयात ही बहुधा त्याच्या निर्गतीपेक्षां पुष्कळच कमी असते हे लक्षांत घेतले ह्मणजे कोणता दर खरोखर श्रेयस्कर आहे याचा ताबडतोब उलगडा होईल; व एकंदरीत देशाच्या हिताच्या दृष्टीनें १ शि. ४ पे. हा दरच योग्य आहे हे दिसून येईल.

कमिशनची तिसरी महत्वाची सूचना रिझर्व बॅंकेसंबंधींची. तिच्याबद्दल पुढील प्रकरणांत विचार करावयाचा आहे. तसेच इतर लहानसहान शिफारशींचा विचार करण्याइतकें खोल तूर्त आपणांस जावयाचे नाहीं.

**सन १९२७ चा करन्सी ॲक्ट**:— हिंदुस्थान सरकारनें सन १९२७ सालीं हा रिपोर्ट मान्य करून १९२७ चा

नवीन करन्सी ॲक्ट केला व तो अमलांत आणला. याच कायद्याप्रमाणें हिंदुस्थानांतील प्रस्तुत चलन पद्धति आहे. या कायद्याच्या दुसऱ्या कलमामध्यें पुढील प्रमाणें तरतूद केली आहे. सदरचा कायदा अमलांत आल्या तारखेपासून हिंदुस्थानांत सोन्याचीं नाणीं कायदेशीर फेडीचें चलन ह्मणून चालणार नाहींत. परंतु अशीं नाणीं १ रुपयास ८.४७५१२ ग्रेन शुद्ध सोनें या दराप्रमाणें त्यांच्या धात्वात्मक मोलानें सरकार स्वीकारील. तसेच कलम ४ अन्वयें, ज्यामध्यें शुद्ध सोनें ४० तोळ्यांपेक्षां कमी नाहीं अशा चिपांच्या रूपांत, दर तोळ्यांस २१ रु. ३ आ. १० पै. यादरानें शुद्ध सोनें विकत घेण्यास सरकार बांधलें गेले आहे. व कलम ५ प्रमाणें वरील दराप्रमाणें सोनें अगर स्टर्लिंग द्यावयासही बांधलें गेलें आहे, परंतु अशारीतीनें कोणाही इसमास सोनें देण्याची किमान मर्यादा १०६५ तोळे ही ठरविली आहे.

**प्रस्तुत विवेचनाचें समालोचनः**— आतांपर्यंत बराच विस्तार झाल्यामुळें याठिकाणीं थोडक्यांत गोषवारा देऊन हें लांबलेलें प्रकरण पुरें करूं. इंग्रज लोक येथें येण्यापूर्वींपासून हिंदुस्थानांत सुवर्णचलन लोकांच्या पूर्ण परिचयाचें असून सोन्याची व चांदीचीं अशीं दोन्ही प्रकारचीं नाणीं येथें सुरू होतीं. स. १८३५ पर्यंत ही

स्थिति थोड्याबहुत प्रमाणांत चालू होती, पण या वर्षी ईस्ट इंडिया कंपनीनें रौप्य एक धात्वात्मक पद्धति येथें सुरू केली. या पद्धतीचा डोलारा कोसळून सरकारास बराचसा तोटा सोसावा लागल्यानंतर स. १८९८ मध्यें फौलर कमिटीनें हिंदुस्थानास सुवर्ण चलनाशिवाय गत्यंतर नाहीं असें मत देऊन तें स्थापण्यास उपायही सुचविले. परंतु सरकारनें हिंदी चलनाचें बाबतींत अविचाराचें धोरण स्वीकारून वेळोवेळीं निरनिराळे प्रयोग करून पाहिले. यांतून कोणाच्या ध्यानीं-मनींही नव्हती अशी सुवर्ण-परिवर्तन परिमाण पद्धति उत्पन्न झाली व स. १९१४ मध्यें तिच्यावर सरकारी मान्यतेचा शिक्काहि बसला. महायुद्धांतील व युद्धोतर काळांतील घडामोडींचा विचार करून स. १९२५ मध्यें एका कमिशननें हिंदुस्थानला 'सुवर्णचलन युक्त सुवर्ण परिमाण पद्धतीची आवश्यकता नाहीं असें ठरवून 'सुवर्ण खंड परिमाण पद्धति' सुचविली व सांप्रत आपल्याकडे हीच पद्धति प्रचारांत आहे. पण जोपर्यंत येथें पूर्ण सुवर्ण परिमाण पद्धति सुरू होणार नाहीं तोंपर्यंत हिंदुस्थानची आर्थिक व औद्योगिक प्रगती झपाट्यानें होणार नाहीं.



## प्रकरण १३ वें.

# बँका अगर पेढ्या.

**बँकांची आवश्यकता**:— अवाढव्य प्रमाणावर चालू असलेलें संपत्तीचें उत्पादन कार्य व सर्व जगभर विस्तार पावलेला

व्यापार हीं दोन आपल्या सध्यांच्या आर्थिक व औद्योगिक परिस्थितीचीं मुख्य अंगें आहेत. एखादा जिन्नस तयार करावयास लागणारा कच्चा माल हातीं येणें व त्यापासून तो जिन्नस तयार होऊन विक्री करितां तो बाजारांत पाठविणें या दोन क्रियामध्यें पुष्कळ काळ जातो. व नंतर विक्री होऊन त्याची किंमत हातांत येण्याला आणखी बरेच दिवस लागतात. तसेंच एखादी वस्तु एकाच मनुष्याच्या हातून कांहीं तयार होऊन बाहेर पडत नाहीं. तर तिला तयार करावयाला निरनिराळ्या व्यक्तींचें श्रम कारणीभूत होतात. प्राचीन काळीं ज्या प्रमाणें एखादा कोष्टी सर्व कामें ह्मणजे कापसाचें सूत काढणें, कापड विणणें, तें बाजारांत नेऊन विकणें इ. आपणच करीत असे, तसा प्रकार हल्लीं बहुतेक राहिला नाहीं. एखाद्या गिरणींतून कापड तयार होऊन बाजारांत येईपर्यंत त्याला कित्येक लोकांचे परिश्रम लागलेले असतात. पूर्वीच्या काळच्या कोष्टयाला आपल्यास लागणारा कापूस वगैरे कच्चा माल खरेदी करण्याला व त्याचा पक्का माल तयार करून विकेपर्यंत आपला निर्वाह करण्याला जो कांहीं थोडासा पैसा लागत असे तो पैसा त्याला स्वतःचा स्वतःला मिळविण्याला फारशी अडचण पडण्याचा संभव नसे. परंतु हल्लींच्या गिरण्यांचा खर्च अवाढव्य असतो. तेथें हजारों लोक खपत असतात. त्यांना उदरनिर्वाहाकरितां मजुरी द्यावी लागते. अतिशय विस्तृत प्रमाणावर कच्च्या मालाची खरेदी करावी लागते; फार भारी किंमतीची यंत्रसामुग्री घ्यावी लागते आणि या सगळ्या गोष्टी करण्याला पैसाही

पुष्कळच लागतो. शिवाय तयार झालेला माल बाजारांत विक्री होऊन पैसा हातांत येण्यास बराच वेळ लागतो. अशा स्थितींत इतका पैसा एका व्यक्तीला पैदा करणें जवळ जवळ अशक्य असतें. अशा तऱ्हेच्या अत्यंत विस्तृत प्रमाणावर चाललेल्या सध्याच्या कार्याला लागणारा पैसा पुरविण्याचें काम बँका अगर पेढ्या करितात व ह्मणूनच बँका ह्या सध्याच्या सुधारलेल्या समाजांतील आर्थिक जीवनाचे जणूं काय प्राणच आहेत.

बँक ह्मणजे काय, तिचें कार्य कोणतें व तिचा उपयोग काय वगैरे पहाण्यापूर्वी, बँकांच्या आद्यस्वरूपांत व त्यांच्या सध्याच्या स्वरूपांत फार फरक पडलेला आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. मनुष्यप्राणी ज्यावेळीं पैशाच्या सहाय्यानें आपले व्यवहार करूं लागतो, वस्तूंचें उत्पादन साधारण मोठ्या प्रमाणावर होत असतें व व्यापारधंद्याचा आपल्या देशांत व इतर देशांबरोबरही प्रसार झालेला असतो, अशा परिस्थितींत बँकांची जरूरी भासूं लागते व त्या अस्तित्वांत येतात. वाढत्या व्यापाराला जास्त पैशाची नेहमीं जरूरी लागते ह्मणून व निरनिराळ्या देशांत निरनिराळीं नाणीं सुरू असल्यामुळें एका देशांतील व्यापाऱ्यांना दुसऱ्या देशांतील नाणीं लागतात तीं पुरविण्याकरितां ह्मणून, बँकांची अगर पेढ्यांची जरूर भासूं लागते. अर्थात बँक ही पैशाचा अगर भांडवलाचा व्यापार करणारी संस्था. बँकांचा सुरवातीचा मुख्य उद्योग ह्मणजे निरनिराळ्या देशांतील व्यापारी लोकांना त्यांना लागेल त्याप्रमाणें निरनिराळ्या देशांतील चलनाचा

पुरवठा करणें हा होता. परंतु हल्लींच्या बदललेल्या परिस्थितीप्रमाणें ह्या उद्योगाबरोबरच इतर आणखी महत्वाचीं कार्यें बँका करूं लागल्या आहेत. तीं कोणतीं हें आतां आपण पाहूंया.

**बँकेचीं कार्यें:**— सध्यांच्या काळीं बँकांकडून मुख्यतः पुढील मुख्य कार्यें केली जातात. (१) गिऱ्हाइकांच्या ठेवी ठेऊन घेणें, (२) त्यांना व्याजानें पैसे देणें, (३) हुंड्यांचा व्यवहार करणें, (४) गिऱ्हाइकांच्या गुमास्त्याचें (Agent) काम करणें व (५) नोटा काढणें. या शिवाय इतर पुष्कळ प्रकारें बँकांचा उपयोग नित्य होत असतो तो वेगळाच.

बँकेचें पहिलें कार्य ह्मणजे लोकांच्या ठेवी ठेऊन घेणें. हें तिच्या कार्यांमध्यें सर्वांत सोपें पण महत्वाचें आहे. प्रत्येक देशांत असे कांहीं लोक असतात कीं, त्यांची प्राप्ती भरपूर असते व त्यांना आपला खर्च भागवून बरीच शिल्लक टाकतां येते. कांहीं लोक असें असतात कीं पुढें अडीअडचणीचेवेळीं उपयोगी पडावी ह्मणून ते थोडीबहूत शिल्लक टाकतात; व कांहीं लोक आपल्या रोजच्या खर्चांत देखील काटकसर करून आपल्या पश्चात् आपल्या कुटुंबाला उपयोगी पडावेत ह्मणून पैसे शिल्लक टाकीत असतात. आतां या सर्व लोकांची शिल्लक सुरक्षित ठेवण्याची जोखीम पत्करून बँक त्यांना वर आणखी कांहीं व्याजही देते. अशा तऱ्हेनें सर्व देशभर जी रक्कम थोडी थोडी प्रत्येकाजवळ विस्कळित होऊन पडून राहिलेली असते ती एके ठिकाणीं आणण्याचें श्रेय बँकेला आहे. थोडक्यांत असें ह्मणतां

येईल कीं समाजामध्यें निरनिराळया व्यक्तींच्या जवळ विस्कळितपणें रहाणारे पैशाचे लहान लहान झरे, बँकेमुळें एकेठिकाणीं एका मोठ्या तलावांत आणून सोडले जातात; व नंतर अशा तऱ्हेनें गोळा झालेलें हें पाणी अधिक सुपीक व फायदेशीर अशा प्रदेशाकडे वळवितां येतें. या योगानें पैसे शिल्लक ठेवणारांचाही फायदा होतो, कारण त्यांचे पैसे जे एरवीं मोकळे पडून राहिले असते त्यांना व्याज मिळतें व शिवाय, ते सुरक्षित ठेवण्याबद्दल काळजी व त्रास हेही रहात नाहींत. तसेंच सर्व समाजाचाही फायदा होतो, कारण अशा तऱ्हेनें गोळा झालेला पैसा दुसऱ्या निरनिराळ्या उपयुक्त व फायदेशीर कार्यांकडे लावितां येतो. तसाच यांत बँकांचाही फायदा होतो.

बँकेचें दुसरें कार्य ह्मणजे ज्या लोकांना गरज आहे अशांना पैसे कर्जाऊ द्यावयाचे. सध्यांच्या काळीं असे कित्येक लोक आपल्या दृष्टीस पडतात कीं, ज्यांच्यामध्यें मोठमोठे उद्योगधंदे करावयाचे सामर्थ्य आहे, धडाडी आहे, चिकाटी आहे व बुद्धिमत्ताही आहे पण पैसा नाहीं. थोडक्यांत ह्मणजे भांडवल खेरीज सर्व गोष्टी आहेत. त्यांना आपल्या या सर्व गुणांचें चीज करून दाखविण्याला व समाजोपयोगी उद्योगधंदे सुरू करावयाला भांडवल व पत यांचीच फक्त वाण असते. तसेंच सुरवातीला सांगितल्याप्रमाणें निरनिराळया वस्तूंचें उत्पादन होऊन त्यांच्या विक्रीची किंमत हातीं येण्याला मध्यंतरी बराच काल जावा लागतो; व या मध्यंतरीच्या कालांत त्या त्या धंद्यांतील लोकांना उदरनिर्वाहाकरितां व उत्पादन कार्य अव्याहत

चालूं ठेवण्याकरितां पैशाची जरूरी लागते. अशा लोकांना बँका पैसे कर्जाऊ देतात आणि त्यांना त्यांच्या कार्यांत व पर्यायानें सर्व देशाला, उर्जितावस्थेला आणण्याचें कामीं सहाय्यभूत होतात. तात्पर्य ज्यांचे जवळ पैसा आहे पण तो योग्य रीतीनें फायदेशीर धंद्यांत गुंतविण्याचें ज्ञान नाहीं अशा लोकांकडून तो मिळवून, ज्यांच्याकडे पैसा नाहीं पण त्याचा उपयोग योग्य व किफायतशीर रीतीनें करून घेतां येईल अशा तऱ्हेच्या अनेक योजना आहेत, अशा लोकांना तो पुरविण्याचें मध्यस्थीचें काम बँक करिते व यामुळें सर्वांचेंच ह्मणजे बँकेंत पैसे ठेवणारांचें, खुद्द बँकेंचें, व बँकेकडून पैसे घेणारांचेंही हित होतें. अशा रीतीनें जो पैसा एरवीं नुसता पडून राहिला असता त्याचा उद्योग-धंद्यांच्या कामीं उपयोग करून, बँक देशांतील उद्योगधंद्यांना भरभराटीस आणण्यास मदत करते व लोकांची संपत्युत्पादन शक्ति वाढवून देशाला संपन्न करण्यास कारणीभूत होते.

बँकेचें तिसरें महत्वाचें कार्य ह्मणजे हुंड्यांची देवघेव करणें. या दृष्टीनें बँक ही एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं अगर एका देशां-तून दुसऱ्या देशांत पैसे वाहतुकीचें काम करते. पण तें प्रत्यक्ष पैसे पाठवून नव्हे तर रोख पैसे न पाठवितां फक्त हुंड्यांच्या सहाय्यानें! हुंड्या ह्मणजे काय हें आपण मागें पाहिलेंच आहे. याप्रमाणें कुठल्या-ही ठिकाणचा पैसा न हलवितां एकेठिकाणाहून दुसरें ठिकाणीं गेलेल्या इसमास तेथें पैसे मिळण्याची व्यवस्था बँकांकडून हुंड्यांच्या सहाय्यानें केली जाते. या हुंड्या मुदतीच्या असतात अगर दर्शनी ह्मणजे

ताबडतोब पैसे मिळण्याच्या असतात. मुदतीच्या हुंडीबद्दल एखा-द्याला मुदत भरावयाच्या अगोदर पैसे पाहिजे असतील तर बँक ती आपण विकत घेते व हिशोबाप्रमाणें 'कसर' कांपून घेऊन जें काय होतील ते पैसे त्याला देते. पुढें ती हुंडी बँक आपलेजवळ मुदत भरेपर्यंत ठेवते, अगर मध्यंतरी दुसऱ्या कोणाला विकूनही टाकते. अशा रीतीनें हुंड्यांच्या योगानें पुष्कळ मोठमोठ्या देवघेवी केल्या जातात. अर्थात् या सर्व कामाबद्दल बँक आपले कमिशन कापून घेतेच.

तसेंच बँक आपल्या गिऱ्हाइकांच्या गुमास्तेगिरीचेंही काम करते. त्यांचे कोठलें शेअर वगैरे असतील त्यांचें व्याज गोळा करणें, त्यांचेकरितां शेअर्सची वगैरे खरेदीविक्री करणें, त्यांचें जडजवाहीर, दागदागिने हें सुरक्षित ठेवणें इत्यादि कामें बँका योग्य कमिशन घेऊन करतात.

बँकेचें पांचवें महत्वाचें कार्य ह्मणजे नोटा काढणें. बहुतेक सर्व सुधारलेल्या देशांत बँकेला हा अधिकार दिलेला असतो. हा अधिकार फार जोखिमेचा असल्यामुळें, त्याचेवर सरकारचें नियंत्रण असतेंच. आपल्या हिंदुस्थानांत मात्र, सरकारनें हा हक्क सर्वस्वीं आपल्याकडे राखून ठेविलेला असून बँकेला नोटा काढावयाची परवानगी दिलेली नाहीं. पण ज्या देशांतील, बँकांना हा अधिकार असतो तेथें त्यांना या नोटांच्या योगानें व तसेंच चेक, हुंड्या वगैरे पतपत्रिकांचें ( credit instruments ) सहाय्यानें देशांतील

व्यापारधंद्याला जरूर लागेल तेवढें भांडवल पुरवितां येतें. कारण बँकेची परिस्थिति चांगली विश्वसनीय असली ह्मणजे ह्या नोटा अगदीं पैशासारख्या चालतात. बँका ज्या निरनिराळ्या "पत-पत्रिका" काढतात त्यांना बँकेचें चलन असें ह्मणतां येईल. या चलनाचा मुख्य फायदा हा आहे कीं, तें फार लवचिक ( elastic ) असतें, ह्मणजे देवघेवीस जशी जरूर लागत जाईल त्याप्रमाणें आपोआप तें कमी-जास्त होते. कारण बँक ज्या पतपत्रिका काढते त्या मुख्यतः तिच्या गिऱ्हाइकांच्या गरजेनुरूप व मागणीनुरूपच काढते.

**बँकेच्या देवघेवीच्या व्यवहाराचें स्वरूपः—** ज्यांच्या जवळ शिल्लक टाकण्यास पैसा आहे अशा लोकांजवळून तो गोळा करून, ज्यांना त्याची गरज आहे अशा लोकांना, तो पुरविण्याचें मध्यस्थाचें काम बँक करते असें वर ह्मटलें आहे. पण या ठिकाणीं एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे; ती ही कीं सावकार व कर्ज काढूं इच्छिणारे यांची फक्त गांठ घालून देण्याचें काम जसे इतर कांहीं लोक थोडेबहुत कमिशन घेऊन करतात, त्यांच्यासारखें मध्यस्थाचें काम बँक करीत नाहीं. तर बँक ही स्वतःचें नांवानें लोकांकडून ठेवी घेते व त्याबद्दल स्वतः ठेवीदारांना जबाबदार रहाते. तसेंच स्वतःचेंच नांवानें लोकांना कर्ज देते व तें स्वतः मालक या नात्यानें वसूल करते. ह्मणजे बँक ही एखाद्या बेजबाबदार कमिशन खाऊं मध्यस्थाप्रमाणें नसून दोन्ही तऱ्हेच्या लोकांशीं मुख्य मालक या नात्यानें व्यवहार करते. आतां लोक जे बँकेमध्यें ठेवी ठेवावयास तयार होतात ते

त्यांचा तिच्या पतीवर पूर्ण विश्वास असतो ह्मणूनच होतात. व अशारीतीनें बँक ही आपल्या पतीच्या आधारावर लहानमोठ्या ठेवीदारांकडून ठेवी आकर्षण करीत असते. व या ठेवींच्या आधारावर आपल्या गिऱ्हाइकांना कर्ज देते.

आतां बँकेकडे ठेवीदारांच्या ज्या ठेवी असतात त्यापैकीं कांहीं तीन महिनें, सहा महिनें, बारा महिनें अशा तऱ्हेच्या दीर्घ मुदतीच्या असतात; पण बऱ्याच 'चालू खात्यां'च्या ( current accounts ) स्वरूपाच्या असतात. व ज्या वेळीं जशी मागणी येईल त्या वेळीं तशी रक्कम बँकेला ताबडतोब द्यावी लागते. व एवढ्याकरितां प्रत्येक बँकेला कांहीं तरी रोकड नेहमीं हाताशीं तयार ठेवावी लागते. आतां प्रत्येक बँकेला आपल्याला चालू खातेवाल्यांच्या मागण्या भागविण्याकरितां रोज किती रोकड लागते याची साधारणपणें कल्पना अनुभवानें आलेली असते व त्याप्रमाणें रोकड तयार ठेवण्याची बँक व्यवस्था करते; व आपल्या हातांतील इतर रक्कम गिऱ्हाइकांस कर्जाऊ देऊन व्याज मिळविते.

आतां बँक आपल्या गिऱ्हाइकाला पैसे कसें कर्जाऊ देते तें पाहूंया. समजा कीं, अ या व्यापाऱ्याला दहा हजार रुपये कर्जाऊ पाहिजे आहेत. अ हा इम्पीरिअल बँकेकडे जातो व तेथील अधिकाऱ्यांची, तेवढी रक्कम कर्जाऊ मिळण्यासारखी आपली लायकी आहे, अशी खात्री पटवून देतो. अगर घरदार, जमीनजुमला, जडजवाहीर वगैरे सारखें कांहीं तरी योग्य व पुरेसें तारण देतो.

आतां त्याला दहा हजार रुपये द्यावयाचे वेळीं, एक तर एकदम दहा हजार रुपयांच्या नोटांचें पुडकें बँक त्याच्या हातांत देऊं शकेल अगर त्याच्या नावें दहा हजार रुपयांचें एक खातें उघडून तितक्या रकमेपर्यंत त्यानें केव्हांही बँकेवर चेक काढावेत अशी व्यवस्था करूं शकेल. या दुसऱ्या रीतीनें एक रुपयाही इकडचा तिकडे न हलवितां, एका लेखणीच्या फटकाऱ्यानें, प्रत्यक्ष दहा हजार रुपये रोख दिल्या सारखेंच काम होतें. बँकेंत ही दुसरी कर्ज देण्याची रीतच बहुतेक प्रचारांत असते.

**बँकांपासून होणारे इतर कांहीं फायदे**:—आतांपर्यंत वर जे बँकांचें कार्य व फायदे सांगितलें त्यांपेक्षां त्यांच्यापासून आणखीही कांहीं फायदे आहेत. बँका ह्या कागदी चलनाच्या प्रसाराला मदत करून, सोन्यारुप्यांचा नाण्यांप्रीत्यर्थ होणारा जो खर्च त्यामध्यें बचत करतात; व अशारीतीनें बचत झालेलें सोनें रुपें हीं इतर राष्ट्रोपयोगी कामांस उपयोगी पडतात. तसेंच बँकांच्या योगानें लोकांना काटकसरीची संवय लागून आपले पैसे शिल्लक टाकण्यास उत्तेजन मिळतें. शिवाय एखाद्याची बँकेंत रक्कम असली ह्मणजे त्याला समाजामध्येंही थोडासा एक प्रकारचा दर्जा अगर मान असतो. त्याचप्रमाणें ज्या पैसेवाल्या लोकांना आपले पैसे व्यापारधंद्यांत गुंतवावयाचे असतील अशांना बँका योग्य सल्ला देऊं शकतात. प्रत्येक मनुष्याला कांहीं उद्योगधंद्यांची इतकीशी माहीती असत नाहीं; व कोणता धंदा व कारखाना फायदेशीर, अगर कोणता तोट्याचा, हें

तितकेसें कळत नाहीं. बँका त्यांना योग्य मार्ग दाखवून देतात. अशातऱ्हेनें बँकांचे अनेक उपयोग आहेत व त्या हल्लींच्या औद्योगिक परिस्थितीला अत्यंत आवश्यक आहेत. आणि ह्मणूनच प्रथम आह्मीं ह्मटलें कीं, बँका या सध्याच्या आर्थिक व औद्योगिक जीवनाचा जणूं-काय प्राण आहेत; व त्यांच्या सहाय्याशिवाय सध्यासारखे मोठ्या प्रमाणावर संपत्तीचें उत्पादन अगर विनिमय कार्य होणें शक्य नाहीं.

**बँकांचे प्रकार**:— बँकांच्या निरनिराळया व्यवसाय क्षेत्रा-नुसार, औद्योगिक अगर ठेवी ठेवण्याचा व पैसे कर्जाऊ देण्याचा धंदा करणाऱ्या ( Industrial or Investment Banking ), व व्यापारी ( Commercial ) बँका, अशा प्रकारें बँकांचे दोन प्रकार करतां येतात. हिंदुस्थानांत बँकांच्या धंद्याची अद्याप पाश्चि-मात्य देशाइतकी प्रगति मुळींच झालेली नाहीं व बहुतेक बँका दोन्ही तऱ्हेचे व्यवहार करतात. परंतु पाश्चात्य देशांत मात्र निव्वळ एखादा विशिष्ट प्रकारचाच व्यवहार करणाऱ्या अशा कांहीं बँका आहेत. औद्योगिक बँकांचें मुख्य काम उद्योगधंद्यांना भांडवलाचा पुरवठा करणें व त्यायोगें संपत्त्युत्पादनाचें कार्याची वाढ करणें हें असतें. व्यापारी बँकांचें मुख्य कार्य, व्यापारी लोकांना थोडक्या मुदतीनें कर्जाऊ रकमा देऊन व्यापार व देवघेव यांना सहाय्य करणें हें असतें.

तसेंच बँकेचें स्वामित्व कोणाकडे आहे या गोष्टीला अनुसरून बँकांचे तीन वर्ग करतां येतात, ते येणें प्रमाणें:— ( १ ) सरकारी ( २ ) खासगी व ( ३ ) संयुक्त भांडवलाच्या. पहिल्या प्रकारांत

सरकार पोस्टल सेव्हिंग्ज बँका काढते त्या, अगर शेतकऱ्यांच्या उद्योगाकरितां बँका काढते तशा प्रकारच्या, बँकांचा समावेश होतो. तसेंच देशांत एखादी मध्यवर्ती अशी व इतर सर्व बँकांना सहाय्य करणारी अशी, बँकही कांहीं देशांतील सरकार काढते. खासगी बँका ह्मणजे बहुधा एखाद्या कुटुंबांतील मंडळींनीं अगर कांहीं विविक्षित खासगी व्यक्तींनीं स्वतःच्या जबाबदारीवर चालविलेल्या बँका. त्यांची सर्व व्यवस्था त्या मंडळींच्याच हातांत असते. अशा तऱ्हेच्या बँकांची उर्फ पेढ्यांची पद्धत आपल्या हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून आहे. व कांहीं कांहीं घराण्यांत हा पेढीचा धंदा पिढीजाद चालू आहे. संयुक्त भांडवलाची बँक ( Joint Stock Bank ) ह्मणजे ज्या बँकेचे भागीदार पुष्कळ असतात, व सर्वांच्या संयुक्त भांडवलानें जी काढलेली असते, अशी बँक. अर्थात् हे सर्वच भागीदार बँकेचें काम पहात नाहींत तर ते आपल्यापैकींच एक चालक मंडळ ( Board of Diretors ) नेमतात व तें मंडळ बँकेची सर्व व्यवस्था पहाते. आपल्या देशांत पूर्वीं अशा तऱ्हेच्या बँका नव्हत्या. या तत्वानुसार चाललेल्या बँकांच्या उद्योगांत एकप्रकारचा कायमपणा व अधिक कार्यक्षमता असते. उदाहरणार्थ एखाद्या खासगी बँकेचा मालक मेला तर त्याचा मुलगा त्याच्या इतकाच हुशार व कर्तबगार निघेल याचा नेम नसतो. परंतु संयुक्त तत्वावर निघालेल्या बँकेचा एक मॅनेजर मेला तर त्याच्या सारखाच चांगला व कार्यक्षम असा दुसरा मॅनेजर नेमता येईल व अशा रीतीनें बँकेचें काम पूर्ववत्

व्यवस्थेशीरपणानें व दक्षतेनें चालू राहील.

**बँकांचें स्वरूपः**— ज्या दोन तत्वांवर सध्याच्या बँकांची उत्क्रान्ती झालेली आहे, तीं दोन तत्वें ह्मणजे, मध्यवर्ति बँक पद्धति ( centralised banking ) व विस्कळित बँक पद्धति (decentralised banking ), हीं होत. इंग्लंडची बँक-पद्धति ही पहिल्या प्रकारचें उत्कृष्ट उदाहरण आहे. केंद्रस्थानीं 'बँक ऑफ् इंग्लंड' ही बँक, खालीं बँकेची सर्व गिऱ्हाईकें व मध्यंतरीं या दोहोंची सांगड घालून देणाऱ्या नानाविध बँकांचें एक जाळें. अशा तऱ्हेच्या त्रिकोणाकृती स्वरूपांत इंग्लंडची बँक-पद्धति बसवितां येईल. बँक ऑफ् इंग्लंड ही ब्रिटिश सरकारची बँक ह्मणून तिला एक प्रकारचें महत्व व वजन प्राप्त झालेलें आहे. तिचा ब्रिटिश सरकारच्या खजिन्याशीं निकट संबंध येतो. तसेंच ही बँक इतर ज्या कांहीं खासगी व संयुक्त भांडवली बँका आहेत त्यांनाही सहाय्य करते. त्या बँकांचीं या बँकेत खातीं असतात व त्यामुळें त्यांना जी पत प्राप्त होतें तिचा त्यांना पुष्कळच उपयोग होतो. इतर बँका आपल्या रोजच्या व्यवहाराला पुरेसा पैसा फक्त आपल्या हातीं ठेवतात व बाकी सर्व शिल्लक, बँक ऑफ् इंग्लंडमध्यें ठेऊन देतात, व ही शिल्लक, त्या आपल्या हातांत प्रत्यक्ष रोकड आहे अशीच मानतात. अशारीतीनें बँक ऑफ् इंग्लंडमध्यें जवळ जवळ सबंध देशांतील शिल्लक असते. त्याचप्रमाणें या बँकेला नोटा काढण्याचा जवळ जवळ मक्ताच दिल्यासारखा आहे. या सर्व कारणांमुळें बँक ऑफ् इंग्लंड या बँकेला इंग्लंडमधील सर्व

बँकापेक्षां अतिशय महत्व प्राप्त झालेलें आहे. एके काळीं ही बँक जगांतील सर्व पैशाच्या बाजाराची ( सराफ कट्ट्याची money markets ) सूत्रें हलवीत असे, पण हल्लीं तिला अमेरिकेंतील बँका ह्या, या बाबतींत प्रबल प्रतिस्पर्धी आहेत.

**बँकांचा त्रिविध उपयोग:**—कोणत्याही देशांतील बँकांच्या धंद्याकडे पाहिलें तर दिसून येईल कीं, समाजाच्या आर्थिक जीवनाला बँकांचा उपयोग साधारणपणें तीन तऱ्हांनीं होतो. प्रथमत: देशांतील लोकांच्या वेळोवेळीं बदलत असणाऱ्या व्यावहारिक देवघेवीच्या साधनांच्या गरजा भागविण्यास समर्थ असणें, व वेळप्रसंगीं विस्तृत अगर आकुंचित होऊं शकेल अशीं व्यापारोपयोगी लवचीक चलनपद्धति अमलांत आणणें, हे देशांतील बँकेच्या धंद्याचे महत्वाचे उपयोग आहेत. ज्या देशांतील बँकांना नोटा काढण्याचा अधिकार असतो त्या देशांत अशा तऱ्हेची चलन पद्धति अमलांत येणें सोपें असतें. कारण वेळप्रसंग पडेल त्या प्रमाणें, बँकांना आपल्या नोटांची संख्या कमिजास्त करता येते. व जरी एखाद्या देशांत बँकांना नोटा काढण्याची परवानगी नसली तरी लोकांसाठीं ठेवीची खातीं उघडून, त्यांवर काढतां येणाऱ्या चेकांच्या योगानेंही बँकांना योग्य तऱ्हेनें व व्यवस्थितपणें वागल्यास वरील कार्य करतां येतें. बँकांचा दुसरा महत्वाचा उपयोग ह्मणजे, बँकापाशीं सांठणाऱ्या भांडवलाचा देशांतील उद्योगधंद्यांना व व्यापाराला शक्य तितका अधिक फायदा करून देणें हा होय. देवघेवीकरतां लागणारें चलन जरी क्षणभर विचारांत

घेतलें नाहीं तरी प्रत्येक देशांत उद्योगधंदे चालू ठेवण्याला पुष्कळच भांडवल लागतें. उद्योगधंद्यांची वाढ होणें व देशाच्या नैसर्गिक देणग्यांचा, मानवी गरजा भागविण्याकडे, नीट उपयोग करून घेणें, याकरितां पैशाची जरूरी असते व आपल्या गंगाजळींच्या पायावर शक्य तेवढ्या मोठ्या प्रमाणांत पतीची (credit) वाढ करून, अशा-तऱ्हेनें उत्पन्न होणाऱ्या भांडवलाचे योगानें उद्योगधंद्यांना मदतकरणें, हें बँकांचें एक महत्वाचें कार्य आहे. बँकेच्या धंद्याचें तिसरें महत्वाचें अंग ह्मणजे देशांतील बँकांना वेळप्रसंगीं मदत करूं शकेल अशी एखादी मध्यवर्ती बँक हें होय. ज्या तऱ्हेचें कार्य एखादी बँक देशांतील सामान्य लोकांच्या संबंधीं करतें त्याच तऱ्हेचें कार्य ही मध्यवर्ती बँक इतर बँकांच्या संबंधानें करीत राहिली पाहिजे. ज्याप्रमाणें एखादी बँक निरनिराळ्या व्यक्तींच्या लहान मोठ्या शिल्लक पडणाऱ्या रकमा एकत्रित करणें, अशा एकत्रित केलेल्या रकमा ज्यांना जरूर लागेल अशा लोकांना व धंद्यांना पुरविणें, व या रीतीनें देशांतील उत्पादन कार्याला मदत करणें, हीं कार्यें करते; त्याचप्रमाणें मध्यवर्ती बँक ही इतर बँकांच्या शिलकी एकत्रित करते, ज्या बँकांना पैशाची जरूरी भासेल अशांना योग्य ते पैसे पुरविते, व एकंदरीत प्रत्येक वैयक्तिक बँकेंत पडून राहिलेल्या थोडथोड्या शिलकेचा विस्कळित स्वरूपांत उपयोग होईल त्यापेक्षां, त्या शिलकी एकत्रित करून त्यांचा अधिक उपयोग करण्याचें कार्य करते. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे ती बँकांची बँक असते व आणीबाणीच्या

वेळीं ती इतर बँकांच्या मदतीला येऊन त्यांना सांवरून धरते.

## हिंदुस्थानांतील बँकांच्या धंद्याची परिस्थितिः

**१ खासगी पेढिवाले, सराफ वगैरेः**—पाश्चिमात्य देशांत संयुक्त भांडवलाच्या तत्वावर पेढ्या ( Joint-stock Banks ) काढावयाची कल्पना देखील निघण्याच्या अगोदर कित्येक शतकें आपल्या देशांत खासगी पेढिवाले व सराफ लोक यांचा धंदा भरभराटीनें चालत होता. व अद्यापही तो तसाच चालत असून पुढेंही कित्येक वर्षेंपर्यंत तरी तो तसाच चालत राहील यांत शंका नाहीं. आतां सध्यां प्रचारांत आलेल्या युरोपीअन तत्वावरील बँकांच्या व्यवहारामध्यें व ह्या पूर्वीच्या खासगी पेढीवाल्यांच्या व्यवहारांमध्यें बरेंचसें अंतर आहे. ह्या पेढीवाल्यांचा मुख्य व्यवहार ह्मणजे पैसे कर्जाऊ देणें, एका ठिकाणच्या चलनाबद्दल दुसऱ्या ठिकाणचें चलन पुरविणें, व हुंड्यांचा व्यवहार करणें हा होता, असें जे रा. ठाकूर यांनीं आपल्या organization of Indian Banking या पुस्तकांत ह्मटलें आहे तें खरें आहे. रा. ठाकूर यांनींच ह्मटल्याप्रमाणें त्यावेळची पारिस्थिति लक्षांत घेतली असतां या खासगी पेढीवाल्यांनीं पुष्कळच देशोपयोगीं कार्य केलें आहे, हें कोणालाही कबूल केलेंच पाहिजे.

सध्यां देखील या खासगी पेढीवाल्यांचा व सराफांचा देशांतील व्यापरधंदा करणाऱ्या लोकांना पुष्कळच उपयोग होतो. इतकेंच नव्हे तर युरोपीअन पद्धतीवर इकडे स्थापन झालेल्या बँकांनाही त्यांचा अतिशय उपयोग होतो, कारण अद्याप आपल्याकडे अशा

बँकांच्या धंद्याची व्हावी तशी वाढ झालेली नाहीं. तसेंच हिंदुस्थानचा विस्तार लक्षांत घेतां मोठमोठ्या शहरांपासून दूरदूरच्या भागांत राहणाऱ्या लोकांना व व्यापाऱ्यांना अशा बँकांचा प्रत्यक्ष उपयोग फारसा होत नाहीं. अशा परिस्थितींत हे खासगी पेढीवालेच व्यापाऱ्यांना पुष्कळसे उपयोगी पडतात. व जरूर तेव्हां अशा व्यापाऱ्यांचा व बँकांचा संबंध घडवून आणण्याचें कामही हे पेढिवालेच करतात. तसेंच हे पेढीवाले लोकांच्या ठेवी ठेवून घेणें, इतर देवघेवींच्या व्यवहारांत भाग घेणें, हीं कामेंही सध्यासुद्धां थोड्याबहुत प्रमाणांत करतातच. थोडक्यांत सांगावयाचें ह्मणजे, इंडियन सेंट्रल बँकिंग कमिटीनें नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या आपल्या रिपोर्टांत ह्मटल्याप्रमाणें, सध्या इकडे संयुक्त भांडवलाच्या तत्वावर निघालेल्या बँका जरी स्थापन झालेल्या आहेत तरी पेढीवाल्यांचा पुष्कळसा धंदा अद्यापही देशी पेढीवाल्यांच्या हातांतच आहे. ह्या नवीन निघालेल्या बँकांचें कार्यक्षेत्र मुख्यतः मोठमोठीं व्यापारी बंदरें व देशांतील महत्वाचीं व्यापारी ठिकाणें हेंच आहे. यामुळें देशांतील इतर दूरदूरच्या प्रदेशांना भासणारी बँकांची वाण ह्या देशी पेढीवाल्यांनीं भरून काढली आहे. व त्यांच्यामुळें देशांतील अंतर्गत व्यापाराला व शेतीच्या धंद्याला फारच सहाय्य होत आहे. विशेषतः कृषिप्रधान भागांमध्यें तर त्यांची मदत पूर्वी इतकीच अनुपेक्षणीय आहे. (सेंट्रल बँकिंग इन्कायरी कमिटी रिपोर्ट व्हॉ. १ भाग १ पान १४, १५).

**२ संयुक्त भांडवली बँका** (Joint Stock Banks.):—

संयुक्त भांडवली बँकांच्या धंद्याची आपल्याकडे आतां कोठें थोडीबहुत प्रगति झाली आहे. यद्यपि इंग्लंड, अमेरिका वगैरे पाश्चिमात्य देशांशी तुलना करतां आपल्याकडील ह्या बँकांचा धंदा ह्मणजे केवळ पोरखेळ आहे असेंच वाटेल. याचें मुख्य कारण ह्मणजे आपण औद्योगिक प्रगतीच्या दृष्टीनें पुष्कळच मागें आहोंत हें होय. आतां आपल्याकडील या तऱ्हेच्या बँकांची वाढ कसकशी होत गेली तें आपण पाहूं.

हिंदुस्थानांतील पहिली संयुक्त भांडवली पद्धतीची बँक 'बँक ऑफ् हिंदुस्थान' या नांवानें अलेक्झांडर कंपनीनें इ. स. १७७० मध्यें कलकत्ता येथें काढिली. पण ती सन १८३२ च्या सुमारास बुडाली. साधारणपणें सन १८६० पर्यंत अशा तऱ्हेच्या बँका विशेषत: कलकत्याच्या आसपास युरोपिअन लोकांनीं बऱ्याच काढल्या, पण त्यांपैकीं पुष्कळशा थोड्याच दिवसांत बुडाल्या. इ. स. १८७० ते १८९४ चे दरम्यानही बऱ्याच बँका निघाल्या. पण या बँकांच्या धंद्यास खरी चालना सन १९०४ च्या स्वदेशी चळवळीमुळें मिळाली. स. १९०६ मध्यें ज्यांचें भांडवल व गंगाजळी (Reserve) हीं पांच लक्ष रुपयांपेक्षां अधिक आहेत अशा बँका ९ होत्या, त्या सन १९१३ मध्यें १८ झाल्या. या शिवाय लहान लहान बँका पुष्कळच निघाल्या, जणूं काय या वेळीं बँकांना ऊत आला होता. पण या बँकांपैकीं बऱ्याच बँका लवकरच विराम पावल्या. सन १९१३ ते सन १९२४ चे दरम्यान हिंदी संयुक्त भांडवली बँकावर एक दोन मोठीं गंडांतरें आलीं व या मुदतींत एकंदर १६१ बँका

बुडाल्या, व यामुळें या धंद्याच्या प्रगतीला मोठा धक्का बसला. पण यानंतर मात्र हिंदी बँकांनीं आपली स्थिरस्थावर केली व येथील बँकांच्या धंद्याला थोडथोडी उर्जितावस्था येऊं लागली. सन १९२८ मध्यें ज्यांचें भांडवल व गंगाजळी ५ लाख रुपयांपेक्षां अधिक आहेत अशा बँकांची संख्या २८ होती व पांच लाखापेक्षां कमी पण एक लाखापेक्षां अधिक भांडवल व गंगाजळी असणाऱ्या बँका ४६ होत्या.

खालील कोष्टकावरून हिंदुस्थानांतील मुख्य मुख्य संयुक्त भांडवली बँकांचें भांडवल, गंगाजळी व ठेवी यांत वाढ कशी झाली हे दिसेल.

( आंकडे लक्ष रुपयांचे आहेत )

| वर्ष | भांडवल | गंगाजळी | ठेवी |
|---|---|---|---|
| १८७० | ९·८ | १·८ | १३ |
| १८८० | १८ | ३ | ६३ |
| १८९० | ३३ | १७ | २७० |
| १९०० | ८२ | ४५ | ८०७ |
| १९१० | २७५ | १०० | २५६५ |
| १९२० | ८३७ | २५५ | ७११४ |
| १९२८ | ६७४ | ४३४ | ६२८५. |

**३ एक्सचेंज बँकाः**— आपल्याकडील बँकांच्या व्यवहाराकडे पाहिलें असतां आपल्याला असें दिसून येईल कीं कांहीं कांहीं बँका मुख्यत्वें करून एखादें विशिष्ट प्रकारचेंच काम करीत असतात. देशांतील अंतर्गत व्यापाराला मुख्यतः खासगी पेढीवाले, सराफ व इतर

कांहीं बँका यांचें सहाय्य होते. परंतु परदेशांशी असलेल्या आपल्या व्यापाराची देवघेवही बहुतेक एक्सचेंज बँकांच्या हांतूनच होत असते. हिंदुस्थानांतील या बँका, इंग्लंड, अमेरिका वगैरे पुढारलेल्या देशांत स्थापन झालेल्या बँकांच्या शाखा होत. या बँकांनीं हिंदुस्थानच्या निर्गत व्यापाराच्या देवघेवीचा जवळ जवळ मक्ताच घेतल्या सारखें केलें आहे. व आपल्या या राखीव कुरणांत दुसऱ्या कोणालाही पाऊल घालूं न देण्याची त्या नेहमीं खबरदारी घेत असतात. परंतु आपण मात्र दुसऱ्याच्या कुरणांत चरण्याची संधी आली कीं सोडीत नाहींत. या बँका आपल्या व्यवहाराला लागणारें भांडवल एकेकाळीं परदेशांतूनच—मुख्यतः लंडनमधून—जमवीत असत. परंतु अलिकडे त्यांनीं इकडेही भांडवल जमा करण्यास सुरवात केली आहे. स. १९२८ अखेर अशा प्रकारच्या १८ एक्स्चेंज बँका काम करीत होत्या.

**४ को-ऑपरेटिव्ह बँका**:— या पेढ्या सहकार तत्वावर अवलंबून असून, को-ऑपरेटिव्ह सोसायट्यांच्या कायद्यान्वयें त्यांची स्थापना करण्यांत येते. अग्रभागीं प्रॉव्हिन्शियल को-ऑपरेटिव्ह बँक असून तिला निरनिराळ्या सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँका जोडलेल्या (affiliated) असतात, व ठिकठिकाणीं प्रायमरी को–ऑपरेटिव्ह सोसायट्या असतात, त्या बहुतेक ह्या सेंट्रल बँकांना जोडलेल्या असतात. अशारीतीनें को-ऑपरेटिव्ह बँकांची ही एक मालिका असते. अशा सर्व तऱ्हेच्या सहकारी पतपेढ्या स. १९२६–२७ सालीं ८९०८१ असून त्यांचे ३६·७ लक्ष मेंबर होते, व यांचें भांडवल ६७·९ कोटि

रुपये होते. हिंदुस्थानच्या स्थितीचें दृष्टीनें ही संख्या अत्यंत अपुरं आहे हे स्पष्टच दिसेल. ह्या बँकांचे व्यवहारांवर को-ऑपरेटिव्ह सोसायट्यांच्या कायद्यांचें व सरकारच्या को-ऑपरेटिव्ह खात्यानें केलेल्या नियमांचें नियंत्रण असतें व सरकारही अशा बँकांन निरनिराळ्या तऱ्हेनें मदत व उत्तेजन देतें.

**५ लँड मॉर्गेज बँका:**— अशा सहकारी चळवळीच्य (Co-operative movement) प्रोत्साहनानेंच मुंबई, मद्रास बंगाल, पंजाब वगैरे कांहीं कांहीं इलाख्यांतून लँड मॉर्गेज बँक शेतकऱ्यांच्या उपयोगाकरितां काढण्यांत आलेल्या आहेत. या जमिनीचें तारणावर शेतकऱ्यांस बऱ्याच मुदतीनें कर्ज देऊन मदत करितात; पण त्यांची संख्या अगर त्यांची ऐपत हिंदुस्थानांतील शेतकरं वर्गाच्या जरूरीपेक्षां फारच कमी असल्यामुळें त्यांचा प्रत्यक्ष विशेष उपयोग होत नाहीं. ता. ३० जून १९३० रोजीं अशा संस्था सर्व हिंदुस्थान व ब्रह्मदेश मिळून फक्त ६८ असून त्यांच्या सभासदांचं संख्या फक्त १४, १४२ होती. तसेंच त्यांचें भांडवल व गंगाजळय मिळून एकूण ६ लक्ष, ३३ हजार रु. असून त्यांच्याकडील ठेवी २० लक्ष, ३५ हजार होत्या व त्यांनीं दिलेलें कर्ज २० लक्ष, २८ हजार होतें. एकंदरींत येथें वरील दोन्ही प्रकारच्या सहकार तत्वाव उभारलेल्या बँकांची वाढ अगदीच अपुरी आहे हें दिसून येईल.

**६ पोस्टल सेव्हिंग्ज बँका:**— हिंदुस्थानच्या बँकांमध्ये पोस्टल सेव्हिंग्ज बँकांचें स्थान बरेंच महत्वाचें आहे. स. १८७२

सालीं प्रथम पोस्टल सेव्हिंग्ज बँका स्थापन करण्यांत आल्या. या बँकांचें मुख्य कार्य, खालच्या व मध्यम वर्गाच्या लोकांना काट-कसरीची संवय लाऊन त्यांना थोडीबहुत शिल्लक टाकावयास उत्तेजन द्यावयाचें, हें आहे; व या दृष्टीनें त्यांचें आतांपर्यंतचें कार्यही बरेंच आशाजनक आहे. स. १९२७–२८ सालीं अशा पोस्टल बँकांची संख्या १२३२६ असून त्यांमध्यें २६ लक्ष लोकांनीं जवळ जवळ ३३ कोट रुपये ठेविले होते. या बँका सरकारी असल्यामुळें लोकांचा त्यांच्यावर अधिक विश्वास आहे. व साधारणतः लहान-सहान शहरीं देखील व बऱ्याचशा मोठमोठ्या खेड्यांतूनही ह्या असल्यामुळें, सर्व ठिकाणच्या लोकांना यांचा उपयोग करून घेतां येतो. पण या बँकांत ठेवी ठेवणाऱ्यांपैकीं बहुसंख्याक लोक मध्यम वर्गांतील व साधारण सुशिक्षित समाजापैकींच आहेत. अद्याप खालच्या वर्गांतील कामकरी वगैरे या बँकांचा करावा तसा अजून उपयोग करूं लागले नाहींत.

**७ इम्पिरियल बँकः**— हिंदुस्थानांतील सर्वांत महत्वाची व मध्यवर्ति स्वरूपाची अशी बँक ह्मणजे इम्पिरियल बँक ऑफ् इंडिया हीच होय. ही बँक सन १९२१ जानेवारीमधें स्थापण्यांत आली. तिचें भांडवल व रिझर्व फंड मिळून १५ कोटि रुपये असून स. १९२६ पर्यंत तिच्या १६१ शाखा काम करीत होत्या. याचसालीं या बँकेंत सरकारच्या व लोकांच्या मिळून ८०·३ कोटि रुपयाच्या ठेवी होत्या. पूर्वीं मुंबई, मद्रास व बंगाल अशा ज्या तीन प्रेसिडेन्सी

बँका होत्या त्या एकत्रित करून ह्या बँकेची स्थापना करण्यांत आली आहे. ही समाईक भागीदारी पद्धतीची बँक ( Share holders' bank ) असून ती मुख्यत: व्यापारी बँकेचें काम करते. पण पूर्वीच्या प्रेसिडेन्सी बँकांचें कार्यही हिच्या कार्यामध्यें अंतर्भूत केलें असल्यामुळें ही एक प्रकारें मध्यवर्ती अशी बँकांची बँकही बनलेली आहे व हिंदुस्थानांतील बहुतेक मुख्य मुख्य बँका जरूर तेवढीच रोकड आपल्या जवळ ठेवून बाकीची सर्व रोकड ह्या बँकेत शिल्लक ठेवितात

तसेंच इम्पिरियल बँक ही हिंदुस्थान सरकारच्या बँकेचेंही काम करते; ह्मणजे सरकारचें सर्व देवघेवीचें काम ती करते. इतर कोणत्याही बँकांना हा हक्क नाहीं. फक्त या बँकेकडेच सरकारी सर्व शिल्लक बिनव्याजी ठेविली जाते.

परंतु सरकारनें या बँकेवर कांहीं कांहीं बाबतींत कायद्यानें नियंत्रण घालून कांहीं विशिष्ट तऱ्हेचे व्यवहार करण्याची तिला बंदी केली आहे. या बँकेचें कार्यक्षेत्र हिंदुस्थान व सीलोन एवढ्यापुरतेंच मर्यादित केलेलें असल्यानें, या दोन देशांच्या बाहेर तिला आपलें कार्यक्षेत्र वाढवितां येत नाहीं. लंडनमध्यें या बँकेची एक शाखा आहे खरी, पण तिचें काम कांहीं विवक्षित प्रकारचेंच आहे. तसेंच या बँकेला परदेशीय हुंडणावळीच्या व्यवहारांत भाग घेण्याची सक्त मनाई आहे. हिंदुस्थानचें स्टेट सेक्रेटरी व हिंदुस्थान सरकार हे, कौन्सिल-बिलांच्या सहाय्यानें बऱ्याचशा प्रमाणांत हा व्यवहार

अद्यापही करीत असतात. व अशा व्यवहारांचा फक्त एक्सचेंज बँकांना मक्ता दिल्यासारखा आहे. तेव्हां इम्पिरिअल बँक ही एक अर्थी सरकारी बँक असली तरी तिला हिंदुस्थानच्या या दरसाल कोट्यावधी रुपयांच्या व्यापार क्षेत्रांत पाऊलही टाकण्यास मज्जाव आहे. या शिवाय इम्पिरियल बँकेला परदेशांत कर्ज उभारतां येत नाहीं. ( नाहीं ह्मणावयास लंडनमध्यें फक्त कांहीं ठराविक अटीवर कर्ज काढावयास तिला परवानगी आहे. पण या अटी अशा आहेत कीं ही परवानगी असून नसून सारखीच. ) तेथील लोकांच्या ठेवी घेता येत नाहींत. युरोपांतील मोठमोठ्या देशांतील मध्यवर्ती बँकाना परदेशांत कर्ज उभारण्याला मुभा असते. अर्थात् हा त्यांना एक मोठा फायदा असतो, कारण देशांतील आणीबाणीच्या वेळीं देशा-बाहेर भांडवल उभारतां येणें हें अतिशय जरूरीचें असतें. या शिवाय मध्यवर्ती बँकेचें आणखी एक महत्वाचें कार्य ह्मणजे 'बँक नोटा' काढणें. हेंही इम्पिरियल बँकेकडे सोपविलेलें नाहीं, तर नोटा काढण्याचें सर्व काम सरकारनें फक्त आपल्याच हातांत ठेविलें आहे. या सरकारच्या कृत्यामुळें बँकेनें नोटा काढण्यापासून चलन-पद्धतीला जो एकप्रकारचा लवचीकपणा येतो तोही आपल्या देशामध्यें सहजासहजी प्राप्त करून घेण्याचा मार्ग कठीण झाला आहे. एकंदरीनें पहातां इम्पिरियल बँक ही फक्त एक व्यापारी बँक आहे; व तिचा देशाला मुख्य उपयोग ह्मणजे येथील व्यापारी

वर्गाला लागेल त्याप्रमाणें कमी जास्त मुदतीनें पैसा पुरविणें इतकाच होतो.

अशारीतीनें इम्पिरियल बँकेच्या कार्यक्षेत्रांवर नियंत्रण असल्यामुळें हिंदुस्थानची चलनपद्धति एकप्रकारें लुली पडल्यासारखी आहे, व देशांतील उद्योगधंदे व व्यापार यांना पोषक असें एक ठराविक राष्ट्रीय धोरण अनुसरतां येत नाहीं. नोटा काढण्याचा अधिकार सरकारचा असल्यामुळें व सरकारचा, बँकाइतका उद्योगधंद्याशीं व देवघेवीच्या व्यवहाराशीं निकट संबंध येत नसल्यामुळें आपल्या चलनपद्धतींत असावयास पाहिजे तितकें स्थितिस्थापकत्व (elasticity) नाहीं.

**हिंदी बँकांच्या धंद्याचें स्वरूपः**— वरील सर्व हकीकतीवरून आपल्यास असें दिसून येईल कीं, आपल्याकडील बँकांच्या धंद्याचें स्वरूप अतिशय विस्कळित स्वरूपाचें (decentralised) आहे. निरनिराळ्या बँकांचें निरनिराळें कार्यक्षेत्र, अशा तऱ्हेची जणूं काय फारकतच होऊन गेली आहे. व एकमेकांना एकमेकांची मदत जवळ जवळ नाहींच ह्मटलें तरी चालेल. इम्पिरिअल बँक ही कांहीं अंशी बँकांची बँक असली तरी पूर्णावस्थेंत असलेली अशीं मध्यवर्ती बँक आपल्याकडे नाहीं. यामुळें देशांतील सर्व भांडवल एकेठिकाणीं एकत्रित करून जिकडे जसें लागेल तिकडे त्या मानानें पुरविण्याचा योग्य मार्ग नाहीं. देशांतील चलन पद्धति हीही पाहिजे तशी लव-

चीक व वाढत्या उद्योगधंद्यांना सहाय्यभूत होण्यासारखी अगर त्यांना उत्तेजन देण्यासारखी नाहीं. या सर्व गोष्टीसाठीं आपल्याला मुख्यतः एक मध्यवर्ती अशी बँक पाहिजे व तिला इतर पाश्चात्य देशांतील बँकांप्रमाणेंच सर्व अधिकार पाहिजेत. मध्यवर्ती बँकेची जरूरी सरकारलाही भासते इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानांत एक मध्यवर्ती बँक काढण्याबद्दलचा उहापोह आज जवळ जवळ शंभर वर्षे सरकार करीत आहे. व त्या दृष्टीनें एक रिझर्व बँक काढण्याचा मोठा खटाटोपही सन १९२७ मध्यें करण्यांत आला. परंतु बँकेवरील नियामक मंडळांत, लोकपक्षाचा ताबा असावा कीं सरकार पक्षाचा असावा, या बाबतींत हें रिझर्व बँकेचें घोंगडें भिजतच पडलें आहे.

**रिझर्व बँकेचें भिजत पडलेलें घोंगडें:**— ह्या रिझर्व बँकेचा इतिहास थोडक्यांत पुढील प्रमाणें आहे सन १९२६ सालीं जें हिल्टनयंग करन्सी कमिशन नेमलें होतें, त्या कमिशनच्या शिफारशीपैकीं रिझर्व बँक स्थापन करणें ही एक अत्यंत महत्वाची शिफारस होती व या बँकेकडे नोटा काढणें, सरकारी रकमा ठेवणें व खरीखुरी अशी मध्यवर्ती व बँकांची बँक होणें वगैरे कामें सोपवावयाची होती.

सरकारनें ही सुचना मान्य करून अशा तऱ्हेची एक बँक स्थापन करण्याकरितां जानेवारी १९२७ मध्यें असेंब्लीमध्यें एक बिल आणिलें. या बिलाप्रमाणें ही बँक भागीदारी पद्धतीची बँक

(Shareholders' bank) व्हावयाची असून तिच्या नियामक मंडळामध्यें व्यापारी व सरकारनियुक्त असे लोक मुख्यतः नेमले जाणार होते. हें बिल विशेष विचारासाठीं असेंब्लीच्या सिलेक्ट कमिटीकडे सोपविल्यानंतर पुष्कळसा वादविवाद होऊन बहुमतानें त्यांत पुढील प्रमाणें मुख्य फरक करण्यांत आले: भागीदारी तत्वावर ही बँक न काढतां ती सरकारी बँक ह्मणून (State bank) काढण्यांत यावी व तिच्या नियामक मंडळामध्यें निरनिराळ्या कायदे मंडळांनीं निवडलेले असे बरेचसे लोक असावेत. अशा तऱ्हेनें पूर्वस्वरूप पार बदलून गेलेलें हें बिल सप्टेंबरमध्यें असेंब्लीपुढें आलें, पण स्टेट सेक्रेटरीस तें कबूल नाहीं या सबबीवर सरकारनें अधिक विचार करण्यासाठीं ह्मणून तें परत घेतलें.

लोकपक्षीय सभासदांनीं मूळच्या सरकारी बिलाला जो विरोध केला होता व सिलेक्ट कमिटींत ते बदलले जाऊन नवीन झाले होतें, त्याचीं कारणें साधारणतः अशीं होतीं कीं, देशांतील चलन व पतीचीं व्यवहारसाधनें यांवर रिझर्व बँकेचा ताबा असल्यामुळें ही कायदे-मंडळाला जबाबदार असली पाहिजे. तसेंच ही बँक जर सरकारी बँक असेल तरच लोकांच्या पूर्ण विश्वासाला ती पात्र होईल; शिवाय रिझर्व बँक सुरू करण्याला फार मोठें भांडवलही लागत नसल्यामुळें भागीदारी स्वरूपाची घटना करून भागीदार लोकांचा एक संघ तयार करण्याचें कांहीं कारण नाहीं. जरूर तें भांडवल भागीदारीनें

उभारल्याशिवायही जमा करतां येईल; व भागीदारी तत्वावर बँक काढली तर ती मोठमोठ्या परदेशी व देशी भांडवलवाल्यांच्या हातांत पूर्णपणें जाण्याची भीति रहाणार. लोकपक्षाच्या विरोधाची मुख्य कारणें याप्रमाणें होती, परंतु त्यांतल्यात्यांत पहिलें कारण जास्त प्रबल होतें, हें सांगावयास नकोच.

या बिलाची अशा रीतीनें विल्हेवाट लागल्यावर लंडनमधील अधिकारी वर्गाशीं वगैरे वाटाघाट करून सरकारनें १९२८ च्या जानेवारी महिन्यांत एक अगदींच नवीन स्वरूपाचा रिझर्व बँक बिलाचा दुसरा मसुदा प्रसिद्ध केला. पण यांतही सरकारनें आपलें भागीदारी बँकेचें तत्व सोडलें नव्हतें. बँकेचें भांडवल ५ कोटी रुपये असावें असें मांडले असून मुख्य म्हणजे कोणत्याही कायदेमंडळाच्या सभासदाला बँकेचा डायरेक्टर होतां येऊं नये असा निर्बंध घातला होता. म्हणजे लोकपक्षाच्या लोकांची मुख्य तक्रार क़ायमच राहिली, व जरी इतर कांहीं बाबतींत तक्रारी थोड्याबहुत दूर करण्याचा प्रयत्न सरकारकडून करण्यांत आला होता तरी मुख्य वादाचा प्रश्न न मिटल्यामुळें हें नवीन अपत्यही सुरळीत जन्मास येण्याचें चिन्ह दिसेना. पण या बिलाचा शेवट झाला तो मात्र अत्यंत अकल्पित व आश्चर्यकारक तऱ्हेनें झाला. असेंब्लीच्या प्रेसिडेंटनीं पार्लमेंटच्या कामकाजाच्या पद्धतींचा दाखला देऊन पूर्वींचें 'बिल एक परत तरी घेतल्याशिवाय अगर तें आपोआपच गळल्याशिवाय ( Lapse ) हें नवीन

बिल पुढें आणण्यास फडणिसाना परवानगीच देण्याचें नाकारलें! अशा रीतीनें या नवीन उदयोन्मुख बिलावरही आकाशाची कुऱ्हाड अकल्पित कोसळल्यामुळें आपलें पाहिलेंच बिल, जें सप्टेंबर १९२७ मध्यें त्यांनीं विचार करण्यासाठीं ह्मणून तात्पुरतें परत घेतलें होतें, तेंच विचारांत घेण्याकरितां पुढें मांडलें. अर्थात् त्याच्याविरुद्ध पूर्वींच्या सर्व तक्रारी व आक्षेप हे पुन्हां निघाले, व सरकारला आपल्या इच्छेप्रमाणें बिल पास करून घेतां येईल असें चिन्ह दिसेना. तेव्हां विरुद्ध बाजू योग्य व व्यवहार्य तडजोड करावयास कबूल नाहीं, या सबबीवर सरकारनें या बिलाच्या बाबतींत या वेळीं तरी निदान इतिश्री ह्मटली. अशा रीतीनें हें रिझर्व बँकेचें घोगडें जें भिजत पडलें तें पडलें.

सन १९२९ मध्यें हिंदुस्थानसरकारनें नेमिलेल्या इंडियन् बँकिंग इन्कायरी कमिटीनें नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या आपल्या रिपोर्टांत हिंदुस्थानांत रिझर्व बँकेची स्थापना केल्याखेरीज हिंदुस्थानची खरोखरीची आर्थिक सुधारणा होणें शक्य नाहीं असें ह्मटलें आहे.

(“ हल्लीं अस्तित्वांत असलेल्या बँकांच्या पद्धतिमधील दोष काढून टाकण्याच्या मार्गांतील पहिली पायरी ह्मणजे रिझर्वबँक स्थापन करणें ही होय, असें या विषयावरील तज्ञांचें एकमत आहे.— १९२६ च्या ‘ इंडियन् करन्सी व फायनॅन्स ’ या वरील कमीशनचें मत असें आहे कीं, हल्लींची हिंदुस्थानची चलन पद्धति व ‘ पती ’

वरील ताबा या गोष्टी अनुक्रमें हिंदुस्थान सरकार व इम्पिरियल बँक यांच्या ताब्यांत आहेत, हे सदोष होय. आमचेही मत असेंच आहे. आणि आमची खात्री झाली आहे कीं या दोन्ही गोष्टी एकच संस्थेच्या ताब्यांत ठेविल्या शिवाय खरी सुधारणा व वाढ होणें शक्य नाहीं. या वरून हिंदुस्थानांतील बँकेच्या धंद्याची वाढ व आर्थिक परिस्थितीची सुधारणा यांच्या दृष्टीनें, आह्मांस वाटतें कीं, मध्यवर्ती ह्म. रिझर्व बँक शक्य तितक्या लवकर स्थापिली जावी. " सेंट्रल बँकिंग इन्क्वायरी कमेटीचे रिपोर्टांतून भाषांतर. पुस्तक १ भाग १ पा. ४१७. ) आतां इतक्या आग्रहाच्या शिफारशीनंतर तरी हिंदुस्थानला रिझर्व बँक लौकर लाभते किंवा नाहीं तें पाहाणें आहे.



## प्रकरण १४ वें.

# आंतरराष्ट्रीय देवघेव



**आंतरराष्ट्रीय देवघेवींतील अडचणी:—** जोपर्यंत लोकांचे देवघेवींचें व्यवहार देशांतल्या देशांतच होत असतात तोपर्यंत त्यांनीं आपापसांतील देणीघेणीं भागविणें फारसें कठिण नसतें. उदाहरणार्थ मुंबईच्या फळवाल्यानें पुण्याहून फळें मागविलीं अगर

एखाद्या धान्याच्या व्यापाऱ्यानें पंजाबांतून गहूं मागविले तर त्याला त्यांचीं देणीं फारच सोप्या रीतीनें भागवितां येतील. जेवढ्या किंमतीचा माल घेतला असेल तेवढे रुपये दिले अगर तेवढ्या रुपयांचा चेक अगर हुंडी दिली कीं त्याचें काम होईल. पण तेंच परदेशांशीं व्यवहार करावयाचे वेळीं मात्र अनेक अडचणी उद्भवतात. एक तर निरनिराळीं नाणीं प्रचारांत असल्यामुळें एका देशांतील नाणीं दुसऱ्या देशांत चालत नाहींत. उदाहरणार्थ, आपल्याकडील रुपया हा इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका वगैरे देशांत चालत नाहीं व तिकडील व्यापारी तो घेणारही नाहींत. आपल्याकडे ज्याप्रमाणें एखादा गोंव्याचा पैसा, इंग्लिश शिलिंग, अमेरिकन डॉलर अगर जर्मन मार्क बाजारांत चालत नाहीं, त्याचप्रमाणें परदेशांतही आपल्याकडील नाणीं चालत नाहींत. ह्मणून परदेशांतील व्यापाऱ्यांना द्यावयाची रकमही नेहमी त्यांच्या देशांतील चलनाच्या रूपानें द्यावी लागते. तसेंच निरनिराळ्या देशांचा एकमेकांशीं असलेला व्यापार अवाढव्य प्रमाणांत चालत असल्यामुळें मोठमोठ्या रकमा इकडून तिकडे व तिकडून इकडे पाठवावयाच्या झाल्यास तें एक मोठें गैरसोईचें, खर्चाचें व त्रासदायक काम होऊन बसेल. उदाहरणार्थ हिंदुस्थानांतील एखाद्या व्यापाऱ्यानें दहा हजार पौंड किंमतीचा माल इंग्लंडहून मागविला तर त्याला एवढी रकम पोस्टानें पाठवावयास प्रथमतः पोस्टालाच कितीतरी फी द्यावी लागेल. शिवाय अशा तऱ्हेनें परदेशांतून माल आणणारे व्यापारी अनेक असतात व ते दरसाल कोट्यावधी रुपयांचा माल आणवीत

असतात. तेव्हां हे सगळे लोक नाण्यांच्या रूपानें आपापल्या मालाची किंमत पाठवूं लागले तर किती त्रास पडेल ? तसेंच अनेक निरनिराळ्या देशांशीं प्रत्येक देशाचा व्यापार असल्यामुळें निरनिराळ्या ठिकाणची नाणीं पैदा करावयास प्रत्येक देशांतील व्यापाऱ्यांना किती त्रास पडेल याची कल्पनाच केलेली बरी.

**आंतरराष्ट्रीय देवघेवीचें एक साधें उदाहरणः**— परंतु निरनिराळ्या देशांचे एकमेकांशीं व्यवहार अशा तऱ्हेनें कधींच होत नाहींत. प्रत्येक देशांतील व्यापारी आपल्या देशांतील जिन्नस दुसऱ्या देशांत पाठवीत असतात व परदेशांतील माल आपल्या देशांत आणीत असतात. आपल्या देशांतील जेवढ्या किंमतीचा माल बाहेर पाठविला जातो तेवढ्या रकमेबद्दल आपण ( ह्म. आपला देश ) त्या दुसऱ्या देशाचें घेणेकरी ( सावकार ) होतो; कारण त्या मालाची किंमत आपल्यास मिळावयाची असते. याचे उलट आपण परदेशांतून जेवढ्या किंमतीचा माल आणतो तेवढ्या रकमेबद्दल आपण त्या देशाचें देणेकरी होतों, कारण त्या मालाचे पैसे आपल्यास द्यावयाचे असतात. उदाहरणार्थ असें समजूं कीं अ, ब, क, ड हे चार व्यापारी आहेत.. पहिले दोघे हिंदुस्थानांत व दुसरे दोघे लंडनमध्यें रहातात. इथल्या 'अ' व्यापाऱ्यानें तिथल्या 'क' व्यापाऱ्याकडून दहा हजार रुपये किंमत होईल इतका माल मागविला; व लंडनमधील 'ड' व्यापाऱ्यानें इथल्या 'ब' व्यापाऱ्याकडूनही तितक्याच किंमतीचा माल नेला. म्हणजे 'अ' हा 'क'चे दहा हजार रु. देणें लागतो; व 'ड' 'ब' चे

तितकेंच देणें लागतो. आपण आणखी असें समजूं कीं अ, ब व क, ड यांच्या आपापसांत ओळखी आहेत व एकमेकांच्या व्यवहाराची एकमेकांना माहिती आहे. आतां 'अ'नें इकडून व 'ड'नें तिकडून पैसे पाठविण्याचा एवढा द्राविडी खटाटोप करण्यापेक्षां फारच सोप्या रीतीनें ही देवघेव होते. हें कसें तें पाहूंया. 'अ', 'ब'कडे जाऊन ह्मणतो कीं, मला लंडन मधल्या 'क'चे १०००० रु. द्यावयाचे आहेत, ते तूं घे व तुझे तिकडच्या 'ड' कडून १०००० रु. यावयाचे आहेत, ते वसूल करावयाचे अधिकारपत्र मला दे. 'ब' हा 'अ'च्या नांवाचें अशा तऱ्हेचें अधिकार पत्र देतो. 'अ' तें 'क'कडे पोष्टानें पाठवितो व त्याला 'ड' कडून त्यांत लिहिलेली रकम वसूल करावयास सांगतो; व त्याप्रमाणें 'क' हा 'ड'कडून ती रकम वसूल करतो. अशा रीतीनें एका अधिकार पत्राच्या सहाय्यानें हजारो मैल लांबीवर असलेल्या दोन निरनिराळ्या देशांतील दोन देणीं इकडून तिकडे अगर तिकडून इकडे एक पैही न पाठवितां भागविलीं जातात.

इतकेंच नव्हे तर याहीपेक्षां सोप्या रीतीनें ही देवघेव होणें शक्य आहे. ह्मणजे 'अ'नें 'ब'ला अगर 'ड'नें 'क'ला प्रत्यक्ष एक पैसाही रोकड न देतां होण्यासारखी आहे. समजा कीं, 'अ' व 'ब' यांचें दोघांचेही येथें सेंट्रल बँकेंत खातें आहे. 'अ'नें 'ब'ला प्रत्यक्ष दहा हजार रुपये देण्यापेक्षां सेंट्रल बँकेवर तेवढ्या रकमेचा एक चेक दिला. 'ब'ला ह्या रोख रकमेची कांहीं तितकीशी जरूरी नाहीं. त्यानें तो चेक बँकेकडे पाठवून आपल्या खात्यांत जमा करावयास सांगितला

म्हणजे तेवढी रकम 'अ'च्या खात्यांतून वजा करून 'ब'च्या खात्यांत बँकेमध्यें जमा केली जाते. अशा रीतीनें नुसत्या कागदावरील एका बेरीज वजाबाकीनें हा दहाहजार रुपयांचा व्यवहार पुरा होतो. इंग्लंडमधील 'क', 'ड', यांचेमधील व्यवहारही अशाच रीतीनें पुरा करतां येईल हें सांगावयास नकोच. याप्रमाणें एक पैसाही दिल्या-घेतल्याशिवाय हे दोन्हीं व्यवहार पुरे होऊं शकतील.

परंतु आपण हें जें उदाहरण म्हणून घेतले आहे तें मुद्दाम फारच सरळ व साधें असें घेतलें आहे. त्यांत कोणत्याही प्रकारच्या भानगडी अगर गुंतागुंतीचे प्रश्न आपण ध्यानांत घेतले नाहींत. पण प्रत्यक्ष व्यवहारांतील देवघेवी इतक्या साध्या व सरळ नसतात, तर त्यांत कित्येक गुंतागुंतीचे प्रश्न उपस्थित होतात. ते कोणते व त्यांचा निकाल कसा काय लावण्यांत येतो वगैरे गोष्टीकडे वळण्यापूर्वीं नुकत्याच ज्या एका "अधिकारपत्रा" संबंधीं वर उल्लेख केला आहे त्याचें स्वरूप व त्याचें कार्यक्षेत्र वगैरेबद्दल प्रथम माहिती घेणें जरूर आहे.

**"आंतरराष्ट्रीय व्यापाराचें चलन"– विनिमयपत्रः–** वर आपण ज्या "अधिकार पत्रा"चा उल्लेख केला आहे त्याला व्यापारी भाषेंत विनिमयपत्र ( Bill of Exchange ) अगर हुंडी असें म्हणतात व त्याचें स्वरूप थोडक्यांत पुढील प्रमाणें असते. साधारणतः विनिमयपत्र हें एका इसमानें दुसऱ्या इसमास लिहिलेलें एकप्रकारचें लेखी विनंतीपत्र असतें; व त्याला त्यामध्यें लिहिलेली रकम त्यामध्यें नमूद केलेल्या व्यक्तीला देण्याबद्दल विनंती केलेली

असते. आतां ही रक्कम ज्या मनुष्यास द्यावयाची तो कदाचित् एखादा त्रयस्थ इसमही असूं शकेल अगर तें विनिमयपत्र लिहिणारा स्वतःच असूं शकेल, अगर कांहीं कांहीं प्रसंगीं ज्याला रक्कम द्यावी ह्मणून लिहिलेलें असतें त्या इसमानें तें विनिमयपत्र ज्याला दिलें असेल असा आणखीही निराळाच कोणी तरी मनुष्य असूं शकेल. तसेंच पैसे केव्हां द्यावयाचे, ( उदाहरणार्थ तात्वडतोब तें विनिमयपत्र हातांत आल्याबरोबर, अगर कांहीं मुदतीनंतर ह्मणजे ते हातीं आल्यापासून एक, दोन, तीन अगर सहा महिन्यांनीं वगैरे ) हेंही त्यांत नमूद केलेलें असते. जर तें दर्शनी विनिमयपत्र असेल ह्मणजे तें हातीं आल्याबरोबर त्यांत लिहिलेली रक्कम द्यावयाची असेल, तर प्रश्न निराळा. परंतु जर तें कांहीं मुदतीचें असेल तर ती मुदत होईपर्यंत त्यांतील रक्कम ज्या मनुष्यावर तें काढलें असेल त्याच्याकडून हक्कानें वसूल करून घेतां येत नाहीं. परंतु एखादें विनिमयपत्र एकदां ज्याच्यावर काढले असेल त्याच्याकडे हजर केलें व त्यानें तें "स्वीकारलें" असें दर्शविण्याकरितां त्याच्यावर सही केली ह्मणजे त्याचा उपयोग त्या स्वीकारण्यामुळें लिहून दिलेल्या एखाद्या प्रॉमिसरी नोटीसारखा होऊं शकतो. अशातऱ्हेची आंतरराष्ट्रीय देवघेवींमध्यें उपयोगांत आणली जाणारीं विनिमयपत्रें बहुधा मुदतीचीं असतात.

**विनिमय-पत्रांचें कार्यः—** निरनिराळ्या ठिकाणीं इकडून तिकडे व तिकडून इकडे अशातऱ्हेनें पैसे पाठविण्याच्या त्रास व गैर-सोय वांचवून दोन्हीकडची देणीं सुलभतेनें भागविणें व अशारीतीनें

देवघेवीचे व्यवहार सुगम करणें हा विनिमयपत्राचा मुख्य उद्देश व उपयोग होय. विनिमयपत्रांची पूर्ण प्रगति झाली ह्मणजे त्यांचे योगानें निरनिराळ्या देशांचे देवघेवींचे व्यवहारही असेच सुगम केले जातात. उदाहरणार्थ, इंग्लंडनें अमेरिकेला बरेच पैसे द्यावयाचे आहेत; अमेरिकेला चीनचें बरेंच देणें आहे; व चीनला इंग्लंडचें पुष्कळ कर्ज आहे. अशा स्थितींत इंग्लंड आपल्या अमेरिकन् देण्यापैकीं कांहीं देणें तरी निदान चीनवर काढलेल्या विनिमयपत्रांच्या सहाय्यानें देऊं शकेल. हें कसें तें पहा. समजा कीं, इंग्लंडला अमेरिकेचें १० कोटी पौंड देणें आहे. अमेरिकेला चीनचें १५ कोटी पौंड देणें आहे व चीनला इंग्लंडचें ५ कोटी पौंड देणें आहे. आतां इंग्लंडनें या पांच कोटी पौंडाची विनिमयपत्रें चीनवर काढलीं व तीं आपल्या देण्या-बद्दल अमेरिकेला पाठविलीं तर अमेरिकेलाही तीं चीनकडे परत पाठवून आपल्या देण्यापैकीं पांच कोटींचें देणें भागवितां येईल. अशारीतीनें विनिमयपत्रांच्या सहाय्यानें राष्ट्रांराष्ट्रांतील देवघेवींचे व्यवहार फारच सुगम होतात, व विस्तृत प्रमाणावर व्यापाराची वाढ होण्यास त्यांच्या योगानें पुष्कळच मदत होते.

हार्ट्ले विदर्स या इंग्लिश ग्रंथकारानें ह्मटल्याप्रमाणें, विनिमय-पत्र हें, जगांमध्यें व्यापाराचा गाडा सुरळीत चालवून, जगांतील सर्व राष्ट्रांचें जणूं काय एक व्यापारी कुटुंब बनवून, त्यांच्या हितसंबंधाचें एकीकरण करण्याचें कामीं, व जगामध्यें शांतता व गोडीगुलाबी प्रस्थापित करण्याचें कामीं ज्याची अतोनात मदत झाली आहे असें

एक अत्यंत आश्चर्यजनक व अद्भुत असें देवघेवीचें साधन आहे. विनिमयपत्राचा हा शोधच असा आहे कीं, त्याचें योगानें कोणालाही आपलें नुकसान झालें आहे असें वाटत नाहीं; तर उलट प्रत्येकाला फायदाच झाल्यासारखा वाटतो.

आपण एखादे वेळीं कोणास कांहीं रक्कम द्यावयाची झाली ह्मणजे बँकेवर चेक देतो. हा चेक ह्मणजे आपण बँकेवर काढलेले एक प्रकारचें दर्शनी विनिमयपत्रच होय. बँकेंत आपले पैसे असतात ह्मणजे बँक आपलें देणें लागते. तसेंच आपण ज्या मनुष्याच्या नांवानें चेक देतो त्या मनुष्याचें आपल्याला देणें असतें. अशा रीतीनें त्या एका चेकाचे योगानें दोन निरनिराळीं देणीं दिलीं जातात. चेक हा जसा पैशाची देवघेव करण्याचें एक सुलभ साधन आहे त्याचप्रमाणें विनिमयपत्र हेंही पण आहे. परंतु त्याचें कार्यक्षेत्र चेकच्या कार्यक्षेत्रापेक्षां मोठें आहे. चेक हा दर्शनी असतो ह्मणजे तो हजर केल्याबरोबर बँकेनें वटाविलाच पाहिजे. परंतु विनिमयपत्रें हीं बहुधा कांहीं विविक्षित मुदतीचीं असतात हें आपण पाहिलेंच आहे. या त्यांच्या गुणामुळेंच त्यांचें कार्यक्षेत्र व उपयुक्तता हीं चेकपेक्षां मोठीं आहेत आणि यामुळेंच **त्यांना 'आंतर्राष्ट्रीय व्यापाराचें चलन'** (Currency of international trade) असें ह्मणतात.

**आंतर्राष्ट्रीय देवघेव कशी होते?** :— विनिमयपत्रांबद्दल इतकी माहिती तूर्त पुरे. आतां आपण आपल्या मूळ प्रश्नाकडे, ह्मणजे प्रत्यक्ष व्यवहारांत आंतर्राष्ट्रीय देवघेवीमध्यें

काय काय गुंतागुंतीचे प्रश्न असतात व ते कसे सोडविले जातात, इकडे वळूं. आपण सुरवातीला चार व्यापाऱ्यांचें जें उदाहरण घेतलें तें फारच साधें व सरळ असें होतें. प्रत्यक्ष व्यवहारांत तसें नसतें. प्रत्येक देशांत एकमेकाशीं व तसेंच परदेशांशीं व्यापार करणारे हजारों व्यापारी असतात. शिवाय ते निरनिराळ्या ठिकाणीं रहात असतात. तेव्हां त्या सर्वांच्याच आपापसांत ओळखी असणें शक्य नसतें. तसेंच त्यापैकीं कांहीं व्यापारी फक्त आपल्या देशांतील माल परदेशांत पाठविण्याचाच धंदा करणारे ( export merchants ) असतात. कांहीं नुसता परदेशांतून आपल्या देशांत माल आणण्याचा धंदा करणारे ( Import merchants ) असतात. तसेंच कोणी किती माल आणला व तो कोठून आणला हें प्रत्येकास समजावयासही मार्ग नसतो. आतां जे व्यापारी परदेशांत माल पाठवितात त्यांना बाहेरून पैसा मिळावयाचा असतो. याचें उलट जे बाहेरून माल आणतात, त्यांना पैसे पाठवावयाचे असतात. तेव्हां निर्गत व्यापारी ( ह्मणजे बाहेर माल पाठविणारे व्यापारी ) आपल्याला येणें असलेल्या पैशाबद्दल आपापल्या देणेकऱ्यांच्या नांवाचीं विनिमयपत्रें काढतात; व तीं बाजारांत विकावयास पाठवितात. अर्थात् या ठिकाणीं निरनिराळ्या अशा अनेक व्यक्तींचा संबंध असल्यामुळें प्रत्यक्ष एकमेकांना भेटून या बिलांची खरेदीविक्री होणें शक्य नसतें. आणि ह्मणूनच अशा तऱ्हेची सगळीं एक्स्चेंज बिलें एके ठिकाणीं गोळा करून तीं ज्यांना जरूर असतील अशा लोकांना लागतील तशीं

पुरवावयाचें काम करणाऱ्या स्वतंत्र संस्था असतात. असा हा एक निराळा धंदाच होऊन बसला आहे. या लोकांना 'एक्स्चेंज ब्रोकर' ह्मणजे दलाल असें ह्मणतात. बहुतेक देशांत हा धंदा मुख्यतः बँकांच्या हातीं असतो. व हा धंदा करणाऱ्या बँका 'एक्स्चेंज बँका' ह्मणून प्रसिद्ध असतात आतां ज्यांना बाहेर देशांत पैसे पाठवावयाचे असतात ते लोक या एक्स्चेंज दलालाकडून अगर पेढ्यांकडून आपल्याला पाहिजे असतील त्याप्रमाणें एक्स्चेंज बिलें खरेदी करतात व तीं आपल्या सावकारांकडे पाठवितात. त्यांना तीं पोस्टांतून मिळालीं ह्मणजे ते तीं ज्यांच्या नांवाचीं असतील त्यांचेकडे हजर करून तीं दर्शनी असल्यास ताबडतोब पैसे घेतात, अगर त्यांचेवर 'स्वीकारली' असा शेरा घेऊन, आपल्याकडे मुदत होईपर्यंत ठेऊन देतात. मध्यंतरी पैसे पाहिजे असल्यास तीं विकतां येतात व रोख पैसा करता येतो. अर्थात् त्यांना त्याबद्दल कांहीं कमिशन कापून द्यावें लागतेंच. अशा तऱ्हेनें कटमितीच्या दरानें कमिशन ( कसर ) कापून घेऊन बिलांची खरेदीविक्री करणाऱ्या पुष्कळ बँका असतात.

आपल्या आरंभीच्या उदाहरणांत आपण आणखी एक गोष्ट गृहीत धरली आहे. ती ह्मणजे एका देशांतील व्यापार दुसऱ्या देशाच्या व्यापाराबरोबर आहे अगर दोन्हीं देशांचें देणें व घेणें हीं सारखीच आहेत. परंतु प्रत्यक्ष वस्तुस्थिति अशी कधींच नसते. शिवाय प्रत्येक देशाचे निरनिराळ्या अनेक देशांशीं व्यवहार होत असतात, एकाच देशाशीं होत नाहींत. एकंदरीत एखाद्या

देशाचा आयात व्यापार हा त्या देशाच्या निर्गत व्यापारापेक्षां अधिक असूं शकेल अगर कमी असूं शकेल. दोहोंची अगदीं बरोबरी होणें जवळ जवळ अशक्य आहे. आतां जरी देशांत येणाऱ्या मालाची किंमत, सामान्यतः देशांतून जाणाऱ्या मालाच्या रूपानें भागविली जाते, तरी जेव्हां आयात मालापेक्षां निर्गत माल अधिक असेल तेव्हां देशाला येणें असलेली अधिक रक्कम मात्र मूल्यवान धातूंच्या ह्मणजे सोनें, चांदी (विशेषतः सोनेंच) यांच्या रूपानें देशांत आणिली जाते. तसेंच आयात माल निर्गत मालापेक्षां अधिक असल्यास देशांतून परदेशांना सोनें पाठवून देशाला देणें असलेली अधिक रक्कम द्यावी लागते. तात्पर्य आंतर्राष्ट्रीय देवघेवींचें प्रत्यक्ष विनिमय साधन जरी विनिमयपत्र हें असलें तरी मोलाचें परिमाण मात्र सोनें हेंच आहे. व आंतर्राष्ट्रीय देवघेवींच्या दृष्टीनें कोणत्याही देशांतील चलनाचें मोल हें, त्या त्या देशांतील त्याच्या प्रचलित मोलानें गणलें न जातां, चालू बाजारभावाप्रमाणें त्याचें जें सुवर्ण-मोल होत असेल त्या अन्वयें ठरलें जातें.

**'सुवर्ण मर्यादा'** (**Gold points**):— आपण नुकतेंच पाहिलें कीं, सामान्यतः देशाचा आयात व्यापार तरी निर्गत व्यापारापेक्षां अधिक असतो, अगर निर्गत व्यापार तरी आयात व्यापारापेक्षां अधिक असतो. ह्मणजे दोहोंची बरोबरी क्वचितच होते. आतां देशांत मालाची आयात झाली कीं, तेवढ्या रकमेकरितां तो देश दुसऱ्या देशाचा ऋणकरी होतो. व हें ऋण भागविण्यासाठीं ज्यांना परदे-

शांत पैसे पाठवावयाचें असतात असे व्यापारी बाजारांत विनिमयपत्रें खरेदी करावयाच्या मार्गास लागतात. आतां या एक्स्चेंज बिलांचा पुरवठा व्हावयाचा ह्मणजे परदेशांत आपला माल पाठविणारे व्यापारी लोक यांचेकडून. पण देशांतून मालाची निर्गतच जर आयातीपेक्षां कमी किंमतीची झालेली असेल तर हे निर्गत व्यापारी तरी सर्व आयात व्यापाऱ्यांना पुरेशीं विनिमयपत्रें कोठून पुरविणार ? अर्थातच मागणी फार व पुरवठा थोडा अशी स्थिति होऊन बाजारांतील विनिमयपत्रांच्या किंमती वाढूं लागणार, कारण विनिमयपत्रें ह्मणजे बाजारांत विक्रीस आलेल्या इतर मालाप्रमाणेंच एक प्रकारचा माल होत. आतां मागणीपेक्षां पुरवठा कमी झाला ह्मणजे त्यांची खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्यांमध्यें सहाजिकच चढाओढ सुरू होणार. व विनिमयपत्र मिळालें तर होणारी सोय व खर्चाची बचत इकडें लक्ष देऊन इतरांपेक्षां थोडी जास्त किंमत देण्यालासुद्धां प्रत्येकजण तयार होईल हें सांगावयास नकोच. त्याचप्रमाणें देशांतील निर्गत, आयातीपेक्षां अधिक झाली तर विनिमय--पत्रांचा पुरवठा मागणीपेक्षां अधिक होईल, तेव्हां अर्थातच त्यांची किंमत थोडीशी उतरेल.

विनिमयपत्रांच्या किंमतींतील ही चढउतार कोणत्या मर्यादे-पर्यंत होऊं शकेल तें आतां आपण पाहूंया. समजा कीं मुंबईच्या एका व्यापाऱ्यानें इंग्लंडहून माल मागविला, त्याबद्दल त्याला लंडन येथील एका व्यापाऱ्यांचे १००० पौंड पाठवावयाचे आहेत, व ही रक्कम पौंडाच्या रूपानें तिकडे पाठवावयास त्याला एकंदर ११ पौं. खर्च येतो.

आतां ही रक्कम पाठविण्याचा नेहमींचा, सोईचा व सोपा मार्ग ह्मणजे तेवढ्या रकमेचें एक विनिमयपत्र खरेदी करून पाठवून देणें. आपण समजूं कीं असें विनिमयपत्र पाठविण्यास १ पौंड खर्च येतो. परंतु बाजारांत अशीं विनिमयपत्रें कमी असलेमुळें व त्यांना मागणी जास्त असलेमुळें, त्यांची किंमत चढली आहे. तेव्हां अशा परिस्थितींत आपला व्यापारी १००० पौंडाच्या विनिमयपत्राकरितां किती किंमत द्यावयास तयार होईल? या प्रश्नाचें उत्तर थोडक्यांत असें आहे कीं, या नेहमींच्या मार्गापेक्षां, अन्य मार्गानें ती रकम पाठविण्यास जो जास्त खर्च येईल, तेवढी रकम फार तर तो १००० पौंडापेक्षां अधिक देऊं करील. ह्मणजे १००० पौंडाच्या विनिमयपत्राला १०११ पौंडापेक्षां अधिक किंमत देण्यास तो सहसा तयार होणार नाहीं. कारण यापेक्षां अधिक किंमत देऊन, विनिमयपत्र खरेदी करून, तें पाठवावयास पुन्हां १ पौंड खर्च करण्यापेक्षां, प्रत्यक्ष रोख पैसे पाठविणेंच त्याच्या अधिक फायद्याचें आहे. त्याचप्रमाणें आयातीपेक्षां निर्गत जास्त झाल्यामुळें विनिमयपत्रांच्या किंमती उतरूं लागल्यासही त्यांचा भाव याच तत्वानुसार ठरतो. जर एखाद्या रकमेचें विनिमयपत्र विकून होणाऱ्या फायद्यापेक्षां अधिक फायदा, तें विनिमयपत्र न विकतां, परदेशांतून प्रत्यक्ष सोनें आणविल्यानें होऊं लागला, तर व्यापारी विनिमयपत्रें अशा तोट्यानें देणारच नाहींत. सारांश एखाद्या विवक्षित रकमेच्या विनिमयपत्रांचा बाजारभाव, तेंवढी रक्कम रोख सोन्याच्या रूपानें देशाबाहेर पाठविण्यास अगर बाहेरून देशांत

आणण्यास जो खर्च येतो त्यापेक्षां अधिक रकमेनें जास्त अगर कमी सहसा होत नाहीं; तर तो या दोन मर्यादांच्या आंतच कमीअधिक होत असतो. या ज्या दोन किमान मर्यादा आहेत त्यांना " सुवर्ण मर्यादा " ( Gold points ) असें ह्मणतात. आतां कोणत्याही देशांतील लोकांना आपल्या देशांतून परदेशांत सोनें पाठविणें हें नुकसानीचेंच वाटतें व त्यायोगानें देशांतील व्यापार धंद्यांवरही अनिष्ट परिणाम होतात ह्मणून प्रत्येक देश शक्यतों या मर्यादां-पर्यंत मजल न येऊं देण्याचाच प्रयत्न करीत असतो.

**हुंडणावळीचा दर**:—विनिमय पत्रांची खरेदीविक्री कर-तांना बँका अगर दलाल जी किंमत आकारतात तिलाच हुंडणावळीचा दर ( Rate of Exchange ) असें ह्मणतात; ह्मणजे एका देशांतील चलन देऊन दुसऱ्या देशांतील चलन घेण्याकरितां, त्या दोन देशांतील चलनांच्या परस्पर किंमती काय आहेत किंवा एका देशांतील नाण्यांबद्दल दुसऱ्या देशांतील नाणीं किती मिळतात, हें दाखविणारा दर ह्मणजे हुंडणावळीचा दर. आतां या हुंडणावळीच्या दरांत कमी जास्ती फरक कोणत्या मर्यादेपर्यंत होऊं शकेल हें आपण नुकतेंच पाहिलें. परंतु हा दर ठरतो कसा हें आतां आपण पाहूं या. सर्व देशांतील चलनपद्धति जर एकाच तऱ्हेच्या असत्या ह्मणजे सर्व देशांतील नाणीं एकाच धातूचीं, सारख्या वजनाचीं, व एकाच कसाचीं अशीं असतीं तर हा देशांदेशांमधील हुंडणावळीचा प्रश्न बराच सोपा झाला असता. परंतु अमुक एक गोष्ट अशी असावी ह्मणून ती थोडीच

तशी होणार आहे? प्रत्यक्ष परिस्थिति काय आहे हें पाहिलें असतां आपणास असें आढळून येतें कीं प्रत्येक देशातील नाणीं ही वर सांगितल्याप्रमाणें एकमेकांसारखीं तर नसतातच पण निरनिराळ्या धातूंची, निरनिराळ्या वजनाचीं व निरानिराळया कसाचीं देखील असतात; व यामुळेंच निरनिराळ्या देशांतील हुंडणावळीच्या दराच्या गुंतागुंती उपस्थित होतात. आतां दोन निरनिराळ्या देशांमध्यें प्रचारांत असलेलीं नाणीं जर एकाच धातूचीं असलीं तर त्यां नाण्यांमध्यें ज्या प्रमाणांत शुद्ध धातु असेल त्या प्रमाणावर त्यांचा हुंडणावळीचा दर अवलंबून राहील. हें थोडेसें अधिक स्पष्ट करण्यासाठीं आपण एक उदाहरण घेऊं. इंग्लंडमधला 'सॉव्हरिन्' व फ्रान्समधला 'नेपोलियन्' हीं दोन्हीं नाणीं सोन्याचीं आहेत. एका सॉव्हरिन्-मध्यें ७·३२२३८ ग्रॅम् इतकें शुद्ध सोनें असतें; व एका नेपोलियन् मध्यें ५·८०६४५ ग्रॅम् इतकें शुद्ध सोनें असतें. तेव्हां या दोन देशांतील हुंडणावळीचा दर एका सॉव्हरिनला $\frac{७·३२२३८}{५·८०६४५}$ नेपोलियन् असा होईल. आतां एक नेपोलियन् ह्मणजे २० फ्रँक; तेव्हां एक सॉव्हरिन् ह्मणजे $\frac{७·३२२३८}{५·८०६४५} \times \frac{२०}{१}$ =२५·२२१५ फ्रँक. हा त्यांच्या-मधील हुंडणावळीचा दर. हा त्या नाण्यांतील शुद्ध धातूवरून ठरलेला असतो. या दराला कायदेशीर अगर टांकसाळी-हुंडणावळीचा भाव (Mint par of exchange) असें ह्मणतात; व हा भाव त्या दोन्हीं देशांतील टांकसाळीचे कायदे जोंपर्यंत बदलले नाहींत तोंपर्यंत एकच कायम असतो. परंतु त्या दोन देशांतील प्रत्यक्ष हुंडणा-

वळीचा दर हा यापेक्षां थोडा निराळा असणार. कारण असें पहा कीं फ्रान्समधील ऱ्यापाऱ्याला इंग्लंडमधील देणें देण्याकरितां पौंड पाहिजेत ही गोष्ट खरी, पण त्याला इंग्लंडमध्यें जितके पौंड लागतील तितके तेथें खरेदी करून देणें देण्याला, फ्रान्सहून इंग्लंडमध्यें कांहींतरी सोनें पाठवावें लागणारच व त्याकरितां त्याला थोडा खर्चही लागणार. हा खर्च वांचविण्याकरितां तो फ्रान्समध्यें इंग्लंडवर काढलेली विनिमयपत्रें खरेदी करतो व त्यासाठीं देणें असलेले पैसे प्रत्यक्ष पाठविण्यास लागणाऱ्या खर्चापेक्षां थोडेबहुत कमी इतके पैसे तो त्या विनिमयपत्रासाठीं, त्याच्या योग्य किंमतीपेक्षां अधिक देण्यास तयार होईल. परंतु पूर्वीं आपण पाहिल्याप्रमाणें हा प्रत्यक्ष हुंडणावळीचा दर सहसा सोनें नेण्याआणण्याच्या खर्चाला लागणाऱ्या रकमेच्या वर चढणार नाहीं अगर खालीं उतरणार नाहीं. कसें तें उदाहरणावरून पहा. घटकाभर असें समजूं कीं, वरील दोन देशांतील नाण्यांचा त्यांच्यामध्यें असलेल्या सोन्यावरून ठरलेला हुंडणावळीचा दर १ पौंडाला २५ फ्रँक आहे. आतां फ्रान्समधून २५ फ्रँक इंग्लंडला पाठवावयास २ फ्रँक खर्च येतो असें धरलें तर १ पौंडाच्या विनिमयपत्राची किंमत २३ फ्रँकच्या खालीं उतरणार नाहीं. तर ती २३ व २७ या दरम्यान कमी जास्त होत रहाणार.

ही झाली दोन्हीं देशांत सोन्याचें नाणें सुरू असतानाची गोष्ट. पण एखाद्या देशांत सोन्याचें नाणें व दुसऱ्या देशांत चांदीचें नाणें सुरू असलें तर अशा प्रसंगीं हुंडणावळीचा दर हा सोन्याच्या

व चांदीच्या बाजारांत असलेल्या दरावर अवलंबून रहातो. कारण या दोन धातूंचा परस्पर बाजारभाव इतर वस्तूंच्या बाजारभावाप्रमाणें नेहमीं कमीजास्त होत असतो, व अर्थात् मग हुंडणावळीचा भावही त्या दराप्रमाणें कमीजास्त होणार. इ. स. १८९३ सालापूर्वी हिंदुस्थान व इंग्लंड यांमधलि हुंडणावळीच्या दराची हीच स्थिति होती. परंतु आतां ती स्थिति नाहींशी होऊन कायदेशीर व ठरीव असा हुंडणावळीचा भाव प्रस्थापित केला गेला आहे, व तो भाव ह्मणजे रुपया व पौंड यांमधलें कायद्यानें ठरविलेलें प्रमाण होय. सध्यां हें कायद्यानें ठरविलेलें प्रमाण एक रुपयास १ शि. ६ पेन्स ह्मणजे पौंडास १३ रु. ५ आणे. ४ पै. असें आहे. परंतु प्रत्यक्ष बाजारांतील दर हा निराळा असतो. कारण कायद्यानें जरी एखादें विविक्षित प्रमाण ठरविलेलें असलें तरी बाजारांतील त्या दोन धातूंच्या किंमतीचें प्रमाण हें कायद्यावर अवलंबून नसतें. इतर अनेक जिनसांच्या किंमतीप्रमाणें या धातूंच्या किंमतीही अनेक प्रकारच्या कारणांमुळें कमी जास्त होत असतात; व त्या मानानें हुंडणावळीच्या दरांतही चढउतार होत असतो. अशा तऱ्हेनें कृत्रिम रीतीनें ठरविलेला हुंडणावळीचा दर कायम राखण्यासाठीं ह्या देशांतील सरकारास फारच उलाढाल्या कराव्या लागतात.

**आंतरराष्ट्रीय देवघेवीपासून फायदे:**-- एकमेकांपासून हजारों मैल लांबीवर रहाणाऱ्या निरनिराळ्या देशांतील व्यापाऱ्यांची

परस्पर देणीघेणीं कशीं भागविली जातात व धात्वात्मक पैशाची फारशी नेआण न करतां मोठमोठ्या रकमांचे परराष्ट्रीय व्यवहार कसे पुरे केले जातात, याची आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून वाचकांस कल्पना येईल. प्रत्यही लागत असलेल्या निरनिराळ्या यांत्रिक शोधामुळें सर्व जग जणूं काय एकाच व्यापार कक्षेंत येत आहे व दिवसेंदिवस आंतर्‌राष्ट्रीय व्यापाराची वृद्धि होत आहे. अशा रीतीनें दूरदूरचे देशांचा एकमेकांशीं निकट संबंध येऊन त्यांचें परस्पर दळणवळण व देवघेव मोठ्या प्रमाणांत सुरू झाल्यामुळें एकंदरीत सर्वच देशांचा फायदा आहे. ज्या त्या देशाला आपापल्या ईश्वरदत्त देणग्यांचा शक्य तों अधिक उपयोग करून घेऊन आपापल्या साधनांप्रमाणें व ऐपतीप्रमाणें योग्य वस्तूंचें उत्पादन करण्याचें कार्य विस्तृत रीतीनें करून त्यांतच पूर्णत्व प्राप्त करून घेणें शक्य झालें आहे; आणि आपला माल इतर देशांना देऊन आपल्यास जरूर तो माल त्यांचेकडून आणतां येऊं लागल्यामुळें कोणत्याही उत्पन्न होणाऱ्या वस्तूंचा उपभोग सहजासहजीं घेतां येऊं लागला आहे. हिंदुस्थानांतील आंबे लंडनच्या गृहस्थाला खातां येतात, तर स्वीडन--नॉर्वे मधील कांड्याच्या पेट्या हिंदुस्थानांतील कुठल्याही खेड्यांत मिळूं शकतात. अशा रीतीनें सर्व जग हें एका कुटुंबाप्रमाणें संघटित झालें आहे. व निरानिराळ्या राष्ट्रांचे हितसंबंध एकमेकांशीं इतके सलग होऊन गेलेले आहेत कीं एकास सुई टोंचली तर त्याची

कळ दुसऱ्यास आल्याशिवाय रहात नाहीं. सारांश अखिल मानव जातीचें एकीकरण करून मानवी जीवनाचें व संस्कृतीचें अंतिम ध्येय गांठण्याचे कामीं आंतरराष्ट्रीय देवघेव व दळणवळण यांचें जेवढें सहाय्य झालेलें आहे व पुढेंही होणार आहे तेवढें दुसरें कशा-चेंही होणार नाहीं असें ह्मटलें असतां अतिशयोक्तीचा दोष पदरीं येण्याचा संभव नाहीं.

